


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






२७५३

१.२.३.४.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| वर्ष १३ वे - | अंक | १ ला | जानेवारी | १९८० |
| " | " | २ रा | एप्रिल - | १९८० |
| " | " | ३ रा | जुलै - | १९८० |
| " | " | ४ था | ऑक्टोबर | १९८० |

अनुक्रमणिका



महाराष्ट्र - साहित्य - परिषद्

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

[त्रैमासिक]

## ५५

संपादक— के. नारायण काळे
बी.ए., अेल्‌अेल्‌.बी.

आषाढ १८६२

वर्ष १२ वें] जुलै १९४० [अंक २

अनुक्रमणिका



## सभासदांस विनंती

म. सा. पत्रिकेचा ---वीं वर्षांतील हा तिसरा अंक सभासदांकडे रवाना होत आहे. परिषदेची वर्गणी वर्षारंभींच भरावी लागते व त्याप्रमाणे पहिल्या अंकांत सभासदांस विनंतीहि केली होती. अद्याप बऱ्याच सभासदांकडून वर्गणी यावयाची आहे. सभासदांस सोअीचें पडावें म्हणून या अंकाबरोबर त्यांजकडून यावयाच्या वर्गणीचा आंकडा त्यांस स्वतंत्र विनंतीपत्रकाच्या द्वारें कळविला आहे. त्याची नोंद घेअून कृपेने वर्गणी पाठविण्याचें करावें. ऑक्टोबरपर्यंत वर्गणी न आल्यास ऑक्टोबरचा अंक व्ही. पी. ने पाठवून वर्गणी जमा करण्याबद्दल सभासदांचा मानस असल्याचें गृहीत धरून तो अंक व्ही. पी. ने पाठविला जाअील अिकडे सभासदांनी कृपेने लक्ष्य पुरवावें.

चिटणीस

म. सा. परिषद्

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

वर्ष १३ वें ] **अनुक्रमणिका** [ अंक ३ रा

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



## साक्षात्कार*



[राज्यत्यागानंतर गौतम बुद्ध सत्यसंशोधनासाठी हिंडत होता. अनेक प्रकारचे क्लेश सहन करून तपश्चर्या केल्यावर एके दिवशीं बोधि वृक्षाखाली त्याला पाहिजे असलेला प्रकाश मिळाला त्या मंगलप्रसंगी त्याने पुढील अुद्गार काढले. बौद्ध वाङ्मयांत त्यांना महत्त्वाचें स्थान आहे.]

[ चाल— अधम किति पालका ]

जन्मजन्मांतरीं कष्ट केले
ते अहा! या क्षणीं सफल झाले. ॥ध्रु०॥

अुभवुनी वासना-बंदिशाळा अिथे
दुःख कारागिरें निर्मियेलें.
शिल्पकारास त्या धुंडिलें कितितरी
परि न शोधांत त्या यश मिळालें.
शिल्पकारा! परी येसि आता करीं
कोण तूं पूर्ण हें मज कळालें!
तापमग्न भिंति या फिरुनि बांधावया
तुज न सामर्थ्य रे! राहिलेलें.
मोहरूपी छतें, मृण्मय स्तंभ वा
शक्य कैसे तुला बांधणें रे!
जीर्ण आढें तुटे, भग्न गृह हो तुझें
ज्यास मायेमुळे रूप आलें.
यापुढे भूवरी मी सुरक्षितपणें
प्राप्त करण्यास निर्वाण चाले.

— गोपीनाथ

---

* सर अेडविन अॅर्नोल्ड यांच्या "Light of Asia" या जगद्विख्यात अिंग्रजी काव्यावरून.

अनुक्रमणिका

# शब्दांची कसरत

[लेखक— श्री. न. चिं. केळकर]

माझे मित्र 'साहित्य-पत्रिके'चे संपादक के. नारायण काळे हे परवा मजकडे येऊन म्हणाले 'पत्रिकेच्या पुढील अंकाकरिता कांही लेख लिहा ना !' मीं पत्रिकेकरिता अेखादा लेख लिहिण्याचें त्यांना वचन दिलें होतें तें पार विसरून गेलों होतों. म्हणून तें पुरें करावें असें आता मनांत आलें; पण लेखाला विषय असा कांहीच योजलेला नव्हता. म्हणून मी म्हणालों 'लेखाला योग्य असा अेखादा विषय तुम्हीच सुचवाल तर पाहा'. तेव्हा ते म्हणाले 'रत्नागिरी येथील संमेलनापासून जो वाद सुरू आहे तो साहित्यप्रांतांतल्याच अेका विषयासंबंधाचा आहे. त्यावर लिहाल ?' ही सूचना त्यांना सहजच सुचणारी खरी, तरी पण मला ती गोष्ट अवघड वाटली; व हा लेख आता त्याच विषयावर थोडा दुरून लिहीत आहें तरी ती गोष्ट तशीच अवघड वाटत आहे. तो विषय अवघड म्हणून त्यावर झालेल्या वादांत जे पक्षोपपक्ष दिसून आले त्यांपैकी कोणाचीच कड घेऊन मला लिहावयाचें नाही. विषय वादग्रस्त व पक्षग्रस्त असला तरी स्वतंत्रपणें त्यावर कांहीच लिहितां येणार नाही असें नाही, हीच भूमिका घेऊन मी खालील चर्चा करणार आहें. आणि त्या विषयाला 'शब्दांची कसरत' हें मोघमच नांव दिलें आहे.

या चर्चेला किंचित् प्रास्ताविक म्हणून शब्दांच्या कसरतीविषयी गमतीने थोडें सुचलें म्हणून तें प्रथम लिहितों.

माझा अेक मित्र मला सांगत होता तें आठवलें. तें असें— "माझे मुंबअीचे अेक स्नेही मागील दिवाळीकरिता पुण्यास, आपल्या अितर मुलांनातवंडांसह, त्यांच्या थोरल्या मुलाकडे आले होते. म्हणून त्यांना भेटायला जाअून मी खुर्चीवर टेकलों अितक्यांत, त्यांचा दहा वर्षांचा मुंबअीकर नातू आला, आणि आजोबांना म्हणू लागला 'दादा दादा, बागेंत तो रामागडी तुमच्या नांवाने बोंबलतो आहे चला'. मी आश्चर्यचकित झालेला पाहून माझा मित्र मोठ्याने हसून म्हणाला— 'भाअूसाहेब, तुम्हांला काय वाटलं तें मी समजलों. पण आमच्या या मुंबअीकर पौत्रमहाशयांना अितकंच म्हणायचं आहे की 'बागेंत रामागडी कांही दाखवायला विचारायला तुम्हांला हाक मारतो आहे, फार तर— मोठ्यानं हाक मारतो आहे. अहो ! पुणं तें पुणं अन् मुंबअी ती मुंबअी ! किती केलं तरी बकाली.'

शब्दप्रयोग ही अशी चीज आहे की त्यांत औचित्य साधलं तर स्वर्ग, नाही तर— काय म्हणूं ! नरक ! हो. स्वर्गाच्या अुलट तोच शब्द रूढ झाला आहे त्याला मी काय करूं ! नरकाअैवजी फार तर 'अधःपात' म्हणेन. तरी शब्द वजनांत भारीच. पण यःकश्चित् शब्दाच्या अुचितपणाला स्वर्ग म्हणणें हें तरी वजनांत भारीच नव्हे का ?

विज्ञानशास्त्राच्या प्रयोगशाळेंत असे नाजुक ताजवे असतात म्हणे, की ते अेका गुंजेच्या अेका सहस्रांशाचें वजन बिनचूक करितात. माणसाचें मनोगत ओळखणारें यंत्र निघालें आहे म्हणतात, त्याप्रमाणे शब्दाचें वजन तोलणारे जोखणारे औचित्यमापक ताजवे बाजारांत मिळतील तर बरें होअील ! पण तें मिळणें म्हणजे अुलट तीहि आपत्तिच ठरेल ! कारण त्यांच्या योगाने

कोणालाहि चूक ठरवितां येअील—मग तो शब्दप्रयोग करणारा कितीहि विद्वान किंवा मार्मिक किंवा जपून बोलणारा पटाअीत असो.

आपण जो शब्दप्रयोग करितों तो प्रसंगाला अुचित असावा अशीच सर्वांची अिच्छा असते. पण साधत नाही अितकेंच काय तें. याचीं कारणें सांगून किती सांगावीं! ती सांगून शिकून येणारी गोष्ट नाही. आणि औचित्याचा पुरा विचार करून मग लिहावें बोलावें, आणि फजिती वांचवावी, असें जो म्हणेल त्याला जन्मभर तोंड मिटून बसण्याचीच पाळी येअील!

यांत कांही दोष शब्दांचा तर कांही बोलणाराचा हें मात्र खरें. अुन्हांत जशी सावली शरीराच्या थोडी मागें तरी पडेल, नाही तर थोडी पुढे तरी पडेल, बरोबर पायाखाली पडणार नाही, पावलांनी बरोबर झाकली जाणार नाही—(भर दोन प्रहरीं सूर्य नक्की डोक्यावर येतो तो अेकच क्षण सोडून) – किंवा लोकमत हें कायद्याच्या थोडें मागें तरी असेल किंवा थोडें पुढे तरी असेल, केव्हाहि बरोबर समव्यास असणार नाही – तीच गोष्ट उचित अिष्ट अर्थ व तो प्रकट करणारे उचित शब्दप्रयोग यांची समजावी.

शब्दप्रयोग करणारांमध्यें नागर व ग्राम्य असा ढोबळ भेद दिसून येतोच; पण सुशिक्षित म्हणविणाऱ्या माणसांमध्येहि सूक्ष्म भेद दिसून आल्यावांचून राहत नाही. लेखांमध्यें जपून लिहिण्याला अवसर सांपडतो. पण त्याचा अुपयोगाप्रमाणे दुरुपयोगहि होतो. पण मनुष्याची उचित शब्द योजनेची खरी परीक्षा प्रायः सहज भाषण करतांना तेव्हाच होते.

समजा, अेका स्नेह्याला दुसऱ्या स्नेह्याच्या घरच्या माणसांची चौकशी करावयाची आहे. ती करितांना 'हे का तुझे वडील' असें त्याने म्हणण्याच्या अैवजी 'हा का तुझ्या आईचा नवरा' असें विचारलें तर शब्दांच्या अर्थामध्ये (नात्यांत) काय बदल झाला! पण वरील प्रश्न ग्राम्यच काय पण त्याच्याहि पलीकडचा ठरेल. खेडवळसुद्धा असा शब्दप्रयोग करीत नाहीत.

पण उलटपक्षीं 'हे का तुझ्या मातोश्रीचे पति!' हा शब्दप्रयोग देखील अगदी सोळा आणे संस्कृत असला तरी अनुचितच ठरेल ना! कोणाला 'वडील' हा शब्दहि अेखादे वेळीं न सुचण्यासारखा होअील. तर त्याने 'हे का तुझे दादा किंवा बाबा' असें प्राकृत म्हटलें तर उचित होअील. मग तो मुलगा आपल्या वडिलांना प्रत्यक्ष बाबा किंवा दादा न म्हणतां भाअु तात्या काका कांही का म्हणत असेना!

व्यवहाराच्या वातावरणांत जितकें जितकें वर जावें तितकें तितकें शब्दप्रयोगाचें औचित्य संभाळणें साधणें कठीण होत जातें. प्रतिपक्षावर टीका करितांना जी अडचण तीच वरिष्ठां संबंधाने बोलतांना. टाकून बोलण्याची मर्यादा सुटली म्हणजे टीकेचा परिणाम अुलट होतो, मात्र तसेंच आदरबुद्धि प्रकट करितांनाहि!

अिंग्रजी बोलण्यांत सराअीत नसणाऱ्या लोकांना He किंवा You या शब्दांचे प्रयोग एकेरी अवमानार्थी वाटतात. म्हणून ते He चें अनेकवचन They वापरतात, पण You हेंच बहुवचन आहे, आणि याच्या पलीकडचें आदरार्थी बहुवचन सांपडत नाही, यामुळे अशा लोकांची फार कुचंबणा होते. Your Honour हा शब्द You च्या अैवजी विनाकारण लावणारे लोक किती तरी!

संबोधनापलीकडे जाअून तात्पर्य प्रकट करण्याच्या प्रांतांत गेलों म्हणजे तर फारच गमती आढळतात. याचें अेक खरोखरचें अुदाहरण परवा मिळालें. × × × गांवीं कांही दिवसांपूर्वी अेक नवीन क्लब स्थापावयाचा होता म्हणे. मंडळी जमली. क्लब स्थापावयाचा ठरलें. कागद घेअून त्याचे नियम लिहिण्यास प्रारंभ झाला. क्लबाच्या अध्यक्षपदीं अेका 'बडा घर पोकळ वासा'

अिनामदारांची योजना झाली. आपला क्लब राजनिष्ठ आहे हें या नियमांत दर्शविण्याचें त्यांच्या मनांत होतें. तें प्रकट करितांना त्यांनी खालील नियम म्हणून सुचविला. 'हल्ली अिंग्लंडच्या गादीवर जॉर्ज राजे बादशहा आहेत ते मरतील त्या दिवशीं क्लबाला सुट्टी देण्यांत येअून दुखवट्याचा ठराव करण्यांत येअील. घाला हा पहिला नियम म्हणून. बाकीचे मग!'

'अहो असा नियम करावा लागत नाही. शिवाय हे शब्दहि अुचित नाहीत' असें म्हणून पुष्कळ जणांनी पुष्कळ रीतींनी त्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. पण या पहिल्याच आपण सुचविलेल्या नियमाला तुम्ही हरकत घेतां, तेव्हा तुम्ही लोक मनांतून राजद्रोही आहां, तुमचें माझें पटायचें नाही केव्हांहि, असें म्हणून हे गृहस्थ अध्यक्षपदाचा राजीनामा देअून निघून गेले म्हणे. आतां बोला!

अेवढा शब्दचतुर बर्नार्ड शॉ. पण तो कबुली देतो ती पाहा. 'I am well aware that I do not express myself with exactibility. A common man has more thoughts than words."

दोन हजार वर्षांपूर्वी बायबल (जुना करार) या ग्रंथांत अुचित शब्दप्रयोगाची प्रशंसा खालीलप्रमाणे केलेली आढळते.

'A word *fitly* spoken is like apples of gold in baskets of silver.'

'अुचित शब्द म्हणजे रुप्याच्या परडींत सुवर्णाची फळें'! आणि बायबल म्हणजे अीश्वराचा शब्द! 'अेकः शब्दः सम्यक् ज्ञातः सम्यक् प्रयुक्तः स्वर्गे लोकेकामदुघ् भवति' असें मीमांसक म्हणतातच.

पण कित्येक वेळां शब्दांची कसरत करावी लागते ती अुचित समर्पक शब्द मुद्दाम टाळण्याचीच करावी लागते. परवां माझा अेक मित्र आपल्या गमतीच्या अनुभवाची गोष्ट सांगत होता. त्याने आपल्या आयुष्याचा विमा अुतरला. विमा अुतरण्यांत मर्म हें असतें की पॉलिसीने ठरविलेली रकम अकालीं मृत्यु झाला तर वारसाला मिळायची असते. या वारसाला 'बेनिफिशिअरी' म्हणतात. माझ्या मित्राने आपल्या पॉलिसींत बेनिफिशिअरी म्हणून आपल्या बायकोचें नांव घातलें होतें. तांबडा चांद लावलेला मोठा पॉलिसीचा कागद टेबलावर पडलेला पाहून हा कागद कसला असें त्याच्या बायकोने विचारलें, तेव्हा त्याने 'पॉलिसी'चा सरळ अर्थ तिला सांगितला. त्यांत नवऱ्याच्या मृत्यूचे शब्द आले ते अैकतांच ती रडूं लागली. म्हणाली 'असले अभद्र शब्द घातलेला कागद मी फाडून टाकीन' । तिची समजूत घालतां घालतां त्याला पुरेवाट झाली. तेव्हा तिच्या समजुतीकरितां मी तो कागद परत करतों असें त्याने वचन दिलें. आणि मग दुसरा अेक बिनचांदाचा आणून त्याचा अर्थ त्याने या शब्दांनी सांगितला—'या कागदांत लिहिलेली रकम मीं नको म्हटली तर ती तुला द्यावी.' पैसे नको म्हणण्याची वेळ कोणालाहि मृत्यूनंतर यावयाची हें उघड! पण या शब्दांनी त्या भोळ्या जीवाची समजूत पटली. ही शब्दांची कसरतच नव्हे काय? Understatement ऊनोक्ती हा अेक उचित शब्दयोजनेचा प्रकार शिष्टसंमत आहे. पण त्याची लबाडी तेव्हाच कळून येते. (याचीं उदाहरणें देऊन केलेली चर्चा माझ्या 'हास्य विनोद मीमांसा' या ग्रंथांत वाचकाला सापडेल.)

असो. 'कसरत' यशस्वी केव्हा म्हणावयाची? तर स्वतः कसरतवाल्याचें किंवा अितर कोणाचें कांही न दुखतां, न खुपतां, न मोडतां आणि अितकें करूनहि झोकदार सुंदर व परिणामकारक रीतीने संकल्पित शारीरिक खेळ पार पडेल तेव्हा. मला वाटतें की शब्दांच्या कसरतीच्या यशाचें अेकच लक्षण किंवा खूण म्हणून संस्कृत साहित्यशास्त्रकारांनी तिला 'औचित्य' हें नांव दिलें आहे.

क्षेमेंद्र म्हणून अेक बडा साहित्यशास्त्री होअून गेला. त्याने औचित्यविचारचर्चा म्हणून अेक प्रबंध लिहिला आहे. त्यांत औचित्यगुणाला फार महत्त्व दिलें आहे, आणि त्याचा भंग करणारे म्हणून अनेक दोष सांगितले आहेत. कसे अगदी सोदाहरण ! हे सर्व दोष टाळून काव्य करील तो धन्य खरा ! जसा पेटलेल्या कळ्यांतून अंग कोठेहि न भाजतां अुडी मारील तो. किंवा आट्यापाट्यांच्या खेळांत मार न खातां खालवर जाअून दहा पाट्या ओलांडून लोण कडेला पोचवील तो.

असो. क्षेमेंद्राच्या औचित्याच्या महत्त्वाची कल्पना येण्याकरिता त्याचीं कांही वचनें सांगतों. तो म्हणतो—

काव्यस्यालं अलंकारैः किं मिथ्यागणितैः गुणैः
यस्य जीवितमौचित्यं विचिन्त्यापि न दृश्यते
अलंकारास्त्वलंकारा गुणा एव गुणाः सदा
औचित्यं रससिद्धस्य स्थिरं काव्यस्य जीवनम्
औचित्यरचितं वाक्यं सततं संमतं सताम्
सगुणत्वं सुवृत्तत्वं साधुता च विराजते
काव्यस्य सुजनस्येव यद्यौचित्यवती क्रिया

औचित्यभंग करणाऱ्या दोषांचें स्वतंत्र विवेचन क्षेमेंद्राने केलेलें नाही, त्याने फक्त उलटसुलट अुदाहरणें दिलीं आहेत. पण साहित्यशास्त्रांत जे काव्यदोष म्हणून सांगितले आहेत त्यांतील कांही प्रस्तुत विवेचनास लागू पडतात.

असो. या विषयाची स्वतंत्रपणें मांडणी करावयाची तर ती मी अशी करीन :—

शब्दांची कसरत




हा वंशवृक्ष अितर कोणा चिकित्सकाला वेगळ्या रीतीने मांडतां येणार नाही असें मी म्हणत नाहीं. पण शब्दांच्या कसरतींतील गुणदोषांची मांडणी वरीलप्रमाणे कल्पून केवळ माझ्या दृष्टीने थोडी चर्चा करितों.

शब्दांची कसरत यशस्वी झाली असें मी केव्हा म्हणेन ? तर वर दर्शविलेल्यापैकी जास्तींत जास्त गुण जेव्हा प्रकट झालेले आढळतील, व जास्तींत जास्त दोष जेव्हा टळलेले दिसतील तेव्हा !

आता प्रथम जोडीदार गुणदोष म्हणून सत्य-असत्य हे घेअूं. सत्य हें अेनजिनसी सुवर्ण आहे. त्यावर कोणताहि संस्कार न झाला किंवा त्याला कोणतेंहि अलंकारिक रूप न दिलें तरी त्याचें स्वतंत्र मूल्य म्हणून कांहीं असतेंच. पण सत्याला कांही शिष्टसंमत नीतिसंमत मर्यादाहि असतात. या मर्यादा त्याने संभाळलेल्या बऱ्या. पण त्या मर्यादांचा सूक्ष्म विचार असत्याच्या दोषाच्या चर्चेच्या वेळीं योग्य ठरेल. युधिष्ठिराची ख्याति केवळ तो सत्यवक्ता येवढ्यावर आहे. अेरवी तो कसा भोळा, जवळ जवळ मूर्ख, वंचनासुलभ, भित्रा, अव्यवहारी होता हें सर्व महाभारतांत दिसून येतें. असत्य हें सत्याच्या विरुद्ध होय. तथापि त्या दोहोंमधील मर्यादा

अितक्या सूक्ष्म आहेत की अिकडचा पाय तिकडे केव्हा पडेल हें लक्षांतहि येणार नाही. असत्याचें समर्थन अत्यंत अुच्च भूमिकेवरून करणारेहि लोक म्हणतात की 'अीश्वर हा जितका सत्यस्वरूप तितकाच असत्यस्वरूपहि आहे'. प्रकाश व अंधकार हीं जशी परस्परपूरक तशींच सत्य व असत्य हीं होत. तथापि साहित्यिक दृष्ट्या औचित्य लक्षांत घेतांना असत्याची व्याप्ति जितकी थोडी व त्याकडून सत्यावर अतिक्रमण जितकें कमी होअूं देतां येअील तितकें चांगलें असेंच म्हणावें लागतें.

पण नुसतें सत्य घेतलें तर तें औचित्यसर्वस्वाला पुरे पडत नाही. तें समर्पक असावें लागतें. समर्पक म्हणजे (१) तर्कशुद्ध, (२) सर्वांगस्पर्शी, (३) अनुकूलसमर्थक, व (४) प्रतिकूलभंजक असें असावें.

समर्पकपणा हा जसा औचित्याचा अुपांगभूत गुण तसाच असंबद्धता हा त्याचा दोष होतो. स्वतःपुरत्या सत्य असणाऱ्या गोष्टीहि संयुक्त रीतीने असंबद्ध ठरूं शकतील ! आणि असंबद्धता दृग्गोचर झाल्याबरोबर औचित्याची घडी विघडते. सत्य व समर्पक असेहि शब्द पण ते सत्प्रवृत्तिप्रेरित असलेले चांगले. सत्प्रवृत्ति हा सर्व नीतीचा पाया होय. आणि जेथे मुळांत हेतु वाअीट, तेथे शब्द कितीहि सत्य व समर्पक असले तरी ते अनुचितच.

सत्य हें समर्पक व सत्प्रवृत्त असतां तें परिणामकारक होणें हें त्याच्या सौंदर्यावरहि अवलंबून आहे. सुंदर म्हणजे सामान्यतः चित्तानंददायक. रसनिष्पत्ति व अलंकाराभरण हीं शब्दसौंदर्याची दोन मुख्य अंगें आहेत. सौंदर्याचा मोहकता हा जो गुण तो तर अलंकारांनीं साधतोच, परंतु बुद्धिद्वारा ज्ञानप्राप्ति होण्याला अलंकारांचा फार अुपयोग होतो. या अलंकारांपैकी अुपमा रूपक व दृष्टान्त हे मुख्य असतात. अुपमेचें साम्राज्य तर कोठेहि अबाधितच आहे. जें ठाअूक नाही तें ठाअूक करून देणें हाच ज्ञानवृद्धीचा मार्ग. पण जें ठाअूक नाही तें लक्षांत येण्याला जें ठाअूक आहे त्याचीच मुख्यतः मदत घ्यावी लागते. जसा प्रवाशांना वाटाड्या. अगदी पहिलें ज्ञान जन्मसिद्ध असेल. पण त्यापुढचें सर्व ज्ञान या पहिल्या ज्ञानाचा अनेकांगी अुपयोग करूनच होतें. प्रत्यक्ष, अनुमिति, उपमिति व शब्द हीं ज्ञानाचीं चार प्रमाणें मानतात. पैकी उपमिति याचाच सर्वांत मोठा अुपयोग आहे असें सिद्ध करितां येअील.

औचित्याच्या अंगभूत गुणासंबंधाने हें विवेचन थोडक्यांत झालें. पण औचित्याचा भंग करणारे जे दोष त्यांचाच विचार अधिक महत्त्वाचा ठरेल. रत्नागिरी साहित्य संमेलनानंतर जो वाद झाला तो अमक्या वृत्तपत्राच्या किंवा लेखकाच्या किंवा वक्त्याच्या लेखांत, भाषणांत, वर सांगितलेले औचित्यगुण किती प्रमाणांत, अेकाहून दुसऱ्यांत अधिक आहेत हें पाहण्याच्या ठरविण्याच्या दृष्टीने झाला नाही. अुदाहरणार्थ, कोणीं असें विचारलें नाही की सत्यकथनाचा गुण 'लोकशक्ती'त अधिक आहे कीं 'हरिजनां'त अधिक आहे ? किंवा समर्पकतेचा गुण 'विविधवृत्तां'त अधिक कीं 'नवयुगां'त अधिक ! किंवा 'सत्प्रवृत्तते'चा गुण 'अुद्यमां'त अधिक आहे कीं 'पुरुषार्थांत' अधिक आहे ! किंवा, सौंदर्याचा गुण फडक्यांच्या कादंबऱ्यांत अधिक कीं खांडेकरांच्या कादंबऱ्यांत ! खरें बोलावयाचें तर रत्नागिरी साहित्य संमेलनानंतर झालेल्या चर्चेत कोणाच्या लेखांत किंवा भाषणांत अुपरिनिर्दिष्ट दोषांपैकी कोणता दोष अधिक भरेल यावर मात्र वाद झाला. अेकादृष्टीने हें पूर्वाचार्यांच्या परंपरेला धरूनच आहे !

कारण काव्याची व्याख्या मम्मटाचार्य काय करतो पाहा. ती अशी— 'तददोषौ शब्दार्थौ सगुणौ अनलंकृती पुनः क्वापि'. शब्दार्थांना काव्य ही पदवी येण्याला पहिली अट ही की ते

अदोष (दोषरहित) असले पाहिजेत. ते निर्दोष असून शिवाय गुणयुक्तहि असले तर अधिक चांगलें. मग ते अलंकृत नसले तरी अेकवेळ चालेल. प्रस्तुत वादांत जे कोणते दोष कोणा लेखकाच्या वक्त्याच्या अंगीं अितर कोणापेक्षा अधिक आहेत अशी चर्चा झाली ते दोष मीं वर सांगितलेले हेच होत. म्हणजे असत्य, असंबद्धता, दुष्टत्व, ग्राम्यत्व व अश्लीलत्व. पण त्यांतूनहि शेवटचे तीन.

व्यक्तिनिंदा हा दोष दुष्टत्वाखाली येतो. त्याची चर्चा पुण्यांतील वादांत खूप झाली. या दोषाचीं अुदाहरणें ग्रंथांतून कोणीं काढून दाखविलीं नाहीत. त्यासंबंधीं अुदाहरणें म्हणून वर्तमानपत्रांकडे दिग्दर्शन करण्यांत आलें. ग्राम्यत्व अश्लीलत्व यांच्या अुदाहरणांकरिता मात्र वर्तमानपत्रांप्रमाणे ग्रंथांचाहि अुपयोग करण्यांत आला होता. हीं अुदाहरणें देतांना अनेक लेखकांचीं वक्त्यांचीं नांवें घेण्यांत आलीं. अुलट, आक्षेपांना प्रत्युत्तरें देण्यांत आलीं. पण हे दोष खरोखरच कशामुळे घडतात याची मानसचिकित्सा व्हावी तितकी शास्त्रीयदृष्ट्या झाली नाही. आणि अुपाययोजना सुचविली गेली ती तर माझ्या मतें मुळीच फलप्रद होणारी नाही. कारण असले प्रश्न मनुष्यमात्राचा स्वभाव सुधारण्यावर अवलंबून आहेत. ती सुधारणा होणें हें तर राहोच, पण दुष्ट मनःप्रकृति न सुधारली तरी निदान तज्जन्य अपराध तरी न घडावे या दृष्टीने राज्यसंस्थेचें नियंत्रण अुपयोगी पडतें, तसें कोणतेंहि नियंत्रण साहित्यक्षेत्रांत अुपलब्ध होत नाही. परवां पुण्यातील अेका संमेलनांत अेक परीक्षक किंवा नियंत्रक मंडळ म्हणून नेमण्यांत आलें. पण त्याच्या हातून कांही अेक कार्य होअील असें मला वाटत नाही. जेथे बेअब्रू करणें हा शिक्षाई अपराध ठरविणारा फौजदारी कायदा धुडकावून लावण्यांत येतो, किंवा त्याने आपलें काम केलें तरी त्याचा वचक बसून पुढील त्या स्वरूपाचे गुन्हे टळत नाहीत, तेथे खासगी निरीक्षक किंवा नियंत्रक मंडळें काय कामाचीं! सामाजिक बहिष्कार हें शस्त्रहि ग्रामण्याप्रमाणे आता बोथट झालें आहे. क्वचित्प्रसंगीं कोर्टाची पायरी चढण्यापेक्षा स्वतःच्या हातांत कायदा घेअून प्रतिपक्षीय निंदकाला शिक्षा करावी असा मोह होतो. पण तेंहि सोपें नाही. शेवटीं येअून जाअून लोकमताची भीति येवढेंच खरें नियंत्रण अुरतें. पण 'लोक' या शब्दाची हल्लीची खरी व्याख्या लक्षांत घेतली असतां, यापुढे असत्य, असंबद्धता, दुष्टत्व, ग्राम्यत्व, अश्लीलत्व यांचेंच पाअूल पूर्वीहून पुढे पडेल अशी भीति वाटते.

कित्येकांना वाटतें की, स्वतः अेखादें दोषवर्जित असें चांगलें अुदाहरण घालून देणें—म्हणजे, अनुकरण होण्यासारखा, चांगल्यांचा नमुना निर्माण करून तो असन्मार्गीयांच्या व अितर जनतेच्या दृष्टीपुढे ठेवणें— हा विधायक अुपाय सर्वोत्कृष्ट. हें करणारा भेटला तर तो सर्वांच्या स्तुतीला पात्र होअील यांत शंकाच नाही. पण याकरिता लागणारे श्रम व स्वार्थत्याग करणारे कितीसे भेटतील!

औचित्याला बाधक होणारे दोष, ग्रांथिक किंवा वृत्तपत्रीय वाङ्मयांत, प्रकट होण्याचें अेक कारण मनुष्यस्वभाव हें जें वर सांगितलें त्याच्या जोडीला दुसरेंहि अेक कारण असतें. तें म्हणजे आर्थिक गरज किंवा मोह. पण त्यांतल्या त्यांत मी या दुसऱ्यापेक्षा पहिल्यालाच अधिक निर्णायक महत्त्व देतों. साहित्याला, अेका लहानशा मर्यादेपलीकडे, धंद्याचें स्वरूप येतें हें खरें आहे. त्याचा अर्थ असा की, ग्रंथ किंवा वृत्तपत्र प्रकाशनाने खूप पैसा मिळवावा, पण तें न घडलें तरी निदान त्यानें आपला खर्च आपण भागवावा, अशी लेखकाला अिच्छा असते. लेखकाच्या अितर पैशावर तरी निदान त्याचा बोजा भूर्दंड पडूं नये. पण ही गोष्ट प्रकाशित वाङ्मयाच्या खपावर अवलंबून राहते. हा खप लोकांच्या अभिरुचीवर अवलंबून राहतो. आणि

ज्या वाङ्मयांत चटकदारपणा, चित्ताकर्षता अधिक तें घ्यावें वाचावें असें ग्राहकांच्या अभिरुचीचें वळण राहतें. यामुळे वाङ्मयप्रकाशनाने द्रव्यलाभ व्हावा किंवा त्याचा खर्च अंगावर पडूं नये हा हेतु साधावयाचा तर तें वाङ्मय चित्ताकर्षक करावें, मसालेदार करावें, असें लेखकाला वाटणें स्वाभाविक आहे. 'जशी मागणी तसा पुरवठा' हा अर्थशास्त्राचा नियम यांपुरता खरा आहे. पण माझ्या मतें हा नियम फक्त कांही मर्यादेपर्यंतच प्रभावी होतो. त्यापुढे तो तसाच लागू पडत नाही. तेथून पुढे मनुष्याचा खरा स्वभावच प्रभावी होतो. म्हणजे आपलें वाङ्मय आपण केलें याहून अधिक चित्ताकर्षक करावयाचें तर तें अधिक सदोष करावें लागेल, अशी जाणीव उत्पन्न होतांच कांही लेखक तेथेच थांबतील. पण कांही लेखक वाटेल तितका दोष हातून घडत असला तरी चालेल असें म्हणून—म्हणजे दोषाला मनाची मर्यादा न घालतां—मागणीप्रमाणे पुरवठा पार पाडतील. या दोन लोकांत जो फरक त्याचा खुलासा अर्थशास्त्राने न होतां फक्त मानसशास्त्रानेच करितां येतो.

मी अेक अुदाहरणच देतों. माझे गुरु कै. वासुदेवशास्त्री खरे यांना पुढेंपुढें संसारखर्चाला पगारापेक्षा अधिक पैशाची गरज भासली व नाटकें लिहिण्याने तो वरा मिळेल असें लक्षांत आलें. तेव्हा आपल्या अितिहासकार्यांतला कांही वेळ काढून त्यांनी नाटकें लिहिण्याकरिता किंचित् नाखुषीने लेखणी हातीं घेतली. पण त्यांना नाटकें लिहून मागणाऱ्या संभावित अशा महाराष्ट्र नाटक मंडळीच्या अेवजी दुसरी अेखादी नाटक मंडळी, पण तमासगीर, अशी भेटती तर पैशाकरिता खरेशास्त्र्यांनी तमाशे लिहून दिले असते काय! नाही. दुसरें एक अुदाहरण थोडें वेगळ्या प्रकारचें देण्यासारखें आहे. माझे स्नेही रा. माधवराव जोशी हे नाटकें लिहिण्याकडे वळले ते पैसे मिळविण्याच्या अिच्छेमुळे किंवा जरुरीमुळे असें मुळीच नाही. तर ते नाट्यव्यवसायाचे पुरे शोकीन म्हणून. प्रथम त्यांनी अेकदोन पौराणिक नाटकें लिहिलीं. पण तीं लोकप्रिय होअीनात. तेव्हा मग त्यांनी विनोदी नाटकें लिहिण्यास प्रारंभ केला, व मग त्या प्रकारांत त्यांनी किती यश व पैसा मिळविला हें प्रसिद्धच आहे. आता खरेशास्त्री यांना पैशाची जरुरी असतां त्यांच्या नाट्य विनोदाची जात कोणती होती, व जोशी यांना पैसे मिळविण्याची तितकी जरुरी नसतां ती जात कोणती होती! या दोन नाटककर्त्यांच्या विनोदाच्या जातींत जो फरक दिसून पडला तो कशामुळे! अर्थातच मनुष्यस्वभावामुळे, भिन्न अभिरुचीमुळे. याला कारण आर्थिक मोह नव्हे.

सांगण्याचें तात्पर्य अितकेंच की वाङ्मयाचा औचित्यभंग करणाऱ्या दोषांच्या (असत्य, असंबद्धता, दुष्टत्व, ग्राम्यत्व, अश्लीलत्व) बाबतींत ज्यांची मनाची मर्यादा ठरलेली असते, ती ते कोणत्याहि कारणाकरिता उल्लंघित नाहीं. अुलट ज्यांची ही मर्यादा ठरलेली नसते त्यांच्यापासून बंधनाची अपेक्षाच करूं नये. ते द्रव्यलोभाने ते दोष करतीलच, पण तसें काही मोहाचें कारण नसतांहि केवळ आपली हौस पुरविण्याकरिता देखील ते ते दोष खुशाल आचरितील.

पुण्यास झालेल्या वादांत दुष्ट, ग्राम्य, अश्लील या शब्दांच्या व्याख्या करण्याचा प्रयत्न कोणीं केला नाहीं. याचा अर्थ त्या व्याख्या सर्व लोक आपल्या मनाने जाणतातच. म्हणजे अनिष्टता ही जात ठरली. पण तींतील पोटजात, प्रत, दर्जा, हीं मात्र ज्याच्या त्याच्या मताप्रमाणें वेगळीं असणार. घाण पाहिली म्हणजे कोणी नुसतें तोंड फिरवितात, दुसरे कोणी खिशांतला हातांतला सुवासिक पदार्थ हुंगतात, तिसरे कोणी नाकाला पदर लावतात, चवथ्या कुणाला थुंकल्याशिवाय राहवत नाहीं. विषय तोच असतां परामर्श प्रकारावरून परामृष्ट पदार्थाविषयीचें परामर्शकाचे आत्मगत मत ठरवितां येतें तसेंच या दुष्ट, ग्राम्य, अश्लील यांचें समजावें.

त्यांतल्या त्यांत या तिघामध्यें फरक असा आहे कीं ग्राम्य व अश्लील लिहिणारा बोलणारा फक्त स्वतःच्या हीन संस्कृतीचें प्रदर्शन करितो. पण व्यक्तिशः अितरांना दुखवीत नाही. पण दुष्ट मनाचा व्यक्तिनिंदक हा दुसऱ्याला दुखवून शिवाय आपल्या हीन अंतःकरणाचें प्रदर्शन करितो. तथापि व्यक्तिनिंदेपेक्षाहि ग्राम्यता अश्लीलत्व हें अधिक अनिष्ट. कारण तें वाङ्मय लहान मुलां-मुलींच्या स्त्रियांच्या हातीं पडल्यामुळे त्यांची अभिरुचि बिघडते. व्यक्तिनिंदा बेसुमार व अ-समर्थनीय असल्यास त्याची दाद न्यायकोर्टांत लावून घेण्याला ज्याचा तोच पुढे येतो. पण सर्वांचे कार्य तें कोणाचेंच नाही या न्यायाने ग्राम्य व अश्लील हा सार्वजनिक अपराध असल्या-मुळे पुढे होअून त्याचा प्रतिकार करण्यास कोणी येत नाही. आणि आला तरी तें काम त्याला जड जातें.

---

## स्त्रियांच्या म्हणी

(५४ व्या अंकावरून पुढे)

(४७४) कानीं ना केशीं, जोडव्याकांकणांला पैसा नाशी.
(४७५) घरांत नाही नेणतें, अन् म्हातारी रांगते.
(४७६) पतीचें (पत असलेलें) कूळ, दमडीचा गूळ.
(४७७) पाहुण्याला आग्रह मोठा, माडगें (कुळदाचें पिठलें) खायला अुठा.
(४७८) घरांत नाही दाणा, विजापूरचें दांतवण आणा.
(४७९) सोंग सजवलें, दडपून निजवलें.
(४८०) नांवाजलेली गुरवीण देवळांत मुतली.
(४८१) ज्याने न देखिला दिवा, त्याने देखिला कुंभाराचा आवा (भट्टी).
(४८२) गांवांत नाही झाड, अेरंडाला आला पाड.
(संस्कृत समानार्थी— निरस्तपादपे देशे अेरंडोऽपि द्रुमायते।)
(४८३) सैर (स्वैर) सांगतें, भैर (बहिरें) अैकतें.
(४८४) अुण्याला भरती, गाढवाला आरती.
(४८५) फिरेल फाळ तर जाअील काळ.
(४८६) पाटलाचे घोड्यावर म्हार नटे.
(४८७) गूण तारी, गूण मारी, गुणाअितका कोण वैरी!
(४८८) गरिबांचा काळ, संभूतांचा (श्रीमंतांचा) प्रतिपाळ.
(४८९) वाघ बसला झाळीं, नि केलडें (माकड) दाखवितें नाळी.
(४९०) अुंदीर मावेना बिळांत अन् शेपटीला बांधतो सूप.
(४९१) भेरा मागें तेरें (रानअळू), तो म्हणे माझें तुणतुणेंच खरें.
(४९२) पाहिला भट नि घातला दंडवत.
(४९३) अळणी खाती, फोडणी मागती.
(४९४) बायको ओळखावी बाथ्यावरून, घर ओळखावें जोत्यावरून (बाथा--ओटीपोट).
(४९५) धर्मार्थ दिलें नेसायला अन् परसांत गेली मोजायला.

ट्रे. कॉ., पुणें. }
१५ जून १९४०. }

नीळकंठ शंकर नवरे

म. सा. प. (१३-३-२)

अनुक्रमणिका

# प्रि. वैजनाथ काशीनाथ राजवाडे

[लेखक— श्री. नारायण गोविंद चापेकर]

प्रो. वैजनाथ काशीनाथ राजवाडे ह्यांचा सत्कार पुण्यांतील अनेक संस्थांनी नुकताच केला. प्रो. राजवाडे ह्यांची विद्वत्ता हेंच ह्या सत्काराचें प्रमुख कारण असलें पाहिजे असें मी समजतों. त्यांच्या वाढदिवसाचा संबंध सत्काराशीं जोडलाच पाहिजे असें मला वाटत नाही. प्रो. राजवाडे ह्यांचा जन्म फाल्गुन शु. ५ शके १७८१ सोमवार ह्या दिवशीं झाला. अर्थात् गेल्या फाल्गुनांत त्यांच्या वयाचीं ८० वर्षें पुरीं झालीं. ८१ व्या वर्षी एकसष्टी साजरी करण्याची कल्पना उत्पन्न व्हावी ह्याचें कारणच राजवाड्यांची विद्वत्ता लोकांच्या डोळ्यांत आता भरली हें होय. राजवाड्यांचा मोठा ग्रंथ म्हणजे निरुक्ताचें भाषांतर. हा १४०० पृष्ठांचा ग्रंथ त्यांच्या ७६ व्या वर्षी प्रसिद्ध झाला. वृद्धावस्थेंत जन्म पावलेल्या ह्या शेंडेफळांत राजवाड्यांच्या शरीराची व बुद्धीची धमक व चमक व्यक्त झालेली आहे. आयुष्याच्या आठव्या व नावव्या दशकांत अशीं बुद्धीचीं व कष्टाचीं कामें फारच क्वचित् होत असतात. परंतु हेंच काम राजवाडे आपल्या उमेदीच्या दिवसांत कां करूं शकले नाहीत असा प्रश्न येथें कोणालाहि सुचल्याशिवाय राहणार नाही. जित राष्ट्रांत प्रत्येकाला आपल्या शरीराचा व बुद्धीचा पोट भरण्याच्या कामीं फाजील व्यय करावा लागतो; हें ह्या विपरीत घटनेचें मुख्य कारण आहे असें दिसतें.

राजवाडे सन १८८६ सालीं एम्. ए. झाल्याबरोबर त्यांना पोटाचा व्यवसाय पतकरावा लागला. कराचीच्या डी. जे. कॉलेजांत स. १८८७ पासून ते प्रोफेसर म्हणून काम करूं लागले. तेथे ते १८९६ च्या फेब्रुवारीपर्यंत होते. तेथून ते पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्ये आले. तेथे त्यांनी २० वर्षें काम केलें; आणि १९१६ मध्ये सेवानिवृत्त झाले. फर्ग्युसन कॉलेजमध्ये राजवाडे प्रिन्सिपॉल होऊं शकले नाहीत; परंतु सुरतेस कॉलेज निघाल्यावर तेथे त्यांना प्रिन्सिपॉल होण्याचा मान मिळाला. सन १९२१ ते १९२५ पर्यंत राजवाडे एम्. टी. बी. आर्ट्स् कॉलेजचे प्रिन्सिपॉल होते. सारांश, आयुष्याचीं ३३ वर्षे उपजीविकेचा धंदा करण्यांत घालवावीं लागलीं; आणि राजवाडे जेव्हा कायमचे कार्यनिवृत्त झाले तेव्हा, त्यांच्या वयाला ६६ वर्षें होऊन गेलीं होतीं. तथापि प्रोफेसरीच्या काळांत राजवाडे ह्यांना ग्रंथनिष्पत्ति करतां आली नसती असें मला वाटत नाही. राजवाड्यांची बुद्धि प्रखर आहे. प्रखर बुद्धीच्या माणसाला शिकवण्याचें काम संभाळून सुद्धा ग्रंथनिर्मितीचा उद्योग साधला असता. परंतु राजवाड्यांचा स्वभाव ह्याला जबाबदार आहे असें मला वाटतें. राजवाडे सरळ अथवा एकमार्गी आहेत. अशीं माणसें कोणत्या तरी एका कामाला आपल्याला वाहून घेतात. शिक्षकाचें काम होतें तावत्काल त्याच कामांत सर्वथैव व्यापृत राहण्याखेरीज दुसरा विचार मनांत येण्याचें कारण नव्हतें. तें काम संपतांच बुद्धि स्वस्थ बसूं देत नाही म्हणून दुसरें काम सुचलें.

अनुक्रमणिका

८० वर्षेपर्यंत राजवाडे जगले नसते तर निरुक्ताचें भाषांतर मराठी भाषेला अितक्यांत तरी अुपलब्ध झालें नसतें. ह्यावरून नुसत्या दीर्घकाल जगण्याचें महत्त्व कमी लेखतां येणार नाही हें अुघड आहे. सद्गुणांवांचून दीर्घायुष्य लाभणें फारसें संभवनीय नाही. निर्व्यसन, नियमितपणा, बौद्धिक व्यासंग, निष्पाप मन ह्यांच्या साहाय्याव्यतिरिक्त दीर्घायुष्य लाभणें कठीण आहे. तेव्हां ह्या गुणांसाठीहि राजवाड्यांचें अभिनंदन करणें योग्यच होअील. अपमृत्यु किंवा अकालीं मृत्यु हा पुष्कळ वेळां अयुक्ताचरणानें येतो. "अयुक्ताचरणान्नियमकाले मरणं ध्रुवम्"; ह्या वचनांत सत्याचा अंश बराच आहे ह्यांत संशय नाही.

राजवाड्यांचें लिखाण विशेष आहे असें नाही. जें कांही त्यांनी लिहिलें आहे त्याचें बीज त्यांच्या कांही तरी करावें ह्या अिच्छेंत आहे. तुमचा आवडीचा विषय कोणता, असें सुशिक्षितांना विचारल्यास फारच थोड्यांना अुत्तर देतां येअील. कोणत्या तरी विषयाची आवड अुत्पन्न करणें हा प्रचलित शिक्षण पद्धतीचा अुद्देशच नाही. त्यामुळे जें कांही लिखाण होतें तें प्रवाहपतितासारखें होतें; आणि म्हणून कोणत्याहि लिखाणांत ओजस्विता फारशी आढळत नाही.

किरकोळ निबंधवजा लिखाण प्रो. राजवाड्यांनी लिहिलें आहे. परंतु त्यांचा लौकिक वाढण्यास निरुक्ताचें मराठी भाषांतर व ऋग्वेदांतील शब्द हे दोन ग्रंथ विशेषतः कारणीभूत झाले आहेत. पैकी दुसरा ग्रंथ इंग्रजींत आहे. ह्याशिवाय निरुक्ताच्या पहिल्या तीन अध्यायांचें विवरणहि त्यांनी अिंग्रजींत केलें आहे. ऋग्वेदांतील शब्द ह्या त्यांच्या ग्रंथावर चोहींकडून टीकेचा भडिमार झाला. एकाहि टीकाकारानें ह्या ग्रंथाला बरें म्हटलें असेल असें वाटत नाही. ऋग्वेदांतील सुमारें २० शब्द घेऊन त्यांचा अर्थ लावण्याचा प्रयत्न ह्या ग्रंथांत राजवाड्यांनी केला आहे; आणि ह्या प्रत्येक शब्दाचा अर्थ धन अथवा संपत्ति होतो असा त्यांचा आग्रह आहे. परंतु धन शब्दाची व्याप्ति त्यांनी निश्चित न केल्यामुळें त्यांचे परिश्रम अयशस्वी झाले. एकालाहि त्यांचें म्हणणें मान्य झालें नाही. एवढेंच नव्हे तर स्वतः राजवाड्यांनीच पुढें निरुक्ताच्या भाषांतरांत आपली ह्या बाबतींत चूक झाली असल्याचें कबूल केलें आहे. हा कबुली जबाब त्यांच्याच शब्दांत देणें बरें. ते म्हणतात— "यास्क व दुर्ग ओढाताणीचे अर्थ करतात असें मी बरेंच वेळां म्हटलें आहे; पण पुष्कळ ऋचांचा मी धनपर अर्थ केला आहे तोही ओढाताणीचा व कांही ठिकाणीं अगदीं टाकाअू आहे, असें माझें स्वतःचें मत भाषांतर पुनः वाचतांना झालें आहे. पुष्कळ ऋचांत धनपर अर्थ आहे अशा समजुतीने ही ओढाताण झाली आहे." कोण हा प्रांजलपणा ! ज्यांनी आपल्या चुका कबूल केल्या आहेत असे विद्वान जगाच्या अितिहासांत किती सापडतील ? "चित्ते वाचि क्रियायांच प्रज्ञानामेकरूपता !"

निरुक्ताचें भाषांतर हा ग्रंथ राजवाड्यांचें नांव अमर केल्याशिवाय राहणार नाही. त्यांनी ह्या ग्रंथावर पराकाष्ठेचे परिश्रम केले आहेत निरुक्त हें निघंटूचें भाष्य आहे. म्हणून निघंटु ग्रंथहि ह्या निरुक्ताच्या भाषांतरांत छापला असून त्या ग्रंथाचें परीक्षणहि केलें आहे. तदनुरोधानें निरुक्तकारांच्या सिद्धान्तांचें विवेचनहि केलें आहे. सर्वांत अत्यंत महत्त्वाचा भाग म्हणजे ऋग्वेदाचें व्याकरण हा होय. ह्या निबंधाची चर्चा व्हावयास पाहिजे होती तितकी झाली नाही असें मला वाटतें. अेकाच अुदाहरणावरून वाचकांना ह्या विषयाचें महत्त्व समजेल. "शुन्ध्युः (पु.) शुन्ध्यूः (स्त्री.) असे दोन शब्द ऋग्वेदांत आहेतः पुल्लिंगाचें शुन्ध्योः व स्त्रीलिंगाचें शुन्ध्युवः असें षष्ठीचें अेकवचन होतें तें यास्काला व सायणाचार्यांलाहि समजलें नाही." असे

अनेक प्रकार राजवाड्यांनी उजेडांत आणले आहेत. त्यांचा हा निबंध अत्यंत प्रबोधक आहे. ह्यानंतर निरुक्तांत प्रक्षिप्त भाग किती आहे त्याचें विवेचन करून यास्काचा काल निश्चित केला आहे. दुर्ग, यास्क, डॉ. सरूप, डॉ. स्कूल्ड वगैरेंचे प्रमाद स्पष्ट रीतीनें मांडले आहेत. तात्पर्य निरुक्तासाठी प्रि. राजवाड्यांनी अचाट मेहनत घतली आहे. आणि हें सर्व दृष्टि निकामी झाली असतांहि केलें गेलें हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. परंतु शास्त्रलोचन असणाऱ्याला अंध तरी कसें म्हणावें !

असो. आता राजवाड्यांचें वैशिष्ट्य सांगून हा लेख पुरा करतों. प्रथमतः राजवाडे हे स्वतंत्र बुद्धीचे आहेत. वेदासंबंधाने लिहिणाराला ह्या गुणाची अत्यंत अवश्यकता आहे. जणू काय आजपर्यंत कोणी लिहिलेंच नाही असें समजून जरी कोणी ऋग्वेदाला हात घातला तरी त्याचें तें कृत्य सद्यःस्थितींत प्रशंसनीय मानलें जाईल. वेदकाल आपण म्हणतों, पण तो नुसता भ्रम आहे. वेदकाल अेक मानून निष्कर्ष व अनुमानें काढीत बसणें वेडेपणाचें होय. ऋग्वेद व अितर वेद; वेद व ब्राह्मण ह्यांच्या मधील कालखंड फार मोठा आहे. मोठ्या कालाबरोबर प्रचंड स्थित्यंतरेंहि आलींच. अर्थ करतांना ह्या गोष्टींकडे पुष्कळांकडून दुर्लक्ष्य केलें जातें. प्रत्यक्ष ऋग्वेदांतील ऋचांचा रचनाकाल एकसारखा नाही. ही गोष्ट राजवाडे ह्यांनीं लोकांपुढे प्राधान्यानें मांडिली आहे. ह्या दृष्टीनेच वेदांचें व वेदांगाचें संशोधन झालें पाहिजे. ऋग्वेदांत जागजागीं अशुद्धें आहेत असें राजवाड्यांचें म्हणणें आहे. अर्वाचीन कवींच्या श्लोकांप्रमाणे ऋच्या लिहिल्यास अशुद्धें आपोआप ध्यानांत येतात. हा शोध खास राजवाड्यांचा आहे. त्यांच्या मार्गानें जाऊन कोणी तरी संशोधकानें राजवाड्यांच्या सिद्धांतास पुष्टी मिळते की नाहीं हें पाहण्यासारखें आहे. सध्याचा पदपाठहि अर्वाचीन संस्कृतास धरून केला आहे तें बरोबर नाही; ऋचांत शब्द सापडेल तसाच तो पदपाठांत दिला पाहिजे असें आणखी राजवाड्यांचें म्हणणें आहे. हें सर्व त्यांचें म्हणणें सिद्ध म्हणून मानलें नाही तरी संशोधनाची अेक नवी दृष्टि राजवाड्यांनी आपणांस दिली आहे ह्यांत संशय नाही. ऋग्वेद अद्यापि अत्यंत दुर्बोध आहे. भाषांतरें झालीं आहेत पण अर्थबोध मात्र कांही होत नाही. ही गोष्ट निर्विवाद आहे. ह्यास्तव ऋग्वेदाच्या संशोधनाचा निराळा मार्ग आपणांस मिळाल्यास पाहिजेच होता. असा अेक मार्ग राजवाड्यांनी सुचविला आहे ह्यांतच त्यांची विद्वत्ता दिसून येते; हेंच त्यांच्या आयुष्याचें महत्कार्य होय असें मी समजतों. ह्याबाबतींत राजवाड्यांची कामगिरी अपूर्व आहे. त्यांनी स्वतः हें काम करावें असें म्हणणें क्रूरपणाचें होईल. परंतु अेखादा शिष्य बनून त्यानें आपल्या गुरूचें कार्य पुढे चालवावें असें वाटलें तर त्यांत गैर तें काय !

---

# पृथिवीच्या पोटीं हिरा गारगोटी....!

लेखक— {प्रा. सखाराम विनायक आपटे, अेम्.अे., बी.अेस्सी., अिंजिनिअरिंग कॉलेज, पुणें
श्री. त्र्यंबक गोविन्द ढवळे, बी.अे., वेधशाळा, पुणें}

हिरा तो हिरा आणि गारगोटी ती गारगोटी असें म्हणून नेहमीच्या व्यवहारांत आपण गारगोटीकडे किती तुच्छतेने पाहतों! हिरा क्वचित्‌च पाहायला वापरायला मिळतो. गारगोटीसाठी मुद्दाम म्हणून शोधाशोध अशी फारशी करावी लागत नाही. सहज कोठेहि मातींत हात खुपसला किंवा समुद्रकांठच्या वाळूंतली चिमूटभर वाळू अुचलून घेतली तरी हाताला अेखादा गारगोटीचा तुकडा लागतो; त्या वेळीं त्याच्याकडे जेमतेम पाहिलें न पाहिलेंसे करून 'अं: ! गारगोटी ! !' असें म्हणून आपण तो दूर भिरकावून देतों. पण मौज अशी की शास्त्रीय दृष्टीने पाहणारांना गारगोटी हा अेक अत्यंत खेळाडूवृत्तीचा अुपयुक्त पदार्थ असल्याचें आढळून आलें आहे. चार धक्के द्यावेत आणि घ्यावेत हें गारगोटीचें अेक ब्रीद आहे. या तिच्या वृत्तीमुळेच आधुनिक शास्त्रांच्या आघाडीवरच्या, पण व्यवहारोपयोगी म्हणून ज्याला म्हणतां येअील अशा, क्षेत्रांत गारगोटीच्या लहानशा तुकड्यांचा देखील विशेष अुपयोग होअूं लागला आहे. नागपूरच्या सायन्स कॉलेजमधील प्रा. डॉ. वि. ना. थत्ते यांना प्रयोगद्वारा जो गारगोटीचा स्वभावविशेष आढळला त्याविषयी कांही माहिती प्रस्तुत अंकांतच अितरत्र सारांशरूपाने दिली आहे. शास्त्रीय व्यवहारांत दिसून आलेल्या गारगोटीच्या प्रभावाविषयी कांही थोडी मनोरंजक माहिती या लेखांत द्यावयाचें योजलें आहे.

बैठकीच्या आंत स्प्रिंग्ज्– पोलादी वळवटी– असलेल्या अेखाद्या कोचावर आपण झटकन् बसलों म्हणजे थोडा वेळ वरखाली अुशी मिळत मिळत आपण स्थिरावतों. बैठकीच्या तळापासून वेटोळे घेत घेत ही वळवट वर चढत आलेली असते. तिच्या वरच्या भागावर दाब पडतांच ती आंत दबतां दबतां थोडी ताणावते, आडवी रुंदावते. या ताणाच्या रुंदाव्यापासून सुटका करून घेण्याचा तिचा आग्रह असल्यामुळे ती जो प्रतिकार देते त्यामुळेच आपण हेलकावे खातों. समजा, कोचाअैवजी अनेक वळवटी भरलेल्या गाद्यांच्या चवडीवर अुठावशा काढल्या तर प्रत्येक गादीचा थर न् थर अुर्मी आंदोलनें घेअील हें अुघड आहे.

प्रत्येक पदार्थांतच असा थोडाफार अुशीदारपणा असतो. त्यांतल्या कित्येकांत तो सूक्ष्म असल्यामुळे आपल्याला तो भासत किंवा दिसत नाही अितकेंच. गारगोटीच्या अुशीदारपणांत अेक विशेष आहे. तो असा की कांही अेका विशिष्ट रीतीने कापलेली गारेच्या स्वकाची किंवा स्फटिकाची चकती घेतली आणि तिच्या अेका बाजूने– येथे आपण अुभी बाजू कल्पूं– कोणत्याहि प्रकारचा दाब झटाझट घालण्याकाढण्याची किंवा तिच्यावर अनुक्रमें नेट आणि ओढ हीं अेकामागोमाग अेक झपाझप निर्माण होतील अशी सोय केली तर वरच्या अुदाहरणांतल्या गाद्यांच्या थराप्रमाणे, या चकतींतला प्रत्येक पापुद्रेमय थर न् थर अुर्मी आंदोलनें घेत राहील हें तर खरेंच, पण याखेरीज, ह्या चकतीच्या आडव्या बाजूला अतिसूक्ष्म, वैजिक

आंदोलनें निर्माण होत असलेली प्रत्ययाला येतील. म्हणजे असें की गारेचा प्रत्येक थर न् थर जसा अुभा नाचत होता तसेंच या आडव्या बाजूला, डावीकडून अुजवीकडे आणि अुजवीकडून डावीकडे, चवताळलेल्या बंदिस्त वाघाप्रमाणे वीजक, म्हणजे विजेचे कण, मोठ्या समूहाने येरझारा घालतील; भांड्यांत हेंदकाळणाऱ्या पाण्याप्रमाणें अेकदा ते डाव्या बाजूवर येअून आपटतील, मग लगोलग माघारे फिरून अुजव्या बाजूवर जाअून आदळतील. हीं आंदोलनें पुष्कळ वेळपर्यंत तशींच तशींच होत राहावींत अशी अिच्छा असल्यास, लहान मुलांचा पाळणा ज्याप्रमाणे आपण प्रत्येक झोक्यागणिक ढकलतों किंवा ओढतों त्याप्रमाणे योग्य त्या वेळीं चकतीवर नेट किंवा ओढ लावण्याची दक्षता घेतली म्हणजे झालें. या आंदोलनांचा झपाटा– त्यांची 'क्षिप्रता'– प्रत्येक चकतीच्या जाडीवर अवलंबून असतो. अशा रीतीने गारेच्या प्रत्येक चकतीतून कोणत्या तरी अेका निश्चित क्षिप्रतेचीं आंदोलनें निर्माण होत असल्यामुळे 'पत्रिके'च्या मेल्या अंकांतील 'बंबअीसे बोल रहे हैं' या लेखांत निर्देशिलेल्या मुंबअी, कलकत्ता, लखनौ वगैरेसारख्या बिनतारी प्रेषारथानीं (Wireless broadcasting Station) ठराविक क्षिप्रतेचे तरंग निर्माण करण्याच्या कामीं अशा चकत्यांचा अुपयोग होतो.

याच्या अुलट प्रकार देखील या गारेच्या चकतीच्या बाबतींत करतां येतो. तो असा की तिच्या डाव्या अुजव्या अंगांना विजेच्या तारा लावून त्यांच्यामध्ये यातायातिक वहाळ– विजेचा येता जाता प्रवाह, 'अे. सी. करंट'– अुत्पन्न केला की त्या चकतीच्या दोन्ही अंगांना वर सांगितलेलीं वैजिक आंदोलनें निर्माण झालींच. याचा परिणाम त्या चकतीचा थर न् थर अुभा आंदोळूं लागण्यांत होतो. गारेच्या भोंवती हवा असेल तर त्या हवेला सुद्धा हीं आंदोलनें मिळतात. परंतु हवेपेक्षा पाण्यांतून किंवा तेलांतून त्यांचा संचार अधिक सुगमपणें आणि दूरवरपर्यंत होअूं शकतो. या त्यांच्या गुणाचा अुपयोग करूनच गेल्या महा-युद्धाच्या अखेरीस, १९१७ सालीं, फ्रेंच शास्त्रज्ञ प्रा. लँजविन यांनी 'प्रतिध्वनदर्शक– अेकोमीटर– नांवाचें अेक साधन बनविलें. तें जहाजावर असलें म्हणजे त्याच्या द्वारा पाण्याच्या आंतून जाणाऱ्या पाणबुड्या नौका, तरते हिमखंड वगैरे हेरतां येतात.

दूरचे पदार्थ हेरून त्यांचें अंतर निश्चित करावयाचें काम वस्तुतः डोळ्यांचें. अगदी अमावास्येचा काळाकुट्ट अंधार असतांना आकाशांत अेखादें वियद्यान किंवा वियान घिरट्या घालीत असलें तरी देखील अेखाद्या मोठ्या शोधदीपाच्या– सर्चलाईटच्या– मदतीनेंच का होअीना पण त्याचें अंतर निश्चित ठरवतां येतें, पण प्रकाशाचे किरण पाण्यांत फार दूरवर शिरूं शकत नाहीत, त्यामुळे अशा ठिकाणीं डोळ्यांचा अुपयोग होत नाही. डोळे निरुपयोगी ठरतील अशा प्रसंगीं अेरव्हीच्या व्यवहारांत देखील अंतर ठरविण्याचे कामीं कानांचा अुपयोग आपण करूं शकतों. समजा, अेखाद्या नवख्या गांवीं संध्याकाळच्या वेळीं दूरवर फिरावयाला गेलों आणि आपण वाट चुकलों, परंतु जो डोंगर ओलांडून आपण दुसऱ्या बाजूला आलों होतों तो कांही वेळाने अंधुकपणें दिसूं लागल्यामुळे जिवांत जीव येअून तो अद्याप किती दूर आहे हें ठरविण्याची अिच्छा झाली; अशा प्रसंगीं खूप मोठ्यानें अेखादा शब्द ओरडून त्याचा पडसाद अेकूं यावयाला किती वेळ लागतो तें पाहून डोंगराचें अंतर आपण अजमावूं शकतों. पूर्वीच्या काळीं देखील, पाठलाग करणारा शत्रु आपल्यापासून किती अंतरावर आहे, हें पाहण्यासाठी जमिनीला कान लावून घोड्यांच्या टापा अैकत असत. समुद्राच्या पाण्यांत बुडी मारली तर दूर अंतरावरचें जें जहाज अेरव्ही डोळ्यांना दिसत नाही त्याची घरघर कानांना

अैकूं येते आणि तें जहाज अजमासें किती दूर असेल हें ठरवतां येतें. परंतु अशा रीतीनें अहोरात्र पाण्यांत डुंबत राहून दूरच्या जहाजाचें किंवा पाणबुडीचें अंतर ठरविणें दुरापास्तच. हें अंतर कांही झालें तरी ठोकळ मानाचेंच ठरणार; शिवाय बहुतांशीं पाण्यांत लपलेले हिमखंड जेव्हां पाण्यांतून तरंगत जातात तेव्हां ते असा कांही मोठासा खळखळाट निर्माण करीत नाहीत कीं जो साध्या कानांनी अैकूं येअील. या सर्व अडचणींतून मार्ग काढण्यासाठी लँजविननें जी युक्ति योजिली तिच्यामध्ये त्याने वस्तुतः कानांचा विषय असणाऱ्या पण कानांच्या मर्यादित आवाक्यामुळे श्रुतिसंवेदना न देणाऱ्या 'श्राव्यातीत' तरंगांचा अुपयोग करून डोळ्यांचा दुपळेपणा नाहीसा केला.

लँजविनच्या कल्पकतेंतलें मर्म नीटपणें ध्यानांत ध्यावयाचें झाल्यास घटकाभर असेंहि म्हणतां येअील कीं जहाजावर बसल्या बसल्या त्याने अेक घंटा वाजविली. ती तांब्यापितळेची नव्हती, गारेच्या लहानशा चकतीच्या स्वरूपांत होती. तिच्यावर टोला हाणण्यासाठी त्याने लाकडी ठोकळा न वापरतां, जो विजेचा यातायातिक प्रवाह तिच्यावर हवकूं दिला त्यानेच ठोकण्याची कामगिरी बजावली. धातूच्या घंटेवर जोराने टोला हाणला म्हणजे ती जशी थरारते आणि त्यामुळे भोवतालच्या हवेंतून तरंगामागोमाग तरंग पसरत जातात तसेच ते या गारेच्या तुकड्यांतून निर्माण होअून सर्वत्र पसरले. पहिले तरंग श्राव्य होते, त्यांच्यामुळे कानांना ध्वनिसंवेदना झाली. दुसरे देखील कानांवर येअून आदळले पण ध्वनिसंवेदना झाली नाही. पदार्थमात्रांतून संचरण करणारे जे जे तरंग ते सर्व 'ध्वन'तरंग. त्यांतले कांही श्राव्यक्षिप्रतेचे असतात, ते कानांवर आदळले म्हणजे ध्वनिसंवेदना होते. बाकीचे श्राव्यातीत क्षिप्रतेचे असतात. फारच रेंगाळत जाणारे तरंग असले तर कानांना अुमगत नाहीत, फारच झपाट्याचे असले तरीहि कानांना अेकावयाला येत नाहीत. २० ते २०,००० *वि. ग. प. क्षिप्रतेचे तरंग असतील तर त्यांचें अस्तित्व ध्वनिरूपाने कानांना समजतें. कित्येकांच्या कानांचा आवाका १०,००० पर्यंतच जातो. त्यापेक्षा अधिक झपाट्याचे तरंग त्यांना उमगत नाहीत. हे जे आवाक्याबाहेरचे झपाटदार तरंग त्यांना 'श्राव्यातीत' म्हणतां येअील. असले तरंग हवेंत लवकर विरून जातात, पाण्यांतून किंवा तेलांतून ते सुमारें सेकंदाला वि.ग.१ मैल या वेगाने दूरवरपर्यंत जाअूं शकतात. लँजविनच्या 'प्रतिध्वनदर्शका'मध्ये वर सांगितल्याप्रमाणे अेका गारेच्या चकतींतून श्राव्यातीत तरंग निर्माण करण्याची सोय केली गेली आहे. जहाजांतल्या 'प्रतिध्वनदर्शकां'तून निघून हे तरंग समुद्राच्या पाण्यांतून संचार करीत असतांना मार्गांत जेथे अडथळा येअील तेथून ते परावर्तन पावून माघारा जहाजांत येत असतात. तेथे त्यांच्याकडून सतत आलेख (ग्राफ) लिहविला जात असल्यामुळें तरंग बाहेर निघून गेला केव्हां आणि परत आला केव्हां यावरून त्या त्या अडथळ्याचें अंतर काढतां येतें. वाटेंत दुसरा कसलाहि अडथळा न आला तर समुद्राच्या तळाशीं थडकून ते माघारा येत असल्यामुळे समुद्राचा ठाव मिळतो, तळाशीं चढअुतार कोठे आणि कसा आहे, वाळू, खडक, वनस्पति वगैरे कोठे आहेत हेंहि त्यांच्या साहाय्याने ठरवतां येतें.

या श्राव्यातीत तरंगांचा प्रभाव मोठा जबरा आहे. पाण्यांतून त्यांचा झोतच्या झोत जात असतांना जर का त्या झोतांतून मासे, बेडूक वगैरे क्षुद्र प्राणी जाअूं लागले तर ते जायबंदी होतात किंवा प्रसंगीं गतप्राण सुद्धा होतात. कोणाहि प्राण्याच्या स्नायूंवर किंवा चेतानिकां -नर्व्हज्- वर ही तरंगशलाका पडली तर तेवढा भाग कायमचा निकामी होतो. बेडकाच्या

* विपळागणिक पर्यय = वि.ग.प.

छातीवर हे तरंग सोडून त्याच्या हृदयाचे ठोके थोडा वेळ रोखून धरतां येतात किंवा ते लांब लांब अंतराने पडतील असें करतां येतें. अेखाद्या पसरट बुडाच्या थाळींत तेल ओतून त्या थाळीच्या बुडाशीं श्राव्यातीत तरंग निर्माण केले तर जेवढ्या निमुळत्या भागांतून ते वर येत असतील तेवढ्या भागावरच्या थाळींतल्या तेलाला भोवतालच्या पृष्ठभागापेक्षा सुमारें तीन अिंच अुंचीचें टेंगूळ निर्माण होतें आणि त्यांतून कारंज्यासारखे तेलाचे तुषार अुडत राहतात. काचेची अेखादी नळी घेअून ती या तेलांत बुचकळली आणि तिला बोटांनी स्पर्श केला तर बोटांच्या कातडीचा तेवढा भाग कानसल्याप्रमाणे घर्षणाने जळून जातो. अेखाद्या अणकुचीदार नळीचें दुसरें टोंक तेलांत बुडवलें आणि अणकुचीवर अेखादा लाकडाचा तुकडा ठेवला तर त्याला सामर्थ्याने पाडावें तसें भोक पडतें.

श्राव्यातीत तरंगांच्या अंगीं अशा तऱ्हेचा भयानकपणा असला तरी त्यांचा अुपयोग पाणबुड्या बोटी वगैरे हेरण्यासाठी जसा केला जातो तसाच तो अितरहि सौम्य, सुखावह कामीं होतो. टायफॉअीड हा अेक आपण घातुक आजार मानतों. या टायफॉअीडच्या जंतूंवरील अुतारा– अँटीबॉडीज्– खुद्द त्या जंतूंच्या शरीरांतच असतो. या जंतूंना मारून टाकून त्यांच्या शरीरांतला अुतारा कोणत्याहि प्रकारें बिघडूं न देतां मिळवण्याचें काम फार नाजूक आणि म्हणूनच विकट असतें. अशा वेळीं श्राव्यातीत तरंगांचा मारा जंतूंवर करून त्यांच्यांतून अुतारा काढून घेतां येतो. आपण जें दूध नेहमी पितों तें कच्चें, बिनतापविलेलें, असतांना त्यांत ठिकठिकाणीं स्निग्धांशाच्या अतिलहान लहान गोळ्या असतात. दुधावर या तरंगांचा मारा केल्यास गोळी न् गोळी फुटून जाअून तें दूध अेकजीव होतें. असलें दूध पचावयास फार हलकें असल्यामुळे आंतड्याचा विकार असणाऱ्यांना त्याचा विशेष अुपयोग होतो. तांब्यापितळेसारख्या धातूंचा रस केला आणि त्या रसावर श्राव्यातीत तरंगांचा मारा केला तर त्या द्रवांतल्या अणुरेणूंमधील पोकळींत जे वायु दडून राहिले असतील ते तेथून हुसकून लावले जातात आणि मग थंडावल्यावर तो धातु टणक बनतो. चिलखतें वगैरे बनवण्याच्या कामीं अशा धातूंचा अुपयोग करतां येतो.

तात्पर्य, श्राव्यातीत तरंग हे माणसाच्या हातीं लागलेलें अेक अत्यंत प्रभावी आणि अुपयुक्त साधन आहे. हे तरंग अितर कित्येक रीतींनी निर्माण करतां येत असले तरी गारेच्या चकतीच्या द्वारा ते अुत्पन्न करणें सोपें आणि सोयिस्कर असल्यामुळे अशा चकत्यांचाच अुपयोग या कामीं विशेषतः केला जातो.

आणि तरीहि आपण नेहमीच्या व्यवहारांत म्हणतच असतों की 'पृथिवीच्या पोटीं हिरा गारगोटी, दोहोंशीं संसाटी मानूं नये ! !'

---

# परीक्षणें

## लोकहितवादी

[लोकहितवादींची शतपत्रें— सपादक : श्री. श्री. रा. टिकेकर; प्रकाशक : श्री. व. श्री. सातवळेकर, बी.अे., अुपा प्रकाशन, औंध (सातारा); मून्य : तीन रुपये.]

काळाअेवढा न्यायाधीश दुसरा नाही. कोणत्याहि गोष्टीचे परिणाम साकल्याने कळावयास मध्यें काळ लोटावा लागतो. कोणत्याहि वस्तूच्या आकाराचें यथार्थज्ञान होण्यास तीपासून कांही अंतरावर अुभें राहून ती पाहावी लागते, तद्वत् कोणत्याहि कृत्याच्या बरेवाअीटपणाचा निर्णय कालदृष्ट्या दूर जाअून करावा लागतो. अितिहासाचें महत्त्व याच गोष्टींत सांठविलेलें आहे. खातांना पदार्थ किती गोड लागला यापेक्षा पोटांत गेल्यानंतर त्याचा परिणाम कसा झाला या गोष्टीचें महत्त्व अर्थातच अधिक आहे.याच न्यायाने धाकटे शास्त्रीबुवांचे लोकहितवादींवरील लेख तत्कालीन महाराष्ट्राने—म्हणजेच त्यां काळाच्या ब्राह्मण जातीने— म्हणजे त्यांतील वाचनाभिरुचि असलेल्या अत्यल्प साक्षर वर्गाने— आणि तेहि पुण्यामुंबअीभोंवतीच्या अल्प क्षेत्रांत—मिटक्या मारीत वाचले असतील. कारण त्याला कारणेंहि तशींच स्वार्थसाधनरूप होतीं.पण ते लेख 'निबंधमाले'च्या ग्रंथरूपांत महाराष्ट्राच्या पोटांत कोंबल्याचा परिणाम किती समाजविघातक झाला याचा निवाडा करण्याची वेळ आता खचीत आली आहे. शास्त्रीबुवांचे अनुयायी शिष्य समजले गेलेले लोकमान्य जाअूनहि आता अेक पिढी लोटली. तेव्हा अशा कर्तबगार शिष्याच्या गुरुभक्तीचे राष्ट्रावर झालेले परिणाम जोखून पाहण्यासहि आता हरकत नसावी. नेमक्या अशा समयींच लोकाहितवादींच्या शतपत्रींचें—शिळाप्रेसवर छापलेल्या ग्रंथाचें—पुनर्मुद्रण पाअूणशे वर्षांनंतर घडून यावें हा योगायोगच म्हटला पाहिजे.

कारण लोकहितवादींनी लोकहितकारी संस्था स्थापण्यांत पुढाकार घेतला असला तरी चिपळूणकरांप्रमाणे त्यांची स्वस्थापित देवळांत पूजाअर्चा, पुराणकीर्तन, अुत्सवछबिना अित्यादि प्रकारांनी बोळवण करण्याचा प्रघात रूढ केला गेलेला नाही. देवापुढील खारका गोळा करण्याच्या लोभाने प्रेरित होअून कां होअीना पण पूजानंदादीप चालू ठेवून क्षेत्रमाहात्म्य वाढविणारे बडवे त्यांनी सुरू केलेल्या क्षेत्रांत ताम्रपट घेअून बसलेले दिसत नाहीत. अुलट, त्यांच्यावर लाखोली वाहण्याची संधि दुसऱ्यांच्या स्तवनप्रसंगींहि चुकविण्यांत आलेली नाही. अशाहि स्थितींत त्यांच्या अुडवलेल्या बद्दा असल्या पुरांनी वाहून न जातां, कमलपत्रांप्रमाणे न भिजतां, कालोदधीवर तरंगत राहिल्या असल्या तर हा लोकहितवादींतर्फे मिळालेला अितिहासाचा फैसला म्हटला पाहिजे.

लोकहितवादी मोठे होते का ! विद्वान् होते का ! दूरवर दृष्टि पोहोचणारे द्रष्टे होते का ! कीं ज्यामुळे त्यांची आठवण काढावी, स्मृति जागृत ठेवावी, त्यांच्या विचारांशीं परिचय करून घ्यावा, असें कोणाला वाटावें ! या प्रश्नांचीं अुत्तरें अेकदम होय अशीं देअूं लागलें तर चिपळूणकरांच्या दुष्ट लेखांनी महाराष्ट्रांत अुत्पन्न झालेले वावदूक "मोठा कोणाला म्हणावें, विद्वत्तेचें

निश्चित गमक कोणतें, द्रष्ट्याचीं लक्षणें काय, असल्या 'मूलभूत' शंका काढून वितंडवाद माजवितील व मुख्य मुद्याला बगल देतील. तेव्हा तशा भानगडींत न पडतां अेवढेंच सांगतां येण्यासारखें आहे कीं ते निश्चितपणें घाकट्या शास्त्रीबुवांपेक्षा थोर होते, आणि विद्वानहि होते, आणि द्रष्टे तर होतेच होते.

लोकहितवादींना मोठे कां म्हणावयाचें ! कारण त्यांच्या जीवनाची बैठक मानव्याच्या विस्तीर्ण पायावर अुभारलेली होती. त्यांच्या टीकेचा मारा भट, कारकून व अर्थशून्य घोक्ये पंडित यांवर झालेला दिसत असला तरी टीकेचे मुद्दे अखिल मानवजातीस लागू पडण्यासारखे होते. लोकहितवादींचा यूरोपीय समकालीन कार्ल मार्क्स ज्या हेतूने मानवी समाजाच्या प्रश्नांचा अभ्यास करीत होता त्याच हेतूने प्रेरित होअून लोकहितवादींनी लेखणी हातांत धरली होती. त्यांची देशभक्ति मानवभक्तीचा अेक लक्ष्य भाग या रीतीची होती. 'सर्व देशाची काळजी प्रत्येकजणाने करावी'. (पृ. ३०) असें त्यांस वाटत होतें. तसेंच 'स्वदेशाचें हित अिच्छावें आणि परदेशाची हानि अिच्छावी असें नाही' हेंहि ते सांगतच होते. (३१) 'या जमिनीवर जे आपण आहोंत, ते सर्व अेकमेकांचे बंधु आहोंत ... याजकरिता कोणी सुखी व द्रव्यवान् असतील, त्यांणी बहुत लोक अुपाशी मरतात व दरिद्री आहेत, त्यांचें रक्षण होण्याचा प्रयत्न करावा'. (८६) 'मेल्यावर आपण अेकमेकांस अुपयोगी पडणार नाही. तेव्हा या जन्मांत ही संधि लोकांवर अुपकार करण्याची आहे ती सोडूं नये व आयुष्याचा व्यय दुसऱ्यांचे हिताकरिता करावा. दुसऱ्यास सुखप्राप्ति करणें हे स्वता आपणांस लहान सौख्य नाही,' (८७) अशा अुपदेश ते आपल्या स्वदेशप्रीतीवरील पत्रांतच करतांना आढळतील. "वैराग्य हें मूर्खपण आणि अीश्वराने जें दिलें व ज्याकरिता मनुष्यदेह केला, त्यास टाकून जनावराप्रमाणे रानांत फिरणें आहे." (१९६) 'मन हेंच मोठें शास्त्र आहे व लिहिलेलीं शास्त्रें सर्व त्याचे खाली आहेत'. (२०९) 'शास्त्रांतील कायदे जरूर वरचेवर फिरले पाहिजेत'. (२१२) 'जुनें नवें होत आलेंच आहे. हजारो शास्त्रांचे नियम ऋषींनी फिरविले आहेत...नवे ग्रंथ केले तर आपण ऋषि होअूं. कायदे करणें हें तर राष्ट्राचें काम आहे; प्रत्येक काळीं जे जे शहाणे लोक असतील, त्यांणी शास्त्र करावें हें अुचित आहे.' (३८९) "मनूचें वचन असो, याज्ञवल्क्याचें असो, कोणाचेंहि असो, ब्रह्मदेवाचें कां असेना, 'बुद्धिरेव बलीयसी' असें आहे . शास्त्रास अेकीकडे ठेवा, आपली बुद्धि चालवा, घातक वचनावर हरताळ लावा", (३८५) 'अज्ञान आहेत त्यांस शहाणे करणें, रोगी आहेत त्यांस औषधपाणी करणें, दरिद्री व पीडित आहेत त्यांस सुख देणें, हीच नीति व हेंच पुण्य'. (१७७) 'चार ब्राह्मण लावून अभिषेक करावा त्यापेक्षा चार मजूरदार लावून रस्ता नीट करावा हें चांगलें'. (१७९) 'स्त्रीपुरुषांचे अधिकार धर्मसंबंधी कामांत व संसारांत सारखे असावे. आचारापेक्षा नीति प्रमुख असावी. मनुष्यमात्रास तुच्छ लेखूं नये. जातिअभिमान नसावा. सर्वांशीं सारखें दयापूर्वक वर्तावें. जास जो पाहिजे तो रोजगार त्याने करावा. गुणेंकरून जातिभेद मानावा, कुळेंकरून मानूं नये. सरकाराहून प्रजेचे अधिकार अधिक असावे. जे जे रयतेच्या हिताचे ते सरकारशीं भांडून घेत जावें'. (३१३) 'गरीब हा श्रीमंताचे जुलमानें होतो, कांही जन्मतः कोणी गरीब नसतो'. (४४१) 'भिकारी आणि श्रीमंत यांचे शरीरामध्यें किंवा बुद्धीमध्यें फरक नसतो. अितकेंच की कालेंकरून अेकाने दुसऱ्याचें हरण करून फार माल जमविला असतो व दुसऱ्याचा तो हरण जहाला म्हणून तो भिकारी असतो. अीश्वराने पृथ्वीवर पदार्थ निर्माण केले, हे सर्वांस सारखे पोचावे हा त्याचा हेतु होय. परंतु पन्नास लोकांस लुटून

अेक श्रीमंत होतो'. (४२५) वगैरे अनेक अुताऱ्यांवरून लोकहितवादींच्या मनाची विस्तीर्ण बैठक ध्यानांत येअील.

वरील अुताऱ्यांत प्रकट झालेल्या विचारसरणीवरून लोकहितवादी हे आंतरराष्ट्रीय मनोवृत्तीचे होते, स्वदेशाबद्दल त्यांना अभिमान होता तरी प्रांताभिमानाचें अनिष्ट वारें त्यांना लागलेलें नव्हतें, त्यांची दृष्टि भट्टमहाशयांच्या अनवश्यक कर्मकांडावर खिळून राहिलेली होती तरी ते निरीश्वरवादी नव्हते, अीश्वरवादी असूनहि ते परलोक मानणारे नव्हते, सामाजिक गोष्टींचा अंतर्भाव ते धर्मांत करण्यास तयार नसून अेतद्विषयक त्यांची दृष्टि पूर्ण आधिभौतिक स्वरूपाची होती, ग़रीब-श्रीमंतांबद्दलचे त्यांचे सिद्धान्त साम्यवादाला शोभण्यासारखे होते वगैरे गोष्टी वाचकांच्या सहजच ध्यानांत येतील. जगावरील कोणत्याहि समाजाच्या मानगुटीस त्या काळीं पुरोहितवर्ग बसलेला होता. अशा वेळीं त्यांचा बीमोड करण्यासाठी त्यांनी जें ब्राह्मणजातीवर शस्त्र धरलें तें जातीवर असें नसून त्या वर्गाच्या समाजपिळणुकीस कारणीभूत होणाऱ्या अनिष्ट कर्मकांडावर होतें, हें लक्ष्यांत येअील. पण त्यांच्या टीकेचा रोख मुळीच मनांत न आणतां स्वज्ञातीवर अुठलेला हा अेक मूर्ख, अज्ञानी, भ्रमिष्ट आहे अशी टीका केली गेली. पेशवाअींत अुत्पन्न झालेलीं अनिष्ट खुळें त्याकाळीं समाजांत प्रत्यक्ष विद्यमान होतीं. त्यांनी बाजीरावशाहींत सुरू झालेली समाजाची घसरट कडेलोटास पोचविली होती. अैतखाअु सरदार, अिनामदार, वतनदार; अर्थशून्य व सद्यःकाळास निरुपयोगी अशी संस्कृत विद्या पढून त्यावर द्रव्य अुकळून समाजनाश करणारे पंडित; सामान्य जनता, गोरगरीब, बायाबापड्या, व अज्ञ शूद्रादि वर्ग यांच्यावर चरणारा भिक्षुकवर्ग; तुटपुंज्या कारकुनी शिक्षणावर परकी अंमलाखालील अंमलदार बनून स्वबांधवांची पिळणूक करणारा गृहस्थवर्ग अित्यादिकांच्या जाचांत भरडला जाणारा दुबळा, खुळा लोकसमूह पाहून लोकहितवादींचें मन तिळतिळ तुटत होतें. त्यांची सरळ बुद्धि, निष्पाप अंतःकरण, समाजाची दुरवस्था पाहून हृदय कालवून गेल्याने काय करूं नी काय न करूं अशी क्षुब्ध झालेली त्यांची मनोवृत्ति या सर्वांचा संघटित परिणाम त्यांच्या लिखाणांत सर्वत्र दिसून येतो. आणि म्हणूनच तें कार्ल मार्क्सच्या साम्यवादाच्या आदिम जाहिरनाम्याप्रमाणे अुत्क्षोभक, क्रांतिकारक व आक्रमक ठरलें आहे.

असल्या अव्वल दर्जाच्या प्रभावी लिखाणाचा प्रकाश समाजाच्या अज्ञानांधकारावर पडून समाजसुधारणेस योग्य तऱ्हेने आरंभ झाला असता तर आज महाराष्ट्र ज्या हीन दीन अवस्थेस येअून पोचला आहे त्या अवस्थेस येण्याचें कारणच पडलें नसतें. पण महाराष्ट्रसमाजाच्या दुर्दैवाने अेक महान् साहित्यिक निर्माण झाला. याने स्वतःलाच 'मराठी भाषेचा शिवाजी' म्हणवून घेतलें आहे. ग्रीसच्या अितिहासांतील सुज्ञ (=Sophist) वावदुकांप्रमाणे अल्प व अेकांगी ज्ञानाच्या तुटपुंज्या भांडवलावर याने मोठा घाअूक व्यापार केला. लोकहित वादींच्या लिखाणामुळे ज्यांच्या पोटावरच पाय येत होता असे सर्व—मुख्यत: ब्राह्मण—लोक या त्यांच्या अीश्वर प्रेषित वकीलाचे स्वागत करण्यास सहजच सिद्ध होते. आणि हेच लोक त्या काळी महाराष्ट्र समाजांत प्रमुख होते. त्यांच्या साहाय्याने मोठी आरडा ओरड निर्माण करून या पंडिताने प्रगतिपथावर चालू लागलेल्या महाराष्ट्र समाजाची गाडी बैल बुजवून यांबविण्याचे अपश्रेय संपादिलें त्याचा परिणाम म्हणजे ब्राह्मणादि पांढरपेशा साक्षरवर्ग प्रि. गोळ्यांच्या भाषेंत 'अज्ञ, अजगरवृत्ति, अजागळ, श्ववृत्ति' राहिला, हा होय.

लोकहितवादींचें म्हणणें रास्त होतें, पुरोगामी होतें, समाजहितकारक होतें ही गोष्ट

आता बहुधा सर्वमान्य होत आहे. अजूनहि हठाने जे अशी गोष्ट कबूल करण्यास लाजतात त्यांचेंहि वर्तन लोकहितवादींच्या अुपदेशानुसारच सध्या होअूं लागलें आहे. या म्हणण्याप्रमाणे महाराष्ट्रसमाजाची सुधारणा होत राहिली असती तर अनेक समाजविध्वंसक अनिष्टावर्त्तांच्या तडाख्यांतून महाराष्ट्रसमाज सुटला असता. जपानांतील वतनदारवर्गाप्रमाणे त्या काळच्या ब्राह्मणांनी राष्ट्रकल्याणार्थ आपलें स्वार्थसाधू स्वामित्व सुखाने सोडिलें असतें तर निदान शिवप्रभूंचा जयघोष करणाऱ्या महाराष्ट्रांत तरी ब्राह्मणब्राह्मणेतरवाद निर्माण होण्यास कांहीच कारण अुरलें नसतें. कोल्हापूरच्या वेदोक्त प्रकरणाचें मूळच खांडिलें गेलें असतें. स्त्रीशिक्षण, विधवाविवाह, विधवावपन असल्या क्षुल्लक प्रकरणांत समाजाची शक्ति अपव्ययीं पडून जो सुधारकदुर्धारक-वाद निष्कारण माजला त्याला स्थानच अुरलें नसतें. आधिभौतिक मताच्या पायावर राष्ट्राची आर्थिक पुनर्घटना, कामकरी व फुकटखाअू जमीनदार, पिळला जाणारा गरीब व छळणारा सावकार, खोट्या धर्मकल्पनेमुळे खितपत पडलेला दीन व त्याचा गैरफायदा घेअून त्याला लुबाडणारा धर्ममार्तंडवर्ग, अित्यादि भेद लक्ष्यांत घेअून १९ व्या शतकास शोभण्यासारखी होती तर हिंदुमुसलमान, मांडवलदारमजूर, असले लढे निर्माण होअून राष्ट्र खिळखिळें होण्यास अवसरच सापडला नसता. सुधारणेचें कार्य केसरीसंस्थेंतूनच होत राहून आगरकरांस 'सुधारक' काढण्याचा खटाटोप करावा लागला नसता. गोखल्यांना 'भारतसेवकसमाजा'चें कार्य केसरी–मराठा–संस्थेंतूनच चालवितां आलें असतें. सेवासदन व अनाथबालिकाश्रम' यांतूनच हिंदुमहिलासंघाचें कार्य होत राहिलें असतें. राजकारणांतील जोडाजोडी बंद पडून कांग्रेसची सुरत झाली नसती. अस्पृश्योद्धार, वन्यजनसुधारणा, ग्रामीण-कृषकसुधारणा अित्यादि प्रश्न महात्मा गांधींसाठी मागे राहून त्यांच्या चळवळीला जें अधिष्ठान अुरलें तें जाग्यावरच शिल्लक राहिलें नसतें.

लोकहितवादी जसे मोठे होते तसेच द्रष्टेहि होते याचा पुरावा हाच की त्यांनी अुपदेशिलेला मार्ग महाराष्ट्राने मध्यंतरीं दोन पिढ्या सोडून दिला होता तरी अखेरीस त्याला त्याच अुपदेशाचा अवलंब करणें भाग झालें. 'तरुणी-शिक्षण-नाटिका' लिहून ज्या स्त्रीशिक्षणाची पुण्यांत रेवडी अुडविण्यांत आली त्याच पुण्यांत स्त्रीशिक्षणाचा आज सर्वांत जास्त प्रचार झालेला दिसतो. संमतिवयाच्या कायद्यावर रण माजलेल्या याच पुण्यनगरींत आता सुशिक्षित प्रौढ कुमारिकांच्या व विधवांच्या विवाहाचा प्रश्न सोडविण्यासाठी अन्यांना 'लपंडाव' पडद्यावर आणावा लागत आहे. ज्या दयानंदांची गाढवावरून मिरवणूक काढून थट्टा करण्यांत आली त्यांच्याच आर्यसमाजाचा पाठिंबा आता अिरसाल पुणेरी हिंदुस्वातंत्र्यवीरांना घ्यावा लागत आहे. ज्या ज्योतिबा फुल्यांची क्षुद्र कुचाळी करण्यांत आली त्यांचेंच नांव लोकमान्य टिळकांच्या पुतळ्याहूनहि अुंच रेमार्केटावर झळकत आहे. ज्या पुण्यांत राष्ट्रीय सभेचा मंडप विटाळेल म्हणून सामाजिक परिषदेला बंदी करण्यांत आली त्याच पुण्यांत अस्पृश्योद्धारांचीं लाडू-भोजनें मातंगांच्या वस्तींत अुटत आहेत. या चमत्कारांची यादी किती म्हणून वाढवावी !

लोकहितवादींच्या कार्याचा विपर्यास करून महाराष्ट्रसमाजाच्या प्रगतीची गाडी ज्याने दुसऱ्या रुळावर नेअून अुलटी फिरविली त्या चिपळूणकरांच्या विपरीत करणीचे दुष्परिणाम लोकमान्यांच्या कार्याला सर्वांत जास्त बाधले. त्यांनाहि समाजाच्या गाडीची दिशा बदलतां आली नाही किंवा मूळ रुळावर आणणें साधलें नाही. शतकानुशतक चालत आलेल्या हिंदुसमाजाच्या पंकिल गर्तेंतच या जहांबाज वीराला आपल्या शक्तीचे प्रयोग करीत राहावें लागलें. राजकारणावर अेखादा ग्रंथ लिहिण्याची अिच्छा राजकारणांत जन्म घालूनहि त्यांना झाली नाही

तर शेकडो टीकांच्या मान्यांनी खिळखिळया झालेल्या भगवद्गीतेवरच त्यांना पुन्हा हल्ला चढवावासा वाटला. मिल-स्पेन्सर पढलेल्या या पंडिताला गणपत्युत्सव काढून पुन्हा मूर्तिपूजेचें पुनरुज्जीवन करतांना आपण कांही चूक करीत आहों असें वाटलें नाही.

लोकहितवादींनी शास्त्रवचन सदसद्विवेकबुद्धीच्या विरुद्ध येअील तेथें गुंडाळून ठेवा असें टणठणीत सांगितलें तर लोकमान्यांना त्यानंतर दोन पिढ्या जाअूनहि शास्त्रवचनांच्या तारेवर बुद्धीची करामत करावीशी वाटली. या कसरतींत बुद्धीचा चमत्कार भरपूर दिसला तरी त्या चमत्कारांचे परिणाम समजाला विघातकच झाले यांत आता वावदूकांखेरीज अितरांना शंका वाटेल असें म्हणवत नाही.

लोकहितवादींच्या विद्वत्तेची शास्त्रीबुवांनी रेवडी अुडविली, लोकहितवादींजवळ शुद्ध विद्वत्ता चिपळूणकरांहूनहि जास्त होती हें त्यांच्या लिखाणाचें अवलोकन केल्यास सहज ध्यानांत येण्यासारखें आहे. पण विद्वत्ता असूनहि पांडित्याची अकड त्यांच्यांत नव्हती. आप्तवाक्य ज्यांस मान्य असेल त्यांच्यापुढे "विद्वान या दृष्टीने लोकहितवादींस जें महत्त्व देतां येअील तें विष्णुशास्त्र्यांस नाही. शास्त्रीबुवांचें महत्त्व नव्याप्रकारच्या भावनेचा प्रचारक आणि अर्वाचीन पुण्याचा निर्माणकर्ता या दृष्टीने आहे." हीं डॉ. केतकरांचीं वाक्यें (श्री. श्री. के. क्षीरसागर-व्यक्ति व वाङ्मय परिशिष्ट) ठेवतां येण्यासारखीं आहेत. शास्त्रीबुवांच्या लिखाणामुळे मूलग्रंथ अभ्यासिणाऱ्या विद्वत्तेचा महाराष्ट्रांत संकोच झाला. वर्तमानपत्री ज्ञानावर वाटेल तें टारगें पोरगें कोणत्याहि मुद्यावर मत देण्याअितकें धीट झालें. याच प्रवृत्तीचा आजच्या महाराष्ट्रांत कहर झालेला दिसून येत आहे. प्लेटोने आपल्या लिखाणांत म्हटलें आहे त्याप्रमाणे "असे हे धाडसी लोक लोकांचे मोठाले जमाव जमले असतांना बहुजनसमाजाचींच मतें शिकवीत असतात व त्यांनाच ज्ञान म्हणून गौरवाने संबोधित असतात." याच्याचपुढे प्लेटोने "लोकांचा अधिकार वाजवीपेक्षा अधिक मान्य केला म्हणजे ते सांगतील त्याप्रमाणे करणें भागच पडतें" असें लिहिलें आहे त्याच तऱ्हेचा दुष्परिणाम त्याच कारणामुळे महाराष्ट्रांत आज दृग्गोचर होत आहे. पोटभरू भटांभिक्षुकांवर विद्वत्तेचा व सुज्ञतेचा अवस्त्वारोप करून त्यांच्या मतांना मान तुकविण्याची जी अनिष्ट परंपरा शास्त्रीबुवांच्या लिखाणामुळे महाराष्ट्रांत सुरू झाली तीमुळे सुबुद्ध लोकांची विचारपूर्वक आरंभिलेली सुधारणा मागे पडली. अनिष्ट रूढी ज्यांना बाधतात त्यांना आपले प्रश्न समाजाकडून न्याय्य रीतीने सोडविले जातील अशी आशा त्यामुळें अुरली नाही. अर्थातच ते व्यक्तिशः बेफाट बंडखोर बनले. ज्या वन्यजातींना व अस्पृश्यांना आपल्याला पाणी मिळण्याचीहि आशा अुरली नाही ते सहजच परधर्मांच्या गोटांत अनन्यगतिक होअून गेले. पांढरपेशावर्गात सुधारणेला जें विकृत स्वरूप सध्या प्राप्त झालेलें दिसत आहे त्याला कारण अनन्यगतिकत्वाने अुत्पन्न झालेली ही बंडखोर वृत्ति. समाजाला बरोबर घेअून जातां येत नाही म्हणून जो बंडखोर बनतो तो साहाजिकच कालान्तराने त्या समाजाला डोअीजड होतो. आजचा नवमतवाद, स्त्री-विवाह-विषयक प्रवृत्ति, श्लील-अश्लील मीमांसा, कला नीतिवाद असल्या डोअीजड बंडखोर व्यक्तींच्या टोळयांमुळेच निर्माण झालेले आहेत. योग्य वेळीं योग्य त्या सुधारणा न्याय्य बुद्धीस अनुसरून न केल्यामुळे समाज आज क्रांतीच्या कड्यावर येअून ठेपला आहे. घनघोर आंतरसमाज युद्ध होअून अनेक गोष्टींचा चक्काचूर झाल्याशिवाय सुधारणेची आशा आता अुरलेली नाही. लोकहितवादींचा हितवाद ज्यांनी अचाट पराक्रम करून गाडून टाकला त्यांच्यावर या आपत्तीची जबाबदारी अितिहासकार लादतील यांत संशय नाही.

अनुक्रमणिका

लोकहितवादींच्या द्रष्टेपणाचा पुरावा त्यांच्या लिखाणांत सर्वत्र पसरलेला आहे. "आणखी निदान. १०० वर्षें पाहिजेत तेव्हा हे लोक जागृतींत येतील". (३८३) असें त्यांनी ९२ वर्षांपूर्वी लिहिलें तें खरें नाही असें आज तरी कोण म्हणूं शकेल ! सार्वजनिक काकांच्याहि पूर्वी अेक पिढी त्यांनी स्वदेशीचा पुरस्कार केला होता, अिंग्रजांच्या राज्याचे दुष्परिणाम ओळखिले होते, आपल्या लोकांची कुवतहि जोखली होती. भटांच्या मूर्खपणाबद्दल जें त्यांनी जीव तोडून लिहिलें व ब्राह्मणांच्या स्वार्थीपणाचें जें नागडें स्वरूप दाखविलें तें गेल्या शंभर वर्षांत विचारी पुरुषांच्या प्रत्ययास आलें आहे. जे थोडे सज्जन लोकहितवादींचा अुपदेश खरा मानून, प्रचंड छळ सोसून त्याप्रमाणे वर्तत राहिले त्यांनीच तेवढीं भावी सुधारणेचीं बीजें राष्ट्रांत राखून ठेविलीं व म्हणूनच आज त्यांच्यावर लिहिण्याचा सुयोग प्राप्त झाला आहे लोकहितवादींत दोष नव्हते असा या लिखाणाचा अर्थ नव्हे. त्यांच्यांत जे दोष होते ते ज्या भटी संस्कृतीवर ते टीका करीत होते तज्जन्यच होते. पेशवाअींत प्रादुर्भूत झालेला ब्राह्मणांचा अेकांगीपणा व दुबळेपणा लोकहितवादींतहि भरपूर अुतरलेला होता. त्यामुळे त्यांचीं मतें कार्ल मार्क्सअितकींच पायाशुद्ध असून त्यांना जोराने प्रचलित करतां आलीं नाहीत. कार्ल मार्क्सच्या मतांनी यूरोपांत संघटित साम्यवादी पक्ष निर्माण झाला. व त्याने वीस वर्षांपूर्वीच रशियांत आपल्या विजयाची पताका फडकविली. अितर राष्ट्रांत अितका विजय त्यांच्या अनुयायांना मिळालेला नसला तरी त्याच्या विचारप्रणालीचा परिणाम जगांतील सर्व समाजावर कमीजास्त प्रमाणावर होतच आहे. लोकहितवादींचें दुबळेपण हें अेका अर्थी महात्मा गांधींच्या दुबळेपणासारखें आहे. विचार अुत्तम, शास्त्रशुद्ध व अंतिम मानवहितकारी असूनहि व्यवहारांत भागत नाही. जगाचा अितिहास हा बहुधा अविचारी, आडमुठ्या मानल्या जाणाऱ्या व्यक्तींच्या पराक्रमाने बनलेला आहे. पाशवी शक्तींचेंहि मानवसमाजाच्या अुत्क्रांतींत महत्त्वाचें स्थान आहे असा बोध यावरून होतो. लोकहितवादी सज्जन होते त्यांजवळ असला आडमुठेपणा नव्हता. तो ज्यांजवळ होता त्यांनीच महाराष्ट्राचा नंतरचा अितिहास बनविला. पण पाशवी शक्तीबरोबरच सत्यालाहि महत्त्वाचें अधिष्ठान आहे. त्याचा प्रादुर्भाव सध्या होत असलेला दृक्प्रत्ययास येत आहे. कदाचित् या दोहोंच्या आंदोलनानेच भावी अितिहास बनणार असेल; कुणीं सांगावें !

त्र्यं. शं. शेजवलकर

---

## सुश्लोककुमार अर्थात् महाराष्ट्रकुमारसंभव

[लेखक व प्रकाशक: डॉ. रा. चिं. श्रीखंडे, अेम्. बी. बी. अेस्., कोल्हापूर; पृ. ३४+१६०; किंमत २ रुपये.]

'गीतगोविंदा'च्या अपेक्षेने 'कुमारसंभवा'चा पद्यानुवाद करणें हें जास्त कौशल्याचें काम आहे हें अुघड आहे. काचेच्या लोलकावर सूर्यकिरण पडले असतां त्यांतून नानारंगांच्या मनोहर छटा बाहेर पडतात, तद्वत् कविकुलगुरु कालिदासाच्या प्रतिभातेजामुळे त्याच्या अेकेका श्लोकांतून रमणीय अर्थच्छटा बाहेर पडूं लागतात. त्या सर्व मराठींत अेकाच श्लोकाच्या बंदिस्त जागेंत धरून ठेवणें सोपें कसें म्हणतां येअील ! पण 'सुश्लोककुमारा'त डॉ. श्रीखंडे यांनी हेंहि कसब पुष्कळच यशस्वितेने प्रकट केलें आहे.

अेवढें खरें कीं, 'सुश्लोक कुमारा'च्या भाषेंत 'सुश्लोक गोविंदा'ची सफाअी नाही. मात्र कुमारसंभव काव्याच्या गंभीरतेस साजेल अशी 'सुश्लोककुमारा'ची भाषा प्रौढ आहे हेंहि कांही खोटें नाही. कदाचित् कित्येक कवि अुत्तरोत्तर भाषेच्या साधेपणाकडे झुकतांना दिसतात तसा कांहीसा प्रकार या बाबतींतहि होत असावा.

प्रस्तावनेमध्यें 'कुमारसंभव' हें 'रघुवंशा'च्या नंतरचें असावें, असें अनुमान प्रकट केलें आहे. माझें नम्र मत मात्र याच्या अुलट आहे ! 'रघुवंशांतील कवीची अष्टपैलु चतुरस्रता व विशेषतः त्यांत त्याच्या प्रतिभेचा 'कडकडून होणारा साक्षात्कार' पाहिला म्हणजे तें 'कुमार-संभवा'नंतरचें असावें, असा तर्क होतो.

या दोन महाकाव्यांतील सादृश्यें या दृष्टीने महत्त्वाचीं वाटतात. 'कुमार' सर्ग २ मध्यें ब्रह्मदेवाची तत्त्वज्ञानपर स्तुति आली आहे. तशीच अेक अीशस्तुति 'रघूं'तहि येते. पहिल्यांत सर्ग ७ मध्यें स्त्रियांच्या धांदलीचें व विवाहाचें वर्णन येतें, तसेंच तें दुसऱ्यांतहि येतें. पहि-ल्यांत सर्ग ४ मध्यें रतिविलाप येतो, तसाच दुसऱ्यांत अजविलाप येतो. फुटकळ कल्पनांचेंहि साम्य थोडेंसें आढळतेंच. यावरून त्या महाकवींत कल्पना दारिद्र्य होतें, असें म्हणतां येअील काय? पुष्कळवेळां आपण असें पाहतों कीं, कवीच्या दृष्टीने सापेक्षतः कमी महत्त्वाच्या (Minor) अशा काव्यांतील कांही भाग जास्त महत्त्वाच्या (Ambitious) कृतींत समाविष्ट करण्यांत येतो. तसाच प्रकार येथे घडत असावा, असें वाटतें. म्हणून 'कुमार' हें 'रघू'च्या आधीचें काव्य असावें, असा होरा वाहतो.

'कुमारांतील कांही वर्णनें वगैरे कालिदासाच्या 'रघू'व्यतिरिक्त अन्य कृतींतहि आढ-ळतात. जसें 'कुमार' सर्ग ३, श्लोक ३६ याचें 'शाकुन्तलां'तील 'शृङ्गे कृष्णमृगस्य वामनयनं कण्डूयमानां मृगीम्।' हा चवथा चरण असलेल्या श्लोकाशीं थोडें साम्य आहे; तसेंच कुमार ५।९ यांतील अन्त्य चरणांतील कल्पना 'शाकुंतलां'तील 'सरसिजमनुविद्धं शैवलेनापि रम्यम्।' या चरणांत आली आहे. यावरूनहि अुपरोक्त अनुमानासच पुष्टि येते.

अर्थात् 'कुमारा'व्यतिरिक्त 'रघु' वगैरे कृतींचें कालिदासाच्या अन्य कृतींशीं कुठेच सादृश्य नसेल असें नाही. जसें, 'शाकुंतलां'तील 'रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान्।' या श्लोकाचें मूळ 'रघूं'तील अेका श्लोकांत सांपडतें. पण त्याने वरील तर्कास बाध येत नाही. अशीं साम्यस्थळें जितकीं आहेत त्यांहून 'कुमार' व 'रघु' यांतील साम्यस्थळें जास्तच भरतील, हें येथे ध्यानांत घेतलें पाहिजे.

ग्रन्थकर्त्यांनी प्रस्तावनेंत कालिदासाची जास्त माहिती दिली असती, तर दुधांत साखर पडली असती. तसेंच 'कुमारा'चें अधिक विवेचनहि यावयास पाहिजे होतें. त्यांतील शिव-पार्वतीच्या संभोगाचीं वर्णनें पुष्कळांस आक्षेपार्ह वाटतात हें तर खरेंच, पण जगाच्या या पित-

१ मधु द्विरेफः कुसुमैकपात्रे पपौ प्रियां स्वामनुवर्तमानः।
शृङ्गेण च स्पर्शनिमीलिताक्षीं मृगीमकण्डूयत कृष्णसारः ॥ ३.३६
प्रिये मागें मागें गुणगुणत गेला अलि सुखी
तिच्या संगें पी तो मधु कुसुमरूपी सुचषकीं
मृगीतें शृंगाग्रें मृग सुखवि तो खाजवुनिया
सुखस्पर्शी तीही अनुभवित नेत्रा मिटुनिया ३.३६ सुश्लोककुमार

रांस कालिदासाने 'कुमार' ८,७६–७८ यांत मदिरापान करायला लावलें आहे, याचें मला जास्त आश्चर्य वाटलें ! प्रवृत्तीच्या त्या युगांत या गोष्टी सर्रास रूढ असल्यामुळे कवीला त्याचें कांही वाटत नसावें. या सर्व मुद्यांविषयी प्रस्तावनेंत निर्भीड विवेचन यावयास हवें होतें. असो.

डॉ. श्रीखंडे यांची मूळ काव्याचा अनुवाद सरस झाला आहे अशी स्तुति करणें, म्हणजे सूर्याला तेज आहे असें सांगण्यासारखेंच निरर्थक ठरणार आहे. अनुवादकर्लेतील ते खरोखरच 'अुस्ताद' आहेत. ते जो अनुवाद करतील तो अुत्कृष्ट असणारच, हें आता ठरल्या-सारखें झालें आहे. 'सुश्लोककुमार' हा 'सुश्लोकगोविंदा'प्रमाणेंच खरोखरच 'सुश्लोक' आहे, अेवढें म्हटलें म्हणजे पुरें आहे.

हा अनुवाद मीं मुळांशी मधून मधून ताडून पाहिला. डॉ. श्रीखंडे यांची प्रतिज्ञा जरी भावार्थकथनाची असली तरी पण बऱ्याच ठिकाणीं मुळांतील बारीकसारीक मौजाहि अुतरल्या आहेत. अुदाहरणार्थ, ४।८ मधील 'स्मरसि स्मर०' या मुळाचें 'स्मरा ! हो स्मरा ना !' हें भाषान्तर यथार्थ नाही असें कोण म्हणेल ! कांही स्थळीं तर स्वतंत्र रचना करून फारच बहार केल्याचें दिसून येतें. जसें, ७।२६ मधील 'सफेनपुञ्जा' या मूळ शब्दप्रयोगापेक्षा मला त्यांचा 'फेनपुंजाळ्य' हा शब्दप्रयोग जास्त आवडला.

---

१ त्वद्वक्त्रगंध मुळचा बकुलासमान
स्वाभाविकीच नयनांतहि लालि पूर्ण,
वक्त्रीं विलासिनि ! तुझ्या, मदिरा निवास
लाभोनि काय करणार तरी विशेष ? ७६
प्रेमा सखी करि तुझ्यावरि त्यास मान
द्याया, अनंगगुणवर्धन सेविं पान."
ऐसें वदोनि वच सुंदर शंकरें तें
पाजीयलें मधु मनोरम अंबिकेतें ७७
तें पान तें उपजवी बहु विक्रियेस
जी विक्रिया परि मनोज्ञचि हो विशेष;
येतां अतर्क्य घटना विधिची घडोनी
आम्रासि येत सहकारपणा जडोनि. ७८ सुश्लोककुमार, सर्ग ८.

२ स्मरसि स्मर मेखलागुणैरुत गोत्रस्खलितेषु बन्धनम् ।
च्युतकेशरदूषितेक्षणान्यवतंसोत्पलताडनानि वा ॥ कुमार० स. ४.८॥
चुकुनि अपरनामीं नामघेत्या तुम्हां मी
कवळुनि दृढ बांधीं मेखळा पुष्पदामीं,
नयनि रज विभूषांभोजि वा ताडितांना
उडवि तुमचिया मी, हें स्मरा ! हो ! स्मरा ना ! सुश्लोककु० स.४.८

३ क्षीरोदवेलेव सफेनपुञ्जा पर्याप्तचन्द्रेव शरत्त्रियामा ॥
नवं नवक्षौम निवासिनी सा भूयो बभौ दर्पणमादधाना कु. ७.२६
क्षीराब्धीची जसि विलसते फेनपुंजाळ्य वेला
पूर्णेन्दूनें चढत जसि भा शारदी पूर्णिमेला.
तैशी शोभे अतिशय उमा रेशमी वस्त्र ल्याली
पाहायातें निजतनु यदा दर्पणा घेति झाली. सु. ७.२६.

क्वचित् मुळांत नसलेला अन्य काव्याचा सूक्ष्म स्पष्ट प्रतिध्वनिहि अनुवादांत अुमटला आहे. तो आकर्षक वाटला. पा. ८७, श्लोक ४९ यांतील 'वप्रक्रीडा' शब्द 'मेघदूतां'तील त्याच शब्दाची आठवण देतो[१].

अनुवादांत कांही दोषस्थलेंहि आढळतात. अर्थाच्या दृष्टीने पाहतां ४।१९ मधील मूळ 'विबुध' या श्लिष्ट पदांतील खोच अनुवादांतील 'देव' या पदांत आली नाही. शुद्धतेच्या दृष्टीने पाहिलें असतां अनुवादांत ऱ्हस्वदीर्घांची ओढाताण आढळते. पा. १७ श्लोक ३१ येथील 'जि' शब्द (असेंच ऱ्हस्वीकरण पुढेहि येतें !) पा. २२, श्लोक ६० मधील 'दोघि' शब्द कर्णकटु वाटतात. पा. १४, श्लोक १४ येथील 'असशी' रूपहि श्रुतिसुभग वाटलें नाही.

परन्तु अशीं स्थळें थोडीं असल्याने (व तीं प्रायः सर्वच कृतींत असतात !) अनुवादाच्या अंगभूत सौंदर्यास ढळ पोंचत नाही. छंदोदोष शोधण्याचा मीं यत्न केला, पण ग्रन्थकारांनी माझा सपशेल पराभव केला हें कळविण्यास आनन्द वाटतो. डॉ. श्रीखंडे यांचें छन्दांवरील प्रभुत्व निःसंशय वाखाणण्यासारखें आहे.

नकुलालंकारांतील अेका आर्येत कै. पटवर्धनांनी स्वभावोक्तीची अितर अलंकारांवर कडी दाखविली आहे. स्वभावोक्तीचें महत्त्व मला अमान्य नसलें, तरी निव्वळ स्वभावोक्तीने निदान प्रदीर्घ रचना तरी रंगूं शकत नाही, असें मला वाटतें. 'कुमारां'त स्वभावोक्तीचीं सुंदर अुदाहरणें आहेत. अुदाहरणार्थ,

स दक्षिणापाङ्गनिविष्टमुष्टिं नतांसमाकुञ्चितसव्यपादम् ।
ददर्श चक्रीकृतचारुचापं प्रहर्तुमभ्युद्यतमात्मयोनिम् ॥ ७० ॥ कुमारसम्भव, सर्ग ३

दिसे त्यातें मुष्टी धरुनि उजव्या कोणिं नयनीं
नतांसें जो बैसे निजचरण डावा मुरडुनी
धनुर्ज्या कर्षोनी करित धनु जो वर्तुल जणूं
शरें हाणायाला टपुनि बसला मानसजनू ॥ ७० ॥ सुश्लोककुमार, सर्ग ३

ध्रुवेण भर्त्रा ध्रुवदर्शनाय प्रयुज्यमाना प्रियदर्शनेन
सा दृष्ट अित्याननमुन्नमय्य ह्रीसन्नकण्ठी कथमप्युवाच ॥ ८५ ॥ सर्ग ७

तीतें दावी ध्रुव पति तिचा, कांत जो का नितान्त,
जेव्हां तारा ध्रुव निरखिण्या, उत्तरेचा दिगन्त
लज्जायुक्ता कशितरि मुखा अुंचवोनी वदे ती
अस्पष्टत्वें कलमधुरशी 'देखिला' अैशि अुक्ति ॥ ८५ ॥ सुश्लोककुमार, सर्ग ७

---

१ ज्याच्या कंठीं रुणझुणति त्या स्वर्णघंटा लहान,
ऐसा नंदी नटत गगनीं वाहतो त्यासि तूर्ण,
मेघामध्यें शिरलिं बहुधा हालवी जो स्वशृंगें !
वप्रक्रीडा जणुं करित तो पंकतुल्याभ्रसंगें ! सुश्लोककुमार ८.४९

२ विबुधैरसि यस्य दारुणैरसमाप्ते परिकर्मणि स्मृतः ।
तमियं कुरु दक्षिणेतरं चरणं निर्मितरागमेहि मे ॥ कुमारसं० ४.१९

पद अजिं मम डावें लागशी रंगवाया
स्मरुनि तुजसि नेती क्रूर तों देव, राया ।
म्हणुनि चरणभूषा जी अपूर्णाचि राही
त्वकरि परिपूर्णा ती करायासि येई । सुश्लोककुमार ४.१९

पण या महाकाव्याची खरी शोभा म्हणजे त्यांतील भव्य रम्य कल्पना होत. उदाहरणार्थ खालील ३।२९, ७।५३ ७।७९, ८।५४, ८।६३ वगैरे श्लोक पाहा.

पलाशा आलेल्या अविकसित त्या लाल कलिका
शशीच्या कोरेचें कुटिलपण ज्यां येइलं तुका
वसंतें कीं केलीं दयितवनभूतें निजनखीं
क्षतें ताजीं तीं जीं अभिनव सखी संगमिं निकीं ! ३।२९
दोन्ही तेव्हा पुरगण तसे ते सुरांचेहि संघ
आले वेगें झणिं अुघडल्या त्या पुरद्वारिं ओघ;
जाणों सिन्धुद्वय मिसळलें भंगुनी सेतुबन्ध
ज्याचा घ्यापी ध्वनिसकलदिग्भाग घोषें अमंद. ७।५३
होमाग्नीच्या भंवति करिती जेधवां सव्य फेरी
तेव्हां दोघे अति विलसती दंपती शंभुगौरी,
वाटे जोडी दिवसरजनी मूर्त एकत्र आली,
अेकामेकां धरुनि फिरती मेरुच्या भोंवताली ! ७।७९
अस्तास संध्यातप सर्व जातां रेषा अुरे पश्चिमिं अेक रक्ता
रणांगणीं वांकडि रोविलेली सशोणिता ती जणुं खड्गवल्ली ! ८।५४
करांगुलींनी जणुं केशपाशा करीं धरोनी तिमिरासि वैशा,
निशामुखा चुम्बि जणों शशांक तैं पद्मनेत्रें मिटलींत देख ! ८।६३

८।५४ सारखी कल्पना कांहीशी Paradise Lost मध्यें येते. त्यांत लखलखणाऱ्या धूमकेतूला म्यानाबाहेर काढलेल्या लखलखत्या तरवारीची समर्पक उपमा मिल्टनने दिली आहे. अशा मनोज्ञ कल्पना अभ्यासाने सुचतात असें पटवर्धन म्हणतात; पण माझ्यामते अुत्कृष्ट कल्पना हुकमी मांडतां येत नाहीत. त्या जेव्हा सुचायच्या तेव्हाच सुचतात; अेरव्ही कितीहि धडपड केली तरी सुचत नाहीत.

असो. कालिदासासारखा मूळ कवि व डॉ. श्रीखंडे यांसारखा अनुवादक हा मणिकांचन-योग होय. श्रीमंत राजे औंधकर यांनी अुपोद्घातांत सुचविल्याप्रमाणे त्यांनी स्वतंत्र रचना करावीच पण संस्कृत दीर्घ कृतींचा सरस पद्यानुवाद हें जें डॉ. श्रीखंडे यांचें वैशिष्ट्य आहे तें त्यांनी सोडूं नये. लेखनाचें यश वैशिष्ट्यांतच सांठविलेलें असतें.

वा. ना. देशपांडे

---

## पिंजऱ्यांतील पक्षी

[लेखक : भ. दि. गांगल, बी.अे., ठाणें; कला-प्रकाशन, नवा गोवा; किंमत १॥ रुपया.]

बऱ्याच वर्षांपूर्वी 'आसवांची माळ' ह्या हृदयंगम कादंबरीने श्री. गांगल यांनी महाराष्ट्र-वाचकांचें लक्ष आपल्याकडे वेधून घेतलें. त्यानंतर सात आठ वर्षांनी प्रस्तुत कादंबरी प्रसिद्ध झालेली आहे. अर्थात् दरम्यानच्या कालखंडामध्ये लेखकाला मिळालेल्या विविध अनुभवांचा ठसा ठिकठिकाणीं ह्या कादंबरीमध्ये प्रतीत झाला तर नवल नाही. आरंभापासूनच लेखकाने

सर्व पात्रें हीं परिस्थितीच्या पिंजऱ्यांत कोंडून पडलेले पक्षी आहेत अशी भावना मनाशीं बाळगून त्या सूत्रानुरोधाने कथानकाची मांडणी केलेली आहे. कथानकांतहि सारे प्रसंग म्हणजे पिंजऱ्यांतून सुटून जाण्यासाठी त्या पात्रांनी केलेली धडपड आहे असें म्हटल्यास अयोग्य होणार नाही.

'दोन बायकांचें दादले' हा विषय लेखकाला बराच जिव्हाळ्याचा वाटत असावा असें वाटतें. ह्या कादंबरीमध्येहि सीतेचा नवरा भिकोबा ह्याने सीता जिवंत असतां दुसरीशीं संसार थाटलेलाच आहे. मात्र भिकोबा हा अगदी सामान्य, अशिक्षित व तत्त्वशून्य असा दाखविलेला असून तो परप्रत्ययनेयबुद्धी आहे. पण लेखकाच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे, "अेक दुर्बल पुरुषहि अेका मुलीला सहजासहजीं सुखाला कायमची पारखी करूं शकतो."

परिस्थितीशीं झगडतांना आत्माहुति देणाऱ्या देव मास्तरांच्या कुटुंबाच्या—त्यांची दुर्दैवी पत्नी आणि वासुदेव-सीता हीं दोन लहान मुलें ह्यांच्या— कष्टमय जीवनाच्या चित्रणानें कथानकाला आरंभ केलेला आहे. नंतर त्यांना मनोहरच्या आअीबापांचा मिळालेला आश्रय, त्याच वेळीं सीतेची करुण कहाणी, मंदेचा परिचय, मनोहर बर्वेचा अमोल स्नेह, त्याच्या आअीवर पतिनिधनाचा कठोर प्रसंग ओढवला असतांनासुद्धा तिने दाखविलेलें देव मास्तरांच्या पोरक्या पोरांवरचें प्रेम, या सर्वच गोष्टी हृदयंगम आहेत. मंदेच्या वडिलांचा स्वभाव व विशेषत: मंदेचा मनोहर बर्वेशीं विवाह होण्यास त्यांनी केलेला हेकेखोर प्रतिकार हीं श्री. पु. य. देशपांड्यांच्या 'सदाफुली'तील नायिकेच्या वडिलांची आठवण करून देतात. मंदेच्या मनाचा असह्य कोंडमारा तिच्याविषयी सहानुभूति अुत्पन्न करतो पण अखेरीस सर्व विरोधाला धीराने तोंड देअून ती आपला करारीपणा दाखविते त्या वेळीं तिच्याबद्दल कौतुकच वाटतें. मात्र अेवढें म्हटल्याशिवाय राहवत नाही की स्वतःचें हिताहित कळण्याची पात्रता अंगीं आलेल्या मुलींनी, केवळ हेकेखोरपणामुळे होणाऱ्या विरोधाला वेळींच मोडून काढतांना, किंचित् काल आपला विनय व शालीनता हीं बाजूस ठेअून 'ठोशाला ठोसा' हें धोरण स्वीकारलें, तरी अयोग्य होणार नाही. स्वतःच्या दौर्बल्यामुळे अुगीचच अुदास वातावरण निर्माण करून दुसऱ्यांच्या सहानुभूतीची अपेक्षा करीत बसणें हें विकृत मनोवृत्तीचें लक्षण आहे.

सीतेच्या बाबतींत लेखकाने वापरलेला 'वेडाबाअी' हा शब्दच सर्व कांही सुचवितो. त्यांत प्रेम आहे, दया आहे, सहानुभूति व आदरहि आहे. पण लेखकाने तिच्यावर वैराग्य लादलें आहे. तसेंच तिला मास्तरीण बनवून लेखकाने जें स्वातंत्र्य दिलें आहे त्याच वेळीं सवतीच्या मातृहीन मुलांचा सांभाळ करण्याचें औदार्य दाखविलें असतें तर तिची भूमिका अधिक चांगली झाली असती. नैसर्गिक संबंधापासून होणाऱ्या परिणामाकडे पाठ फिरविण्याचा अधमपणा नवऱ्याने-भिकोबाने-दाखविला म्हणून तिनें त्याला कायमचा झिडकारला हें योग्यच. पण हीच मास्तरीण आजकलच्या शिक्षकिणींप्रमाणे केवळ चैनींत व छानछोकींत आपलें आयुष्य बेलगामपणें घालविण्यास अुद्युक्त होणार नाही कशावरून ! सीतेचें स्वातंत्र्य राखण्यांत विशेष फायदा आहे असें वाटत नाही.

वासुदेव-वसुंधरेच्या प्रेमाच्या बाबतींत वासुदेवाप्रमाणेच लेखकानेहि पाठ दाखवून पळ काढला आहे असें म्हटल्याशिवाय राहवत नाही. वसुंधरेला मात्र खरोखरीच 'पिंजऱ्यांतला पक्षी' म्हणतां येअील. तिच्या भोळ्या, सरळ मनांत मनोहर, मंदा आणि वासुदेव यांनी जगाचें विस्तीर्ण स्वरूप दाखवून आशा अुत्पन्न केली, वासुदेवाने विवाहाची शपथहि घेतली; पण मग

तिच्या अज्ञानी व हेकट आअीबापांपासून तिची सोडवणूक करण्याचा अल्पहि प्रामाणिक प्रयत्न ह्या वाचाळांपैकी कुणींहि केला नाही. वसुंधरेच्या परिस्थितींतल्या मुली वडील माणसांच्या दुराग्रहाला बळी पडतात हें खरें पण पुढे त्या झुरून मरतात हें मात्र तितकेंसें खरें नाही. आणि या ठिकाणींच मनोविश्लेषणाचा अभाव तीव्रपणें जाणवतो. वसुंधरेला दुःसह परिस्थितींतून सोडविण्यासाठी वासुदेव-मनोहर वसुंधरेच्या आअीबापांशीं कांही वाटाघाटी किंवा लढा करतील असें वाटलें होतें पण तसें कांहीच झालें नाही. या ठिकाणीं दुःखपर्यवसानाने परिणाम अुत्पन्न करण्याची हौस लेखकाने भागवून घेतली असेंच म्हटलें पाहिजे.

अेकंदर भाषा सरस आहे. पण लेखकाने सूचकतेचा अधिक अुपयोग केला असता तर कथानक याहूनहि विशेष परिणामकारक झालें असतें. कादंबरी हृदयंगम व मनोरंजक खासच आहे. सदभिरुचीला कुठेहि धक्का न देतां विविधताहि साधलेली आहे. ह्या पुस्तकाने मराठी कादंबरीवाङ्मयांत चांगली भर पडली आहे यांत संशय नाही.

य. ग. वझे

---

## श्रीमत्पूज्य पाद – स्वामीकृत समाधिशतक

[ अनुवादक : श्री. रा. ने. शहा; प्रकाशक : श्री. जिनवाणी प्रसारक चारित्र्य चक्रवर्ती श्रीमदाचार्य शांतिसागर दिगंबर जैन शासन माला, मालेगांव. ]

"श्रीमत्पूज्यपादाचार्य यांनी रचिलेल्या अध्यात्मविषयक या पद्यमय ग्रंथाचा श्रीयुत रावजी नेमचंद शहा वकील, सोलापूर, यांनी केलेला मराठी अनुवाद वाचून पाहिला. या अनुवादांत रा. शहांनी मूळ विषय सुगम आणि स्पष्ट करून मांडला आहे. अध्यात्मविषयाला साजेल अशी प्रौढ मराठी भाषा त्यांनी वापरली आहे. या अनुवादावरून त्यांचें मराठी व संस्कृत या भाषांवरील प्रभुत्व स्पष्ट दिसून येतें. या त्यांच्या ग्रंथाचा आदर केवळ जैनच काय पण जिज्ञासु जैनेतरांनीहि करावा. सत्यज्ञान हें धर्मातीत असतें.

के. ना. वाटवे

---

# कै. राजारामशास्त्री भागवत व कोल्हापुरांतील एक प्रसंग

[लेखक: वा. भु. पाटील. बी.ए., एलएल्.बी., वकील, सांगली.]

खि. स. १९४० च्या अेप्रील महिन्याच्या महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या अंकांत कु. दुर्गा भागवत, अेम्.अे., यांचा "महाराष्ट्रांतील कर्त्या सुधारकांचे अग्रणी" राजारामशास्त्री भागवत यांच्या स्वभावाचा, लिखाणाचा व आचारविचारांचा अटर परिचय करून देणारा लेख वाचून कै. राजारामशास्त्री यांच्या कोल्हापूर येथील व्याख्यानांत घडलेल्या अेका प्रसंगाची आठवण झाली. कु. दुर्गा भागवत यांच्या लेखांत, 'गायत्रीमंत्र हा स्त्रीला व पुरुषाला, त्याचप्रमाणे ब्राह्मणाला व शूद्राला मिळण्याचा सारखाच अधिकार आहे असें कै. भागवत यांचें मत होतें' असें म्हटलें आहे. त्याप्रमाणे गायत्रीमंत्राची सार्वत्रिक शिकवण देणें, व ब्राह्मणेतरांत जागृति करून त्यांची संघटना करणें या त्यांच्या दोन कार्यांशीं या प्रसंगाचा संबंध येतो. तो प्रसंग असा–

१९०३।१९०४ च्या सुमाराची गोष्ट. कदाचित् तें साल १९०४।१९०५ हि असावें. प्रस्तुत लेखक त्या वेळीं कोल्हापूर येथील राजाराम हायस्कूलांतील विद्यार्थी होता. कोल्हापुरांत ब्राह्मण-ब्राह्मणेतरवाद थैमान घालीत होता. सामान्य मराठ्यांचेच काय पण छत्रपतींच्या राजवाड्यांतीलहि धार्मिक विधि वेदोक्त पद्धतीने न करण्याच्या दुराग्रहाला कोल्हापूरचे राजोपाध्ये पडले होते, व अुलट वेदोक्त पद्धतीनेच धार्मिक विधि करून घ्यावयाचा हा तर कै. शाहू छत्रपतींचा निश्चय होता.

कोल्हापुरास मराठा जातीच्या विद्यार्थ्यांकरिता एक विद्यार्थि-वसतिगृह आहे. तेथील विद्यार्थ्यांना गायत्रीमंत्र शिकवावा असें त्या संस्थेच्या चालकांनी ठरविलें. ठरलें. पण हा मंत्र शिकविणार ब्राह्मण कसा मिळणार? कै. राजारामशास्त्री भागवत यांचें या मंत्राबद्दलचें मत सर्वांनाच कळून चुकलें होतें. मराठा-विद्यार्थि-वसतिगृहांतील विद्यार्थ्यांना हा मंत्र सांगण्यासाठी शास्त्रीबुवांना कोल्हापुरास येण्याबद्दल निमंत्रण गेलें.

कोल्हापूर येथील जुन्या राजवाड्यांतील श्रीभवानी देवीच्या मंडपांत सभा झाली. शास्त्रीबुवा व्याख्याते होते. विषयाचें नांव नक्की आठवत नाही. एवढा मोठा सभामंडप पण तो श्रोत्यांनी चिकार भरून गेला होता. हिंदु पुराणांतील भाकडकथांवर अर्धा पाऊण तास शास्त्रीबुवांनी झोड उठविली. सभेस हजर असलेल्या सनातन्यांत– विशेषतः ब्राह्मणांत– चुळबूळ सुरू झाली; पण सभेंत उघड विरोध करण्याची कोणाची छाती झाली नाही. द्वारका नगरीचें क्षेत्र, यादवांची संख्या, प्रत्येक यादवाच्या देहाची उंची व रुंदी यांबद्दल शास्त्रीबुवांनी पुराणांतील उतारे देऊन असें दाखविलें, की इतक्या यादवांना द्वारका नगरीच्या क्षेत्रांत एकमेकांस बिलगून उभें राहतांहि येणें अशक्य; मग राहाण्याझोपण्याची गोष्ट दूरच. शास्त्रीबुवा श्रीभवानीसमोर उभे राहून व्याख्यान देत होते. सभामंडपाच्या उत्तरभागांत एक उतारवयाचे ब्राह्मण हें व्याख्यान ऐकत होते. या पुराणांतरीं वर्णिलेल्या कथा भाकडकथा आहेत, त्या असत्य आहेत, त्या विश्वासाला पात्र नाहीत; सबब त्यांवर विश्वास ठेवूं नका इत्यादि भाषण ऐकून या उतारवयाच्या ब्राह्मणाच्या पोटांत मळमळूं लागलें. तो देहभान विसरला. स्वारी

आपलें उपरणें सावरीत सावरीत उठली. मी आपल्या इतर स्नेह्यांसमवेत या स्वारीच्या मागे उभा राहूनच भाषण ऐकत होतों. मला वाटलें स्वारी विरोध करणार ! सभेंत गलबला होऊन मोठी मौज येणार ! परंतु माझी इतरांबरोबरच निराशा झाली. स्वारी उठली व "माझें नशीब ! नशीब !! नशीब !!!" म्हणून कपाळावर त्रिवार हात मारून आपल्या जागीं बसली–सभागृहांत थोडा वेळ हंशा पिकला व शास्त्रीबुवांचें व्याख्यान पुरें झालें.

या प्रसंगीं शास्त्रीबोवांनी मराठा विद्यार्थ्यांना गायत्रीमंत्र शिकविला, ब्राह्मण व हिंदु-धर्मीय पुराणें यांच्यावर हल्ला चढवून अंधभक्तांच्या डोळ्यांत चरचरित अंजन घातलें, ब्राह्मणेतरांत माणुसकीची जागृति केली. आपणास जें जें ठावें होतें तें तें इतरांना सांगून कोल्हापुरास रामराम केला. त्या सभाप्रसंगीं पाहिलेली शास्त्रीबोवांची देहयष्टि व नशीबाला बोल लावून कपाळाला त्रिवार हात लावणारा ब्राह्मण यांची चित्रें अद्याप दृष्टीआड झालेलीं नाहीत.

या एकांड्या पण तेजस्वी व निःस्पृह शिलेदाराचें, सुधारक व आजकालचे ब्राह्मणेतर यांना पडलेल्या विस्मरणाचें पटल दूर करण्याचें उच्चतर कार्य कु. भागवत यांनी केलें; याबद्दल मी त्यांना हार्दिक धन्यवाद देतों.

——×——

# समाजशास्त्राभ्यासाचे साधनकण



[ले० : श्री. चिंतामण गणेश कर्वे]

[आपल्याकडे समाजशास्त्राचा अभ्यास करणारे विद्वान फारच थोडे आहेत; आणि कै. वि. का. राजवाडे, कै. डॉ. केतकर, श्री. ना. गो. चापेकर, डॉ. घुर्ये यांच्याप्रमाणे प्रत्यक्ष समाजाची भाषा, आचार, चालीरीती, व्यवहार, धर्मसंस्कार इत्यादि विविध अंगांची माहिती मिळवून तीवरून शास्त्रीय अनुमानें काढणारे तर त्याहून थोडे. अशा स्थितींत पाश्चात्य पंडितांनी वरवर पाहाणी करून काढलेले समाजशास्त्रीय सिद्धान्त प्रमाण मानण्याची आजवर सुधारकांत पडलेली प्रथा मोडणें कितपत शक्य आहे ! आपल्यांत सुशिक्षित थोडेथोडके नाहीत. पंडित, प्रवीण (पीएच्. डी., डी.लिट्.) अशा उच्च पदव्या घेतलेलीं माणसेंहि संख्याधिक्यानें पुढे येत आहेत. तेव्हा यांपैकी कांहीजणांनी समाजशास्त्राच्या संशोधनाचीं साधनें स्वतः जमविण्याचा उद्योग आरंभल्यास भारतीय समाजशास्त्राचा अभ्यास व्यवस्थित सुरू होईल. समाजांतील प्रत्येक वर्गानें विशिष्ट नियम करून व बंधनें घालून, आपला समाज कसा बांधेसूद आणि संघटित राखण्याचा प्रयत्न केला, हें अभ्यासण्याजोगें आहे. असंस्कृत आणि वन्य जातींतहि नीतिपालनावर केवढा कटाक्ष असे, हें अशा अभ्यासामुळे दिसून येतें. उच्च वर्गांचें अनुकरण करणारे संस्कार, आचार खालच्या वर्गांत कसे वळावत गेले व अत्यंजांपासून तों वर ब्राह्मणांपर्यंत संस्कारांबाबत कसे हेलकावे मिळाले, या गोष्टी प्रत्येक जातींतील चालीरीती पाहिल्याने चांगल्या समजून येणार आहेत.

तेव्हा समाजशास्त्राचा मूलगामी अभ्यास म्हणून जें संशोधन-संकलन करावें लागेल, तें म्हणजे पुढे दिल्याप्रमाणे टिपणें-टांचणें तयार करणें. अनेक ग्रंथांतून अशी माहिती मिळेलच, पण प्रत्यक्ष त्या त्या जातींच्या लोकांकडे जाऊन, त्यांच्याकडून माहिती मिळवून, ती देणें हें जास्त महत्त्वाचें आहे. समाजशास्त्रीय लेखकांना असे वेंचलेले कण उपयुक्त वाटतात. गांवगाडा, ज्ञानकोशविभाग, जातींवरील पुस्तकें, खानेसुमारीचे अहवाल, गॅझेटीयर-माला इत्यादि ग्रंथ या प्रकारचा संकलनाला उपयोगी पडतील. रूढी, आचार, विचार इ. संबंधी जुन्या पुस्तकांतील माहिती देखील उपयोगी आहे. अशा माहितीवरून समाजाचा सांस्कृतिक दर्जा कळतो. आचार-विचार कसेकसे बदलत जातात, हें कळणें सुलभ होतें.

आपल्याकडे व विशेषतः मराठींतून अशा प्रकारची सामाजिक पाहणी करणारें लिखाण व साधनसाहित्य फार करून प्रसिद्ध होत नाही. त्यामुळे समाजशास्त्राचा अभ्यास करण्यास किंवा साधनें जमविण्यास जी सामान्य आवड उत्पन्न व्हावी लागते ती होत नाही. तेव्हा याप्रकारचे प्रयत्न उपयुक्त वाटतील, अशी आशा करतों.]

१ आंजणा कुणब्यांत रविवारीं अगर मंगळवारीं पाट लागतो.

२ आळकरी जातींत स्वजातींतील किंवा उच्च जातींतील माणसाशीं जारकर्म करणाऱ्या स्त्रीला प्रायश्चित्त देऊन जातींत ठेवतात, पण नीच जातींतल्या माणसाशीं कर्म करणारीस बहिष्कृत करतात. ही वहिवाट अितर कांही जातींतहि आहे.

३ कलार जातींत नवरदेवाची आत्या वरात निघण्यापूर्वी विहिरीच्या कांठावर आंत पाय सोडून बसते. वर तेथे येऊन तिची समजूत घालतो व तिला परत नेतो.

४ ढोर-कातकऱ्यांत नियोजित वधू वराच्या गळ्याभोवती उपरणें वेढून त्याला मंडपांत घेऊन येते व मग लग्न लागतें.

५ माथुर कायस्थांत लग्नापूर्वी वधू हातांत झाडाच्या डहाळ्या घेऊन वराला मारण्याचें सोंग करते, वर प्रतिकार करूं लागतो. या झटापटीनंतर लग्न होतें.

६ कैकाड्यांत विधवेच्या लग्नांत विधवा स्त्रियाच भाग घेतात. विधवेने नवऱ्याच्या पाठच्या भावाबरोबरच नवऱ्याच्या घरींच लग्न केलें पाहिजे. दिराशीं लग्न करण्याचा विधवेचा हक्क बऱ्याच जातींत आहे.

७ कैकाडणीने भिन्न जातीशीं व्यभिचार केला तर तिचें क्षौर करवून तिला दोन दारें असलेल्या झोपडींत अेका दाराने आंत जाण्यास सांगतात. नंतर ती झोपडी पेटवून देतात व तिला दुसऱ्या दाराने बाहेर येण्यास सांगतात. मग ती शुद्ध ठरते.

८ कोल्हाट्यांत विधवेला तिसऱ्यांदा लग्न करावयाचें झाल्यास लग्नाच्या वेळेस ती कोंबडें जवळ घेऊन बसते.

९ कोळ्यांत स्त्रीला माहेरून मिळालेले दागीनेच कायते तिच्या हक्काचे; नवऱ्याकडील नुसते असने, असें मानतात. विवाहित व्यभिचारी स्त्रीला किंवा अेक नवरा जिवंत असून दुसरा करणारीस 'सोवासन' (सवाष्ण? सुवासिनी) म्हणतात.

१० गारपगारी लोकांत मावशीच्या मुलांस नातें आठवतें आहे तोंपर्यंत परस्परांत लग्नें करीत नाहीत.

११ मध्यप्रांतीं चांभारांत अक्षतयोनी विधवेस 'बारंडी' व तशी नसलेलीस 'रंडी' म्हणतात. बारंडी नवरा मेल्यावर बांगड्या फोडीत नाही.

१२ तिळवण किंवा मराठे तेली सोमवारीं काम बंद ठेवतात, तर यहुदी तेली (बेने अिस्राअेल) शनिवारीं बंद ठेवतात. तेव्हा यांना अनुक्रमें सोमवार तेली आणि शनिवार तेली अशीं नांवें आहेत.

१३ धनगरांत चातुर्मासांतहि लग्नें होतात; पण राणादेवीच्या नांवाने तांदूळ पेरावे लागतात.

१४ कच्छांतील मघवाल ब्राह्मण धेडांच्या हातचें जेवतात, इतकेंच नव्हे तर कधीकधी शरीरसंबंधहि करतात.

१५ न्हाव्यांच्या बायका चिंचेच्या झाडासमोर बुरखा घेतात.

१६ भडबुंज्यांत नवरदेव स्त्रीचा पोशाख करून नवरीच्या मांडवांत नाचतो.

१७ भिल्लांत अेखादा मोठा माणूस मेल्यास घोड्यावर बसलेल्या माणसाची दगडी मूर्ति करून ती देवळांत ठेवतात.

१८ लाड बंजाऱ्यांत लग्नाच्या रात्रीं वधूवर स्वतः दोन शेर तांदूळ शिजवून सर्वांना घालतात. अुरलेलें गायीला चारतात किंवा नदींत टाकतात. या विधीला वाढीदैवत म्हणतात.

१९ वारली जातींत भावी वधूच्या आअीबापाची सेवा वराला करावी लागते. लग्नाला मुहूर्त लागत नाही.

२० महारांची लग्नसराअी आषाढांत असते. महार संबळ वाजवितात पण कड्यावर थाप मारीत नाहीत; मांग कडें वाजवितात पण ढोल किंवा डौर वाजविणें कमीपणाचें समजतात.

२१ व्यभिचार केला नाही याचें अिमान म्हणून कढत तेलांतली अंगठी किंवा पैसा दर दसऱ्याला वर काढून फासेपारधिणीला आपल्या नवऱ्याला दाखवावा लागतो.

२२ स्मशानांत प्रेत नेल्यावर जमिनीवर जो पैसा टाकतात तो विसाव्याच्या जागेचा म्हणून असतो व तो महार घेतो.

२३ कैकाडी, वडुर, कुंचेवाले, कोल्हाटी वगैरे जाती गाढवावर बसत असल्याने यांना गाढव-गोते म्हणतात. यांत अेकमेकांना अेकगोत्री चुलतभाअू समजतात.

२४ राशीनच्या देवीच्या देवळांत देवीपर्यंत मुसलमान जहागिरदार जातात, आपल्या हाताने प्रसाद अंगारा देतात व देवळांत आपला हक्क भुगवतात.

२५ हिंदु हिजड्यांचा गुरु मुंड्या हा मुसलमान असतो, हिंदु कसबिणीचा गुरु 'सवागी' (सौभाग्यदायी) फकीर असतो. हा यच्चयावत् कसबिणीकडून दर पलंगामागे निदान सव्वा रुपाया घेतो.

२६ शाक्तांत मांगिणीची पूजा सांगितली आहे.

२७ खुटेकर धनगरांना जातें, कंजारणीला सूप, फासेपारध्यांना दिवा व जोडा हीं अनेगा (निषिद्ध) आहेत.

२८ वडुर व गोंड जातींच्या बायकांनी चोळी घालूं नये व मांगगारोडी, फासेपारधी वगैरे जातींतल्या लोकांनी केस मुळीच काढूं नयेत, अशी त्यांच्या शास्त्रांची आज्ञा आहे.

२९ पोतराज (कडकलक्ष्मी) करतांना भांग, गांजा, अफू, दारू वगैरे मादक पदार्थ पूजेला लागतात.

३० खेड्यांतले सर्व धंदेवाले लोक कुणब्याला 'बळिराजा' असें संबोधितात. कुणब्यांत सुना सासऱ्याला 'पाटील' असें संबोधितात.

---

# आमचे चित्रपट व त्यांतील वाङ्मय

[लेखक: श्री. राम गोगटे, मुंबई]

चित्रपट ही अेक वाङ्मयांतील कला आहे, अशी कल्पना करून अलीकडे झालेल्या साहित्यसंमेलनांतून कोणत्या तरी चित्रपटविषयाची चर्चा करण्याचा प्रघात पडला आहे. चित्रपट हा वाङ्मयांतील अमुक अेक प्रकारच्या महत्त्वाचा विभाग आहे असें सिद्ध झालें असतें तर या चर्चा योग्य ठरल्या असत्या.

चित्रपट हा वाङ्मयांतील अेक विशिष्ट विभाग आहे असें जरी आपण धरून चाललों तरी वाङ्मय आणि चित्रपट यांचें नातें कोणत्या प्रकारचें आहे हें सिद्ध करण्यापूर्वी आता-पर्यंत जे चित्रपट दाखविले गेले त्यांनी वाङ्मयांत कोणत्या प्रकारची भर टाकली याचा विचार करणें अवश्य आहे. प्रस्तुत लेखांत १५ फेब्रुवारी १९३५ पासून २१ मे १९४० पर्यंत जे मराठी चित्रपट प्रसिद्ध झाले तेच फक्त हिशोबांत घेण्यांत येणार आहेत. कारण या मुदतींत प्रसिद्ध झालेले सर्व चित्रपट प्रस्तुत लेखकाने चिकित्सापूर्वक अवलोकन केलेले असून कोणत्या-हि कलेचा किंवा धंद्याचा आढावा घेण्यास चार वर्षांची मुदत पुरेशी असते. महाराष्ट्र साहित्य पत्रिकेकरता लिहिलेल्या या लेखांत जरी फक्त मराठी चित्रपटांचा विचार केला असला तरी त्यांतील विचारसरणी हिंदुस्थानांत निर्माण होणाऱ्या सर्व चित्रपटांना सारखीच लागू पडते.

वर सांगितलेल्या या चार वर्षांच्या मुदतींत अेकंदर ५१ मराठी चित्रपट सार्वजनिक रीत्या दाखविण्यांत आले. ह्या चित्रपटांचे या लेखांतील चर्चेसाठी अकरा विभाग पाडतां येतील. पहिल्या तीन विभागांत संतांचीं किंवा इतर प्रख्यात व्यक्तींचीं चरित्रें किंवा इतिहास आणि पुराणें ह्यांमधील प्रसंगांवरील आधारलेले चित्रपट येतील आणि त्यांची संख्या अनुक्रमें दहा, दहा आणि नऊ येईल. शिवाय भक्तिरसप्रधान असून सुद्धा पौराणिक चमत्कृतिप्रधान प्रसंगांवर आधारलेले आहेत असे दोन आणि भक्तिरसप्रधान असून ज्यांत अद्‌भुतरम्यता आणण्याचा प्रयत्न केला आहे असा अेक; असे आणखी तीन चित्रपट येतील. हे तीन चित्र-पट हिशोबांत घेतले तर वर दिलेले आंकडे अनुक्रमें बारा, दहा, आणि दहा असे येतील. यांपैकी दहा चित्रपट जरी वाङ्मयक्षेत्रांत कांही स्थान आहे अशा लेखकांनी लिहिले होते आणि **'चंद्रराव मोरे'** हा एक चित्रपट जरी अेका कादंबरीवर आधारला होता तरी त्यांपैकी संत तुलसीदास, धर्मात्मा, संत तुकाराम, ज्ञानेश्वर, राजा गोपीचंद, गोपालकृष्ण, चंद्रराव मोरे,

१ मिराबाई, संत तुलसीदास, धर्मात्मा, संत तुकाराम, ज्ञानेश्वर, पुंडलीक, भक्त चेता, भक्त दामाजी, कान्होपात्रा, संत नामदेव, संत जनाबाई, गोरखनाथ.

२ राजा गोपीचंद, राजा श्रियाळ, सती सुलोचना, गंगावतरण, सती पिंगला, नंदकुमार, गोपाळकृष्ण, ध्रुवकुमार, ध्रुव, मायाबाजार.

३ चंद्रराव मोरे, शिवजन्म, रायगड, अमाजी नाईक, नेताजी पालकर, भगवा झेंडा, मराठ्यांतील दुही, मराठ्याची मुलगी, बाजीप्रभु देशपांडे, स्वराज्यसीमेवर.

नेताजी पालकर हे आठच चित्रपट लोकप्रिय झाले, आणि तेसुद्धा त्यांतील वाङ्मयामुळे नव्हे तर त्यांतील अैतिहासिक वैभव किंवा भक्तिरसाचा अुठाव त्याचप्रमाणे त्यांतील नट-नटींची मूळची लोकप्रियता आणि गाण्याचें कौशल्य या गुणांमुळेच. यानंतरचे तीन विभाग ज्या चित्रपटांना देतां येतील त्यांपैकी प्रत्येकीं चार ते त्यांत समाजांतीलें कांही विशिष्ट प्रमेयांची चर्चा असल्यामुळे; कांही प्रत्यक्ष राजकारणावर आधारलेले नसले तरी, राष्ट्रीय समजल्या जाणाऱ्या बाबींच्या उल्लेखामुळे, किंवा निव्वळ विनोदप्रधानें असल्यामुळे देतां येतील. सातव्या विभागांतील दोनहि चित्रपट केवळ समाजांतील रूढींवर आधारलेले होते; या चित्रपटांपैकी अेका-खेरीज बाकीचे चित्रपट जरी प्रथितयश लेखकांकडूनं लिहिले गेले होते तरी त्यांतील सवंगडी, देवता, सुखाचा शोध, सावकारी पाश, ब्रँडीची बाटली, अर्धांगी, ब्रह्मचारी, कुंकू हे फक्त आठच यशस्वी झाले. यांपैकी अर्धांगी व ब्रह्मचारी या फक्त दोन चित्रपटांत वाङ्मयाचा अुच दर्जा दिसून आला तरीहि हे दोन्ही चित्रपट चित्रपट-क्षेत्रांतील वाङ्मय या नात्याने महत्त्वाचे होते असें म्हणतां येणार नाही. कारण ह्या चित्रपटांच्या कथा जर रंगभूमीवर नाटकाच्या स्वरूपांत आल्या असत्या किंवा नुसत्या पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाल्या असत्या तरीहि त्या तितक्याच लोकप्रिय झाल्या असत्या. शेवटच्या चार सदरांपैकी प्रतिभा व ज्वाला हे दोन चित्रपट नुसते अद्‌भुत रम्य होते. माझी लाडकी हा विनोदनाट्यात्मक (Comedy drama) होता. लक्ष्मीचे खेळ हा तत्त्वप्रबंधात्मक होता व धर्मवीर व्यंगात्मक होता. अद्‌भुत-रम्य असलेले दोन चित्रपट दोन कादंबरीकारांनी लिहिलेले होते आणि बाकीचे तीन नाटककारांनी लिहिले होते. यांपैकी लक्ष्मीचे खेळ या प्रबंधात्मक आणि धर्मवीर या व्यंगात्मक चित्रपटांत वाङ्मयीन गुण जरी होते तरीहि चित्रपट या नात्याने व्यंगात्मक तेवढाच यशस्वी झाला. ह्या अेकावन चित्रपटांच्या विश्लेषणांत अेवढ्याच अेका चित्रपटाचें वाङ्मयदृष्टीने नांव घेतां येईल. वाङ्मयात्मक महत्त्व आणि वैयक्तिक जीवनाचें अवलोकन योग्य प्रमाणांत असल्यामुळे करमणूक होअूनहि हा चित्रपट या सर्व चित्रपटांत विशेष परिणामकारक असा ठरला गेला.

ह्या सर्व ५१ चित्रपटांचा वाङ्मयदृष्ट्या असो किंवा चित्रपटदृष्ट्या असो, गुणदृष्ट्या आढावा घेतला तर ठोकळ प्रमाणाने असें म्हणतां येअील की, ह्यांतील चंद्रराव मोरे, नेताजी पालकर, सवंगडी, देवता, सुखाचा शोध, संत तुलसीदास, तुकाराम, धर्मात्मा, ज्ञानेश्वर, ब्रँडीची बाटली, अर्धांगी, ब्रह्मचारी, कुंकू, सावकारी पाश, धर्मवीर, गोपालकृष्ण, राजा गोपीचंद हे सतराच चित्रपट यशस्वी म्हणजे निर्मात्यांना कोणत्याहि प्रकारचें नुकसान न येतां लोकप्रिय झाले. या सतरांपैकी संत तुलसीदास, तुकाराम व ब्रह्मचारी, या तीन चित्रपटांनी निर्मात्यांना, त्यांच्या मध्यस्थांना आणि प्रदर्शकांना पाण्यासारखा पैसा मिळवून दिला. पण श्री. शिवराम वाशीकर व आचार्य प्र. के. अत्रे या त्यांच्या लेखकांना मात्र त्यांत त्यांना मिळालेल्या मजुरी-

४ सवंगडी, देवता, सुखाचा शोध, विजयाचीं लग्नें.

५ माझा मुलगा, अंधेरी दुनिया, सावकारी पाश, छाया.

६ ब्रँडीची बाटली, अर्धांगी, ब्रह्मचारी, प्रेमवीर.

७ कुंकू, माणूस.

८ भा. वि. वरेरकर, वि. स. खांडेकर, मा. ना. जोशी, य. गो. जोशी, विश्राम बेडेकर, वि. ह. औंधकर, प्र. के. अत्रे, ना. ह. आपटे, भास्करराव अर्मेवल.

९ ना. ह. आपटे, वि. स. खांडेकर.

१० मा. ना. जोशी, विश्राम बेडेकर, प्र. के. अत्रे.

शिवाय विशेष फायदा झाला नाही. वाङ्मयाचें महत्त्व असलेल्या अमेरिकन चित्रपटांशीं तुलना करतां आपल्या चित्रपटांतील चांगल्या चित्रपटांची संख्या कोणत्याहि प्रकारें कमी नाहीं असें दिसून येतें. यावरून असा निष्कर्ष निघतो की, निव्वळ वाङ्मयीन गुणांपेक्षा चित्रपट यशस्वी होण्यासाठीं आणखी कांही तरी विशेषांची आवश्यकता आहे.

चित्रपट यशस्वी व्हावयास योग्य प्रकारची कथा असली पाहिजे. कथा ही यशस्वी चित्रपटाचा आत्मा आहे. पण येवढ्यावरच हा प्रश्न संपत नाही. योग्य कथा हातीं आल्यानंतर तिची पटकथा तयार झाली पाहिजे. व पटकथालेखनाच्या तंत्रांत प्रावीण्य मिळविलेल्या लेखकांकडूनच ती लिहिली गेली तरच तिच्यावरून तयार केलेला चित्रपट यशस्वी होईल. ही जबाबदारी देशी चित्रपटांत समूळ उपेक्षिली जाते. वस्तुस्थिति अशी आहे म्हणूनच या ५१ चित्रपटांत कोणत्या दर्जाचे वाङ्मयीन गुण कोणत्या साहित्यिकांत दिसून आले याची चर्चा करणें अवश्य आहे.

या ५१ चित्रपटांपैकी सात चित्रपट अशा व्यक्तींनी लिहिलेले आहेत की, त्यांच्या हिशेबीं अेकहि वाङ्मयात्मक निर्मिति असल्याचें दिसून येत नाही. अर्थातच चित्रपट आणि वाङ्मयनिर्मिति ह्या दोन्ही दृष्टींनी हे चित्रपट अयशस्वी ठरले. माझी लाडकी, मिराबाई, सती सुलोचना, रायगड, धर्मात्मा, भगवा झेंडा, मराठ्याची मुलगी, मायाबाजार, संत नामदेव, या चित्रपटांच्या लेखनाचें काम ज्या लेखकांवर सोपविलें होतें ते वाङ्मयाशीं परिचित होते खरे पण त्यांपैकी, धर्मात्मा या अेकाखेरीज बाकीचे सर्व अयशस्वी ठरले. जो अेक यशस्वी झाला तो सर्व प्रकारच्या कलांचा आणि कौशल्याचा सर्वांगीण आणि सुरेल असा चित्रपटीकरणांतील मिलाफ झाल्यामुळेच होय. हिंदी चित्रपटांत या चित्रपटाला अति विशेष असें स्थान देतां येअील. तरीहि केवळ वाङ्मयीन महत्त्वाच्या दृष्टीने हा चित्रपटहि साहित्यक्षेत्रांत समावेश होण्याजोगा होता असें म्हणतां येणार नाही.

अुरलेल्या ३५ चित्रपटांच्या लेखनाचें काम ज्यांच्याकडे दिलें होतें त्यांपैकी श्री. मो. ग. रांगणेकर व श्री. रं. कृ. चिंचलीकर हे दोघे साहित्यक्षेत्रांत नुकतेच पाअूल टाकलेले होते. हे दोघे व श्री. भा. वि. वरेरकर आणि श्री. स. अ. शुक्ल या चौघांनी प्रत्येकीं दोन अशा चित्रपटकथा लिहिल्या.[११] या चार लेखकांपैकी अेकाने आपल्या आयुष्याचीं गेलीं २१ वर्षे सर्वस्वीं वाङ्मयाला वाहिलेलीं आहेत. या आठांपैकी सात चित्रपट पूर्णपणें ढासळले. वाङ्मयदृष्ट्या या चित्रपटांना फारसें महत्त्व नव्हतें; कारण यांतील 'विजयांचीं लग्नें' या श्री. भा. वि. वरेरकृत अेकाखेरीज बाकीचे चित्रपट साहित्यक्षेत्रांत फारसें महत्त्व नसलेल्या व्यक्तींनी लिहिलेले होते. परंतु ही गोष्ट जरी क्षणभर दूर सारली तरीहि या चित्रपटांचे निर्माते आणलेलें सोंग वठवायला समर्थ नव्हते; आर्थिक संकटांनी ते गांजलेले होते; आणि म्हणूनच हे चित्रपट अयशस्वी ठरले. अशी परिस्थिति नसती तर या सात चित्रपटांतील 'मराठ्यांतील दुही' व 'बाजीप्रभु देशपांडे' हे दोन चित्रपट वाङ्मयीन महत्त्वामुळे नव्हे, तर अितिहासांतील आदरणीय आणि वैभवशाली अशा विशिष्ट प्रसंगांवर आधारलेले असल्यामुळे आणि ते विशिष्ट प्रसंग आधुनिक

११. भा. वि. वरेरकर– १ रुवंगडी, २ विजयाची लग्नें.
स. अ. शुक्ल– १ राजा श्रियाळ, २ ध्रुव.
मो. ग. रांगणेकर– १ नंदकुमार, २ सन्त जनाबाई.
रं. कृ. चिंचलीकर– १ मराठ्यांतील दुही, २ बाजीप्रभु देशपांडे.

बहुजनसमाजाला अतिशय जिव्हाळ्याचे असल्यामुळे, आर्थिक दृष्ट्या यशस्वी झाले असते. यांपैकी आठवा चित्रपट 'सवंगडी' जो वाङ्मयाला गेलीं २१ वर्षे सर्वस्वीं वाहिलेल्या लेखकाने- श्री. भा. वि वरेरकर यांनी- लिहिला होता, त्याच्यांत वाङ्मयगुण होते आणि चित्रपट ह्या नात्यानेहि तो चांगल्यांपैकी झाला होता. पण चित्रपटाच्या धंद्यांतील अंतस्थ भानगडीला हा चित्रपट बळी पडला आणि त्यामुळे त्याचें आर्थिकदृष्ट्या नुकसान झालें. वाङ्मयांत असो किंवा चित्रपटतंत्रांत असो, जीं माणसें चमकलीं असतीं, चित्रपटाच्या धंद्याला ज्यांनी ऊर्जितदशा आणली असती, अशीं माणसें अंतस्थ भानगडींमुळे आज अंधारांत पडलीं आहेत.. परंतु तें कांहीहि असलें तरी हा चित्रपट आर्थिकदृष्ट्या यशस्वी न झाल्यामुळे लेखकांचे परिश्रम फुकट गेले आणि त्याचें नांव अयशस्वी लेखकांच्या यादींत पडलें.

ह्यापुढील, प्रतिभा, कुंकू, ध्रुवकुमार, चंद्रराव मोरे, ऊमाजी नाओीक, सावकारी पाश, अंधेरी दुनिया, लक्ष्मीचे खेळ, पुंडलीक या नअू चित्रपटांपैकी प्रत्येकीं तीन चित्रपटांना श्री. ना ह. आपटे, वि. ह. औंधकर, विश्राम बेडेकर या तिघांनी जन्म दिला आहे. या लेखकांचीं वाङ्मयापर्यं नांव घेण्याजोगीं होतीं. पण यांतील श्री. वि. ह. औंधकर यांच्या चंद्रराव मोरे व सावकारी पाश, या ज्या दोन कथा चित्रपटांत घेण्यांत आल्या त्या पूर्णपणें स्वतंत्र लेखनाच्या सदरांत मोडण्याजोग्या नव्हत्या. मात्र श्री. ना. ह. आपटे यांची कुंकू ही कथा वरीच यशस्वी झाली आणि तीमुळें या चित्रपटाच्या निर्मात्यांनीहि लौकिक संपादन केला. चित्रपटनिर्मात्यांच्या दृष्टीने कुंकू, सावकारी पाश व चंद्रराव मोरे, ह्या तिन्ही चित्रपटकथा अुदाहरणीय व अनुकरणीय होत्या तरीहि साहित्यनिर्मितीच्या दृष्टीने कोणाहि चिकित्सकाला त्या वाङ्मयाच्या कसोटीला पूर्णपणें अुतरण्याजोग्या होत्या असें म्हणतां येणार नाही. पूर्वी अुल्लेखिलेल्या सर्व प्रकारांच्या कलांच्या आणि कौशल्याच्या अेकीकरणाने ह्या चित्रपटकथांचें चित्रीकरण केलें असल्यामुळेच त्या यशस्वी झाल्या. ह्याशिवाय स्वतंत्र दृष्टीने कल्पिलेल्या अंधेरी दुनिया, लक्ष्मीचे खेळ व पुंडलीक या ज्या तीन कथा होत्या त्यांपैकी अंधेरी दुनिया व लक्ष्मीचे खेळ या दोन प्रस्तुतच्या आर्थिक जीवनांतील विषमता दिग्दर्शित करून सर्वसामान्य जनतेची दुर्दशा दाखविण्यासाठी जरी लिहिल्या गेल्या होत्या तरी दुर्दैवाने त्याहि अयशस्वी ठरल्या. वाङ्मयीन महत्त्व नसल्यामुळे या कथा अयशस्वी ठरल्या नाहीत कारण त्यांपैकीं अंधेरी दुनिया व पुंडलिक या दोन जर अनुभविक दिग्दर्शकाच्या हातीं असत्या तर खात्रीने यशस्वी झाल्या असत्या. पण स्वतःला अपरिचित असलेल्या क्षेत्रांतील तांत्रिक आणि शास्त्रीय विभागांत हात घालण्याचा जो अव्यापारेषु व्यापार त्या लेखकाने केला त्याचमुळे त्या अयशस्वी ठरल्या. केवळ चित्रपटासाठीं लिहिलेल्या कथा, परदेशीय कथांचा आढावा घेअून पाहिला तरीहि, सर्वस्वीं यशस्वी होतातच असें नाही, असा जो मुद्दा प्रस्तुत लेखकाने अितरत्र पुनः पुन्हा मांडला आहे त्याला हीं अपयशाचीं अुदाहरणें दुजोरा देत आहेत. म्हणून वाङ्मयक्षेत्रांत असें खातें निर्माण केलें गेलें पाहिजे की त्या खात्याच्या द्वारें पटकथालेखकांचा अेक संघ तयार होओील; आणि त्याजकडून पूर्वी लोकप्रिय झालेल्या कथानकांवर आधारलेल्या पटकथा लिहून घेतल्या जातील. असें झालें तरच चित्रपट यशस्वी होअू शकतील. असा विभाग अस्तित्वांत आणण्याचा प्रयत्न 'भारतीय लेखकसंघ'[12] या संस्थेने योजिला होता. पण महाराष्ट्राच्या नित्याच्या संवयीप्रमाणे

12 Association of Authors, Composers & Writers of India, I. B. 3, Sir Mangaldas Estate, Lamington Road, Bombay 4.

लेखक ह्या संघाशीं सहकार्य करावयास अुत्सुकतेने पुढे सरसावले नाहीत. हा संघ कार्यक्षम झाला तर लेखकांचे परिश्रम आर्थिक दृष्ट्यासुद्धा फलदायी झाल्यांवाचून राहणार नाहींत व त्यांचें आजचें दैन्य लौकरच नाहींसें होअील.

याच वेळीं चित्रपटनिर्माते चित्रपटाच्या वाङ्मयविभागांत जी निष्कारण आणि निराधार ढवळाढवळ करतात तिचा जितका निषेध करावा तितका थोडाच होअील असें म्हटलें तर अप्रस्तुत होणार नाही. वाङ्मयक्षेत्रांत होत असलेल्या या अप्रस्तुत ढवळाढवळीमुळे चित्रपटनिर्मात्यांना आर्थिक दृष्ट्या जरी प्रत्यक्ष चिमटा बसत आहे तरीहि आता त्यांच्या स्वभावाला खिळून गेलेली सवय त्यांना असाध्य होअून बसली आहे.

यापुढील चार चित्रपट– संत तुकाराम, संत तुलसीदास, गोपालकृष्ण व ज्ञानेश्वर– ज्या लेखकाने लिहिले त्या श्री. शिवराम वाशीकर यांनी भक्तिरसात्मक चित्रपट लिहिण्याचा मक्ताच घेतला आहे असें दिसून येतें. त्यांचे चित्रपट यशस्वी झाले खरे परंतु त्याचें सर्व श्रेय त्या चित्रपटांच्या दिग्दर्शकांच्या असामान्य तंत्रयोजकतेलाच आहे. या लेखकाने निर्माण केलेलें वाङ्मय साहित्यक्षेत्रांत चमकलेलें दिसत नाही. या चित्रपटांच्या यशस्वितेवरून असा अंदाज काढतां येतो की, वाङ्मयीन गुण हेंच कांही सर्वस्वीं चित्रपटांच्या यशस्वितेचें गमक नव्हे तर अशा आणखी अितर कांही तांत्रिक बाबी आहेत की त्या वाङ्मयीन मूल्य नसलेल्या कथेलाहि चित्रपट ह्या नात्याने महत्त्व आणूं शकतात.

आता फक्त आचार्य प्र. के. अत्रे, श्री. वि. स. खांडेकर, श्री. भालजी पेंढारकर या तीन लेखकांनी लिहिलेल्या ब्रँडीची बाटली, अर्धांगी, धर्मवीर, प्रेमवीर, ब्रह्मचारी, देवता, सुखाचा शोध, ज्वाला, छाया, राजा गोपीचंद, नेताजी पालकर, स्वराज्यसीमेवर, कान्होपात्रा, गोरखनाथ या चौदा चित्रपटांचा आढावा घेणें बाकी राहिलें आहे. चित्रपटकथालेखकांत मराठी भाषेच्या क्षेत्रांत या तीन लेखकांच्या जास्तींत जास्त कथा समाविष्ट झाल्या आहेत. या तीनहि लेखकांनी ज्या कथा लिहिलेल्या आहेत त्या प्रत्येकीं अेका विशिष्ट प्रकारच्या असल्यामुळे त्या कथांवरील चित्रपट नुसते पाहतांच अमुक लेखकाने अमुक कथा लिहिली असें बिनचूक सांगता येअील. या तिघांपैकी आचार्य प्र. के. अत्रे यांनी केवळ विनोदप्रधान अशीं जीं व्यंगचित्रें चित्रपटांसाठी लिहिलीं आहेत त्यांचा उद्देश नुसता गंमत करण्याचा आहे. त्यांत समाजांतील रूढाचारांवर जरी त्यांनी कोरडे ओढले असले तरीहि ते विशिष्ट प्रमेयाच्या पार्श्वभूमीवर आधारलेले नाहीत. 'आहे तोपर्यंत चैन करून घ्या' याच सोप्या तत्त्वज्ञानावर ते आधारलेले आहेत. या लेखकाच्या पांच चित्रपटांपैकी चार यशस्वी झाले. त्या चारांपैकी धर्मवीर हा चित्रपटवाङ्मयीन दर्जांत आणि सार्वत्रिक आकर्षकतेच्या दृष्टीने प्रामुख्याने उल्लेखितां येअील. बाकीचे ब्रह्मचारी, ब्रँडीची बाटली, अर्धांगी हे तीन सार्वत्रिक मनोरंजनाच्या दृष्टीने लोकप्रिय आहेत व याच सर्वप्रिय विनोदाच्या पार्श्वभूमीवरच लेखकाच्या यशस्वितेचें रहस्य अवलंबून आहे. या कथा रंगभूमीवर आल्या असत्या तर रंगभूमीवरील विशिष्ट शब्दांच्या उच्चारक्षमतेमुळे आणि हिंदुस्थानच्या चित्रपटांत अशा प्रकारें संवादात्मक लेखकाला जी तांत्रिक मर्यादा असते ती रंगभूमीवर नसल्यामुळे याहिपेक्षा लोकप्रिय झाल्या असत्या. आचार्य अत्रे हे रंगभूमीवर विनोदी नाटकाप्रमाणचे ज्यांचा संसार आणि घराबाहेर यांसारखीं गंभीर नाटकें लिहिण्यांतहि यशस्वी झाले आहेत. चित्रपटक्षेत्रांत त्यांच्या कथा जरी केवळ विनोदप्रचुर असल्यामुळे यशस्वी झाल्या असल्या तरी त्यांनी गंभीर भूमिका पत्करून प्रमेयात्मक चित्रकथा निर्माण केल्या आणि

योग्य अशा दिग्दर्शकांकरवीं त्या कथांचें गांभीर्य पूर्णपणाने चित्रपटाच्या तंत्रद्वारें प्रयोजित करण्यांत आलें तर त्यांचें नांव त्या क्षेत्रांतहि गाजेल. अितकेंच नव्हे तर चित्रपटाच्या क्षेत्रांत वाङ्मय आणि विनोद ह्या दोन्ही दृष्टींनी त्यांचे चित्रपट सर्वत्रांना दिपवून टाकल्यावांचून राहणार नाहीत. चित्रपटक्षेत्राला जी अेक विशिष्ट मर्यादा आहे ती हिशेबांत धरून या क्षेत्रांत वाङ्मय-गूढांचें पूर्ण प्रकटीकरण जर कुणा लेखकाकडून होणें शक्य असेल तर याच लेखकाकडून असें आजवर त्यांचे जे पांच चित्रपट प्रसिद्ध झाले आहेत त्यांवरून निश्चित अनुमान काढण्यास हरकत नाही.

श्री. वि. स. खांडेकर यांच्या हिशेबीं देवता, सुखाचा शोध, छाया व ज्वाला हे चार चित्रपट आहेत. कांदबरीकार आणि विशेषतः लघुकथालेखक या नात्याने त्यांनी वाङ्मय-क्षेत्रांत लौकिक मिळविला असला तरी प्रस्तुत लेखकाच्या मतें ते कांदबरीकार किंवा लघुकथा-कारापेक्षा टीकाकाराच्या सदरांत जास्त अधिकाराने येअूं शकतात. समाजांतील वैगुण्य दूर करण्याच्या बाबतींत यांची अिच्छा जरी अनावर असली तरीहि तें त्यांचें क्षेत्र प्रमेयात्मक ठरत नाही. प्रमेयात्मक क्षेत्र जास्त विस्तृत असतें आणि त्याचें स्वरूप आणि व्यापकता राष्ट्रीय असते. समाजापुढील तत्कालीन सुधारणांपेक्षा असल्या प्रमेयांचें क्षेत्र फार व्यापक असल्यामुळे अशा प्रकारचे विषय क्वचितच हाताळले जातात. शिवाय असे व्यापक विषय आमच्या दिग्दर्शकांना चांगलेसे कळत नाहीत, आणि जर कधी असले विषय त्यांनी हातीं घेतलेच तर अपुऱ्या बुद्धी-मुळेच ते त्यांना हाताळतां येत नाहीत.

समाजांतील वैषम्य अुघडकीस आणण्याचा प्रयत्न करतांना चित्रपटाला अवश्य असणाऱ्या अशा नाट्याची या लेखकाच्या करवीं हानि झाली आहे आणि तसें होअूनहि वाङ्मयदृष्ट्या देखील फारसा लाभ झालेला नाही. केवळ कादंबरीकार आणि लघुकथाकार या नात्याने आधीच संपादिलेल्या लोकप्रियतेच्या आधारावरच या लेखकाचे चित्रपट पाहिले जातात. अनुरंजनाच्या दृष्टीने यांच्या ह्या चार चित्रपटांपैकी देवता व सुखाचा शोध हे दोनच यशस्वी झाले आहेत आणि बाकीचे दोन पडले आहेत. ज्या चित्रपटनिर्मात्यांनी या लेखकाच्या कथांचें चित्रपटीकरण करण्याचा जवळ जवळ मक्ता घेतला होता त्या संस्थेला दुसऱ्या लेखकाच्या विनोदप्रधान कथांचा जर आधार मिळाला नसता तर चित्रपटांच्या द्वारें सामाजिक प्रचार करण्याचा केलेला या लेखकाचा प्रयत्न आर्थिकदृष्ट्या त्या संस्थेला मोठा धोक्याचा झाला असता चित्रपटक्षेत्रांतील अितर लेखकांशीं तुलना करतां पटकथालेखक या नात्याने या लेखकाची ठरलेली अयशस्विता पाहून अंतःकरणपूर्वक दुःख झाल्यावांचून राहत नाही. या लेखकाने कथेची मूलगामी रूपरेषा आखून तिचें चित्रपटकथाकरण करण्याचें कार्य जर दुसऱ्या कोणा पटकथालेखकाकडे सोंपविलें तर या कादंबरी लघुकथालेखकाकडून अजूनहि चित्रपट-क्षेत्रांत आश्चर्यकारक निर्मिति घडविली जाअील अशी अपेक्षा आहे. पण स्वतःच्या कार्यक्षमतेच्या मर्यादा कितपत आहेत याची जाणीव आम्हा हिंदी लोकांत, विशेषतः महाराष्ट्रीयांत, नसते, आणि म्हणूनच चित्रपटाची कला आणि वाङ्मय यांना जें वैभव प्राप्त झालें पाहिजे होतें तें होअूं शकत नाही.

या तीन्हींतील शेवटचे लेखक श्री. मालजी पेंढारकर यांना रंगभूमीवरील वाङ्मयाचा जेव-ढ्याउ तेवढा परिचय आहे. पण तो जरी विशेष नसला तरी तेवढ्याच जोरावर त्यांनी चित्रपटांतील नाट्याचें क्षेत्र अचुक ओळखून तेवढाच अनुभव रावबून घेतला आहे. या लेखकाच्या लेखणी

तून अुतरलेल्या राजा गोपीचंद, नेताजी पालकर, स्वराज्यसीमेवर, कान्होपात्रा, गोरखनाथ या पांच कथांपैकी राजा गोपीचंद व नेताजी पालकर या दोन जरी यशस्वी झाल्या आहेत तरी गंभीर आणि विनोदी अशा दोन्ही प्रसंगांची यांच्या लेखनांतील पूर्वी लोकप्रिय झालेली गल्लत आता कायम ठशाची होअून बसली आहे. विशिष्ट प्रकारच्या परिस्थितींत हे जरी चांगले चित्रपट निर्माण करूं शकतात तरीहि त्यांचें वाङ्मयीन ज्ञान तुटपुंजें असल्यामुळे वाङ्मयदृष्ट्या दर्जा मिळेल असें लिखाण ह्यांच्या हातून यापुढे निर्माण होण्याचा संभव नाही. चित्रपटक्षेत्रांतील वाङ्मयापासून कलात्मक आणि तांत्रिक विभागापर्यंत सर्व विभागांत आपलाच हात असण्याचा जो हट्ट हे लेखक दाखवितात तो त्यांचा मोठा दोष आहे. अशामुळे अेखाद्या बाबतींत यश आलें असेल पण हा असला आधाशीपणा सर्व काल यशस्वी होअूं शकत नाही. प्रत्येक क्षेत्रांतील जबाबदारी विभागून देण्याची वृत्ति जर यांनी आपल्या ठायीं निर्माण केली तर लेखक व चित्रपटनिर्माता या जोडनात्याने ते यशस्वी होअूं शकतील. कारण चित्रपटाचें वैशिष्ट्य कोठे आहे हें जाणण्याची दृष्टि त्यांच्या ठायीं आहे. म्हणून अशा रीतीने योग्य विभागणी करून समवायात्मक कार्य ते करूं लागतील तर चित्रपट आणि वाङ्मय या दोन्ही क्षेत्रांत नांव घेण्याजोगी निर्मिति यांच्या हातून बाहेर पडेल अशी आशा बाळगण्यास जागा आहे.

गेल्या चार वर्षांतील चित्रपटांच्या ह्या धावत्या मोजदादीवरून असें दिसून येईल की, ह्या अेकावन चित्रपटांपैकी छत्तिसांची वाङ्मयीन जबाबदारी साहित्यक्षेत्रांत कोणतें तरी स्थान असलेल्या अशा माणसाकडे जरी देण्यांत आली होती, तरी त्यांतील फक्त सतराच चित्रपट यशस्वी झाले आहेत. आणि या सतरांपैकी धर्मवीर हा अेक चित्रपट सोडून दिला तर बाकीच्यांपैकी कोणताहि चित्रपट मराठी वाङ्मयाला भूषणभूत झाला असल्याचें दिसून येणार नाही. अुलटपक्षीं प्रथितयश अशा लेखकांनी लिहिलेले, पण अयशस्वी ठरलेले, असे अेकोणीस चित्रपट ज्या नालायक निर्मात्यांच्या हातीं गेले त्यांच्याच हातीं हे यशस्वी झालेले सतरा चित्रपट गेले असते, तर तेहि नालायक ठरले असते. वाङ्मयांतील महत्त्व हें चित्रपटाच्या यशस्वितेला अनुकूल असतें; पण तें सर्वस्वीं आवश्यक आहे असें ह्या सतरा यशस्वी चित्रपटांच्या अितिहासावरून सिद्ध होत नाही. कारण, ह्यांतील कुंकू, धर्मात्मा, तुकाराम, ज्ञानेश्वर, गोपालकृष्ण, राजा गोपीचंद आणि संत तुळशीदास हे सात चित्रपट जे यशस्वी झाले, ते त्यांतील गायक किंवा गायिका त्यांचें कौशल्य किंवा त्यांतील नट आणि नटी ह्यांची लोकप्रियता अथवा त्यांतील तंत्रविशारदांचें अद्‌भुत कौशल्य यांमुळेच आकर्षक झाले होते. त्या गायनांतील, कथेंतील किंवा संवादांतील वाङ्मयांतील महत्त्वामुळे नव्हे.

चित्रपटाचें वाङ्मयाशीं असलेलें नातें असें वैशिष्ट्यपूर्ण असल्यामुळे आणि त्यांचे परिणामहि असेच अनिश्चित असल्यामुळे या नात्याची सर्वांगीण व्याख्या ठरविण्याचा प्रयत्न शक्य असल्यास पुढील लेखांत करण्याचें योजिलें आहे.

# साहित्यसंस्थांतील सहकार्य व संघटन

(ले. : प्रो. रा. वि. ओतुरकर, एम्. ए.)

अेक काळ असा होता की कोणी नवी सार्वजनिक संस्था काढली की तिचें कोडकौतुक होअी. अजूनहि महाराष्ट्रांत सार्वजनिक संस्था फार झाल्या आहेत, असें लेखकाचें म्हणणें नाही; पण सार्वजनिक संस्थांची सुव्यवस्था ही समाजांतील सार्वजनिक कार्यकर्त्यांची संख्या, त्यांसाठी देणग्या देणारांची संख्या यावर अवलंबून राहील. यापेक्षा सार्वजनिक संस्था जास्त झाल्यास त्या अिष्टांका (Optimum number) पेक्षा वाढल्यामुळे, ज्यांच्या अंगांत सार्वजनिक वृत्तीचें शैथिल्य आहे किंवा ती जबाबदारी घेण्याचें शिक्षण नाही, असे लोक त्यांत शिरतील व संस्थांचें काम नासूं लागेल. हा मुद्दा श्री. सत्यमूर्ति यांनी गतवर्षी अखिलभारतीय स्थानिक स्वराज्यपरिषदेचे अध्यक्ष या नात्याने मांडला होता. ते म्हणाले, 'देशांतील स्थानिक स्वराज्यसंस्थांची संख्या तें काम सार्वजनिक वृत्तीने अुचलण्यास पात्र असलेल्या लोकांच्या संख्येवर अवलंबून ठेवणें अिष्ट आहे. त्यापेक्षा अधिक झपाट्याने स्थानिक स्व. संस्थांच्या संख्येंत वाढ झाल्यास त्यांत अुचल्यांची बजबजपुरी व भांडाण्यांची अडगळ वाढते.' या दृष्टीने सरकारने तालुका लोकल बोर्डे बंद केलीं याचें त्यांनी समर्थन केलें होतें.

आता अितकें मात्र खरें की, सार्वजनिक वृत्ति ही कांही बाहेरून अुत्पन्न होणारा पदार्थ नव्हे. सार्वजनिक कार्य केल्यानेच सार्वजनिक वृत्तीचें संवर्धन होतें. पण त्या वृत्तीवर समाजांतील अितर घडामोडींचीहि प्रतिक्रिया होत असते. पन्नास वर्षांपूर्वी सार्वजनिक कार्य हा हौसेचा नवा खेळ होता. समाजांतील ज्या मध्यम व अुच्चमध्यम वर्गांत तो अुत्पन्न झाला त्याला आर्थिक ताण तीव्र स्वरूपाचा भासत नव्हता. आज तशी स्थिति राहिली नाही. आज सार्वजनिक जागृति वाढली असली तरी सार्वजनिक पैशाचा व वेळेचा काटकसरीने खर्च करून तीं अधिकाधिक अुपयोगांत कशीं आणतां येतील, हें काळजीपूर्वक पाहण्याची वेळ आली आहे.

अुदाहरणार्थ, आज पुण्यांत साहित्यपरिषद्, मराठी ग्रंथसंग्रहालय, नगरवाचनमंदिर, डेक्कन् व्हर्नाक्युलर् ट्रान्स्लेशन् सोसायटी, वक्तृत्वसभा, वसंत व्याख्यान माला, शारदोपासक मंडळ व अभिनव शारदोपासक मंडळ या संस्थांचें कार्य साहित्यविषयक असल्याने अेकमेकांशीं संलग्न असें आहे. यांच्या अेकमेकांच्या सहकार्याने कांही अधिक परिणामकारक कार्य करतां येअील कीं नाही हें अजमावून पाहण्यासारखें आहे. या बहुतेक संस्थांस श्री. तात्यासाहेब केळकर, प्रो. द. वा. पोतदार अशी अनुभवी मंडळी हवी असते. प्रत्येक संस्थेचा हौशी चिटणीस या मंडळीस भीड घालतो. 'सार्वजनिक कार्य चालतें करावें, नाही म्हणूं नये' या सद्बुद्धीने तेहि त्यास संमति देतात. मग प्रत्येकजण या सल्लागार मंडळींच्या पाठबळावर आपला सवतासुभा खुटुखुटु चालवीत असतो. सालोसाल वार्षिक समारंभ होतात. अहवाल प्रसिद्ध होतात. चालू गाडा आहे तसाच पुढे 'रेटणें' अेवढेंच कार्य होतें. पिढी दर पिढीच्या वाढत्या गरजा ओळखून कार्याचा व्याप वाढविणें व्हावें तसें होत नाही. याचें कारण या सर्वांचा साकल्याने

विचार करण्याची जबाबदरी कोणावरच नाही. आर्थिक क्षेत्राप्रमाणे या क्षेत्रांतहि संकल्पित नियोजनाची (Planned economy) जरूर आहे असें लेखकास सुचवावयाचें आहे. यासाठी कांही व्यावहारिक सूचना सुचतात त्या सांगतों.

सूचना १ ली— डेक्कन् व्हर्नाक्युलर ट्रा. सोसायटीची कचेरी साहित्यपरिषदेच्या अिमारतींत मावूं शकेल. त्या संस्थेचें व साहित्य-परिषदेचें काम अेका कारकुनास करतां येअील. परिषदेच्या त्रैमासिकांत संस्थेचा अहवाल त्रोटकपणाने छापतां येअील. परिषदेच्या चालकांस ग्रंथपरीक्षणासाठी निर्भीड परीक्षक नेमण्याचें काम करतां येअील. तें परीक्षण परिषदेच्या त्रैमासिकांत छापतां येअील. ( अर्थात् कधी कधी परीक्षकांचे खाजगी शेरे (Confidential Reports) छापतां येणार नाहीत हा भाग वेगळा. ) त्या वर्षांतील पहिलें बक्षिस मिळालेल्या ग्रंथकाराचा सन्मान करतां येअील. बेजबाबदार विधानें समाविष्ट करून ग्रंथ लिहिणारास जाब विचारतां येअील.

सूचना २ री— सरकारच्या क्रमिक पुस्तकमंडळा (Text Book Committee) कडे दरसाल शेकडो पुस्तकें येतात. कलेक्टरकडेहि प्रत्येक प्रकाशनाच्या दोन तीन प्रती पाठवाव्या लागतात. त्यांतील मराठी पुस्तकें काम झाल्यावर परिषदेस किंवा मराठी ग्रंथसंग्रहालयास दिल्यास ते त्यांचा संग्रह करतील. या बाबतींत अेज्युकेशनल् अिन्स्पेक्टरकडे व सरकाराकडे या संस्थांनी अेकमेकांच्या विचाराने पत्रव्यवहार करण्यासारखा आहे.

सूचना ३ री— या सूचनेचा पुरस्कार माझे मित्र श्री. दि. वि. काळे यांनी केला पण ती येथे पुनः थोडक्यांत मांडतों. आज पुण्यांत अनेक संस्थांचीं व स्वतंत्र अशीं ग्रंथसंग्रहालयें आहेत. त्यांतील ग्रंथांची विषयवार सूची करून तिच्या हस्तलिखित प्रती प्रत्येक संग्रहालयांत ठेवावयास हव्या, व अभ्यासकास, तो अेका संग्रहालयाचा सभासद असल्यास, त्या हवाल्यावर अभ्यासासाठी वाटेल तेथील पुस्तक घेऊन येतां यावें. या सहकार्याने आणखी अेक फायदा होअील. कांही महत्त्वाचीं दुर्मिळ पुस्तकें खरीदी करतां येतील; कांही लोकप्रिय व महत्त्वाच्या ग्रंथांच्या स्वतंत्र प्रती प्रत्येक ग्रंथालयास लागतीलच पण कांही विषयांवरील पुस्तकें अेका ग्रंथालयाने विशेष संग्रहावींत तर दुसऱ्या विषयांचीं दुसऱ्याने संग्रहावींत अशी काटकसर साधूं शकेल.

सूचना ४ थी— वक्तृत्वसभेसहि अेक स्वतंत्र कारकून वगैरे आहे. त्यांचें कामहि अितर संस्थांतील पगारी कारकुनाकडून होण्यासारखें असल्यास तें करवून घेण्याची योजना करावी.

सूचना ५ वी— सर्व साहित्यिक सार्वजनिक संस्थांनी मिळून अेखादा धंदेवाअीक हिशेबतपासनीस नेमावा व त्याजकडून हिशेब तपासून घेत जावेत. सभासदांतील कोणीतरी हिशेब न जाणणारे व भिडेने हिशेबतपासनीसाची जागा पतकरलेले लोक नकोत. हें म्हणण्याचा हेतु कुणावर गैरव्यवस्थेचा आरोप करावा असा नाही; पण काम होत आहे यापेक्षा चांगलें झालें पाहिजे.

यापुढील कांही सूचना साहित्य-परिषदेच्या व्यापासंबंधी करतों.

सूचना ६ वी— साहित्यपरिषदेचे आज अुणेपुरे हजार सभासद महाराष्ट्रांत व बृहन्महाराष्ट्रांत आहेत. यांतील जिल्ह्यांजिल्ह्यांत असलेल्या सभासदांची जिल्हाशाखा स्थापन होणें जरूर आहे. याचे किती तरी अुपयोग होतील. जिल्हाशाखेचें काम तेथील लोकांस नजरेसमोर दिसल्याने परिषदेस अधिक सभासद मिळतील. तसेंच त्या त्या गांवची कांही चौकशी

करणें झाल्यास ती परिषदेचा शाखासभेकडे जबाबदारीने करतां येईल. उदाहरणार्थ, बडोद्यास मराठीचे कांही वर्ग कमी झाल्याची ओरड कांही दिवसांपूर्वी प्रसिद्ध झाली होती. याचा निषेध करण्यापूर्वी त्यांत तथ्य काय आहे तें पाहिलें पाहिजे. अशा वेळीं शाखासभेकडून ही माहिती मागवितां येईल. तसेंच अेखाद्या गोष्टीचा निषेध किंवा अभिनंदन किंवा मागणी किंवा विनंती करावयाची झाल्यास, शाखानिहाय त्या ठरावाचा अुचार झाल्यास त्या विचारास अधिक चालना व पाठिंबा मिळेल व चळवळीस यश येईल. कधीं कधीं जिल्ह्यास आपलें विशेष मत बोलावेंसें वाटल्यास तसेंहि करतां येईल. केंद्रस्थानच्या बहुमतांत जिल्ह्याचें वैयक्तिक मत बुडून जाणार नाही. जिल्हानिहाय बदलणाऱ्या मराठी बोलीभाषेचा अभ्यास करतां येईल.

सूचना ७ वी— प्रसिद्ध होणाऱ्या मराठी ग्रंथांस बक्षिसें देणाऱ्या अनेक संस्था आहेत. कांही प्रकाशनास अुत्तेजन देणाऱ्या संस्था आहेत, कोणी औद्योगिक विषयांवरील ग्रंथांस अुत्तेजन देतां तर कोणाकडून संस्कृत विद्येवरील ग्रंथांस अुत्तेजन मिळतें, कोणी संशोधनास अुत्तेजन देतो, अशा संस्थांची नोंद विशेष माहितीसह परिषदेच्या कचेरींत असावी.

सूचना ८ वी— निरनिराळ्या कॉलेजांत व युनिव्हर्सिट्यांत काम करणाऱ्या मराठीच्या प्राध्यापकांची नांवनिशीवार नोंद परिषदेच्या कचेरींत हवी. तसेंच कोणकोणत्या युनिव्हर्सिटींत मराठी कोणकोणत्या वर्षास घेतां येतें, मराठीच्या अभ्यासमंडळावर (Board of Studies) कोण कोण लोक आहेत, दरसाल परीक्षेस कोणते ग्रंथ लागतात, अेम्.अे.च्या परीक्षेस व त्याहून अुच्च परीक्षांस कोणते निबंध लिहून झाले, यांची माहिती संग्रहित करणें जरूर आहे.

सूचना ९ वी— दरसाल अेका अेम्.अे.च्या लायक विद्यार्थ्यांस परिषदेने राहण्यास जागा व २० रु. द. म. पर्यंत शिष्यवृत्ति (फेलोशिप) द्यावी. कॉलेजांतून फेलोशिप अेक वर्षाची असते. अेम्.अे.चा अभ्यास दोन वर्षांचा असतो. अशा वेळीं अेम्.अे.चा अभ्यास करणाऱ्या अेका तरी विद्यार्थ्यांची दुसऱ्या वर्षास सोय करतां येईल. या विद्यार्थ्याकडून कचेरीचें कांही मामुली काम, त्रैमासिकाच्या संपादकास मुद्रितें वाचण्यास मदत करण्याचें काम देतां येण्यासारखें आहे. व हें त्याला परीक्षेचा अभ्यास संभाळून करतां येईल.

अशाच आणखीहि कित्येक सूचना करतां येतील. वरील सर्वच सूचना पूर्णपणें व्यावहारिक असतील असें नाही. माझ्या लक्षांत आल्या नसतील अशा कांही अडचणी असतीलच. साहित्यिक संस्थांतून सहकार्य व्हावें, करतां येईल ती काटकसर करावी, अभ्यासकांची सोय व्हावी, वार्षिक वर्गणी नेमाने देणारास त्या वर्गणीचा जास्तींत जास्त फायदा देतां यावा, स्वतंत्र अहवालछपाअी, कचेरी, दिवाबत्ती, सादिलवार खर्च वांचवितां यावे, सार्वजनिक काम करणारांचा कमींत कमी वेळ जावा— निदान या दृष्टीने या संस्थांच्या चालकांना अेकत्र बोलावून विचारविनिमय करतां यावा— अेवढें झालें तरी या लेखाचा अुद्देश साध्य झाला, असें मी म्हणेन व कोणीहि म्हणेल. आज कित्येक ठिकाणीं सार्वजनिक संस्था म्हणजे अेक अिमारत किंवा भाड्याची खोली. रोजचें थोडेंबहुत मामुली काम झाल्यावर अितर वेळांत माशा मारीत बसणारा किंवा झोपणारा कारकून, अधून मधून येअून संस्थेच्या जागेंत मित्रांशीं सभासदांशीं वायफळ गप्पा छाटणारा सेक्रेटरी, सेक्रेटरीच्या विश्वासावर झोपीं जाणारें कार्यकारी मंडळ व या सर्वांवर पांघरूण घालण्यासाठी दरसाल अेक गोड अहवाल व लखलखाटाचा समारंभ अशी जी स्थिति दिसते ती बंद झाली पाहिजे.

---

# रद्दींतील रत्नें

## मराठी ग्रंथोत्तेजक मंडळी

[ महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या अितिहासास ज्या संस्थेपासून प्रारंभ झाला त्या वरील संस्थेविषयी माहिती पुढील पत्रकांतून सांपडेल.]

### विनंतीपत्रक

या देशांत अुपयोगी ग्रंथ फार थोडे आहेत व वाचणारेही फार थोडे आहेत याजमुळें विद्येचा लाभ फार थोडे मनुष्यांस होतो. विलायतेंत त्राक्ट व बुक सोसायटी या नांवच्या मंडळ्या बहुत असून त्या ग्रंथकारांस अुत्तेजन देअून ग्रंथ प्रसिद्ध करून स्वल्पदरानें विकतात. यामुळें फार परोपकार होतो व लोकांचें ज्ञान वाढतें. यास्तव या देशांत ग्रंथकारांस अुत्तेजन यावें व स्वस्त दरानें ग्रंथ प्रसिद्ध व्हावेत हा हेतु आहे. यास्तव अशी योजना केली आहे कीं, दर साल पांच रुपयांचे ग्रंथ घेण्याची अिच्छा असेल त्यांणीं यादीवर सही करावी. आम्ही जे ग्रंथ त्यांजकडे पाठवूं, ते नापसंत झाल्यास आम्ही परत घेअूं किंवा पूर्वी लिहून त्यांस विचारूं आणि पसंत होतील ते पाठवूं परंतु दर साल पांच रुपयांपर्यंत मराठी ग्रंथ आम्ही घेण्यास कबूल आहों अशा सह्या हजारपर्यंत मिळाल्यास ग्रंथकाराकडून चांगले ग्रंथ करण्याची योजना आम्ही करूं. या मंडळीचें नांव 'मराठी ग्रंथ अुत्तेजक मंडळी' असें ठेवूं. हजार सह्या मिळाल्यावर या मंडळीचें मुख्य आफिस मुंबअी किंवा पुणें येथें ठेवण्याची व ग्रंथकार व परीक्षक कमिटी व अितर कामदार यांची योजना करण्याची तजवीज होअील.

वर सांगितलेला हेतु पसंत पडून त्याप्रमाणें दर साल पांच रुपयांचे ग्रंथ घेण्यास जे कबूल असतील त्यांनीं आपलें नांव व पत्ता सुवाच्य अक्षरांनीं लिहून किरण छापखान्याचे मालक, अगर रा. रा. रावजी प्रभाकर भावे, ट्रान्सलेटर, फर्स्ट क्लास सबजज्, कोर्ट पुणें, यांजकडे पाठवावें.

गोपाळराव हरी देशमुख
माधवराव गोविंद रानडे

ज्या गृहस्थांनीं अुदार होअून आपल्या सह्या पत्त्यासह पाठविल्या आहेत त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें :— (५२ नांवें छापिलीं आहेत.) (किरण ता. २७, जानेवारी १८७८)

### जाहिरात

ता. ४ फेब्रुवारी १८७८चे अिंदुप्रकाशाच्या पुरवणींत कोण्या 'साशंका'ची शंका प्रसिद्ध झाली आहे. अशा शंका अन्य लोकांसही असतील, म्हणून खालीं सह्या करणारा यांजकडून "ग्रंथोत्तेजक मंडळी" स्थापविण्याविषयींचा खुलासा करण्यांत येत आहे :—

१. 'मंडळी'च्या पुरस्कर्त्यांनीं मुळींच प्रसिद्ध केलें आहे कीं, वर्गणीदारांस जीं पुस्तकें मान्य होतील तींच त्यांनीं घ्यावीं. तेव्हां पुस्तकें कशीं असतील याचा विचार करण्याची फारशी जरूरी नाहीं.

२. अुपयुक्त विषयांवर आणि सज्ञानवृद्ध्यर्थ अशींच पुस्तकें प्रसिद्ध होतील, व त्यांतही विशेषेंकरून प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांचें धोरण पुढील विषयांवर राहील :—

१ अितिहास. २ शास्त्रें. ३ सृष्टींतील पदार्थ व नियम वर्णन. ४ या देशांत सुधारणा होणाऱ्या गोष्टी व त्यांविषयीं सूचना. ५ सन्मार्गवर्त्तींचीं चरित्रें. ६ धर्मासंबंधीं माहिती. ७ अुपयुक्त कथा. ८ संस्कृत ग्रंथांतील अुपयुक्त विषय.

३. 'मंडळी'स पांचशें सह्या मिळाल्या म्हणजे योजिलेल्या कामास सुरवात होअील.

४. पुष्कळ लोकांजवळ चांगले चांगले ग्रंथ तयार झालेले असून ते केवळ छापण्याच्या खर्चाचे अडचणीमुळेंच अप्रसिद्ध राहिले आहेत असें अैकण्यांत येतें. त्यांस असे ग्रंथ ज्या गृहस्थांनीं लिहिले असतील किंवा त्यांजपाशीं लिहून तयार असतील त्यांनीं ते आमच्याकडे पाठवून द्यावे. आणि ज्यांची असे ग्रंथ तयार करण्याची अिच्छा असेल त्यांनींही आम्हांस कळवावें. मग त्या ग्रंथांची योग्यता पाहून ते छापण्याचा विचार केला जाअील.

५. असे ग्रंथ पाठवून दिल्यास ते बरे वाअीट ठरविण्याकरितां अेक कमिटी नेमण्यांत येअील ती :— १ वे. शा. सं. कृष्णशास्त्री चिपळूणकर, २ श्रीकृष्णशास्त्री तळेकर, ३ रावजीशास्त्री गोडबोले आणि खालीं सह्या करणारे दोघे असे पांचजण मिळून छापण्यास योग्यायोग्य ग्रंथांची निवड करतील.

६. ज्यांचे ग्रंथ पसंत होणार नाहींत त्यांचे त्यांस परत जातील व होअील तितकीं त्यांचीं नांवें परिस्फुट होणार नाहींत.

७. चवथ्या कलमांत लिहिल्याप्रमाणें जीं पत्रें आम्हांकडे येतील त्यांवरून व त्यांशिवाय आमच्या स्वतंत्र माहितीवरून कोणते ग्रंथांची अुणीव व जरूर आहे, तसेंच जे ग्रंथ मागवावयाचे त अेकाच ग्रंथकारास सांगून मागवावे किंवा जास्त लोकांकडून तयार करावे वगैरे सर्व विचार करण्याकरितां येत्या मे महिन्यांत मराठी ग्रंथकारांचें, मासिक पुस्तककार व वर्तमानपत्रकर्ते यांचें अेक कान्फरन्स (सभा) पुणें येथें भरविण्याचा बेत आहे त्या वेळीं सर्व विचार ठरविण्यांत येतील.

८. सदरील कान्फरन्सांत ज्यांणीं मराठी भाषेंत लहान् मोठे ग्रंथ किंवा मासिक पुस्तकें अथवा वर्तमानपत्रें चालविलीं आहेत त्यांस बोलाविलें जाअील व त्या सर्वांचे विचारें "ग्रंथोत्तेजक मंडळी"ची स्थापना व सदरील पांचवे कलमांतील लिहिलेली कमिटी नेमण्यांत येईल. त्याचप्रमाणें "ग्रंथोत्तेजक मंडळी"चें मुख्य आफिस कोठें ठेवावयाचें याचाहि विचार तेव्हांच करण्यांत येईल. ता. १५ फेब्रुवारी १८७८.

गोपाळराव हरी देशमुख
माधवराव गोविंद रानडे

*** ही जाहिरात सर्व वर्तमानपत्रकर्ते व मासिक पुस्तककर्ते यांणीं आपापल्या पत्रीं निदान तीन वेळ तरी लोकहितार्थ प्रसिद्ध करावी अशी सूचना आहे.

—किरण, ३ मार्च १८७८

## पुण्यांतील जुनें विलासी जीवन

रा. रा. किरण पत्रकर्ते यांस :—

कां पत्रकर्ते रावजी ! कशी काय हालहवाल म्हणून आपण मला पृच्छा करितां, परंतु हें आपणांस विदित नसणें म्हणजे केवळ आश्चर्यच. आश्चर्य तरी कशाचें ! राजास सर्वच दुनिया आबाद, तद्वतच आपली स्थिति समजावयाची. नित्य पहाटेस मुखमार्जनोत्तर चहादाणी, बशी, ग्लास पुढें येतांच चहाचें प्राशन. वक्तशीर शाल्योदन सुग्रासभोजन. विलायती उंची मखमलीचें शुभ्र धोतर पायघोळ नेसून, अंगांत वंड्या जाकेटांवरून उंची बनातीचा पोकळ कोट अडकवून त्यावरून गळ्यास लपेटून दोन्ही खांद्यांवरून दोरस्याचें स्वच्छ उपरणें लोंबतें सोडून गळ्यांत कोटावरून मालाकार अडकविलेल्या सोनेरी झांकदार मुलामाच्या लोंबत्या साखळीस अग्रभागीं लटकविलेलें चांदीचें चुनाळी घड्याळ कोटाचे अडव्या कप्यांत अर्धवट बसवून, डोक्यास मलमलीचा झोंकदार फेटा लपेटून किंवा पैठणी लप्फेदार रेलींव बांधलेलें पागोटें घालून पायांत शुभ्र पायमोज्यावरून खरी सांबरी बूट चढवून, अथवा पुणेंशाई चटकदार अर्ध्या टाचां-वरून बसेलसा जोडा घालून; उजव्या हातांत वेलाची वांकडी कांठी किंवा १६ काड्यांची अलपाकी घेरदार छत्री धरून; डाव्या हातांत लव्हयांडर सिंचन करून गोळा करून घेतलेला छोटेखानी सफेत रुमाल धारण करून; विडे तंबाखूनीं युक्त अशी चांदीची डबी कोटाचे कप्यांत घालून; विडा तंबाखू खाऊन; संध्याकाळचे पांच वाजण्याचे सुमारास घराबाहेर पडून बुधवारांतील प्रसिद्ध रस्त्यांवरील स्टेशनरी वगैरे विलायती हरजिन्नस विक्रीच्या, अथवा गांधी किंवा फुल-माळी यांच्या दुकानांपुढील हवाशीर बसावयास टाकलेल्या खुर्च्या बाकांवर मिजासीनें बसलेल्या आपल्यासारख्या मंडळींत बसून तंबाखूच्या पिचकाऱ्या उडवीत हास्यविनोद, त्याचप्रमाणें रस्त्या-वरून भल्याबुऱ्या जाणारे लोकांच्या टवाळया, गटारबातम्या, यांची रेलचेल उडवून जरा रात्र होतांच घरीं परतून तत्क्षणीं भोजन उरकून पुन्हा पडलां घराबाहेर, कीं धरला शुक्रवारचा रस्ता. मग प्रीतीच्या विलासमंदिरीं घुसून गाणेंबजावणें यांत तब्यत खुष झाल्यानंतर ऐती तयार होऊन लांबच्या पल्ल्यावरून बाटल्यांतून भरून आलेलीं सरबतें वगैरे पान करून ऐषआरामांत धुंद होत्साता नित्य ब्रह्मानंद पावतां. अशा आपल्या एकंदर श्रीमंत स्थिती-वरून सर्वत्र आपले देशबांधव आपल्याप्रमाणेंच सुखानंदांत कालक्रमणा करीत असतील, असा आपला समज असेल. परंतु नाहीं हो नाहीं ! ! गलबत समुद्रांतून चालत असतां किनाऱ्या-वरील झाडें वगैरे फिरतात जसा भास होतो तसा हा पोकळ आभास आहे. याजकरितां डोळ्यांवरची धुंदी सोडून जागे व्हा, व आपल्या कर्तव्यकर्मास लागा. ... "

—किरण, १६ सप्टेंबर १८७१.

# रेफाचें लेखनांतील स्थान

[ लेखक : श्री. गो. कृ. मोडक ]

**१ रेफ म्हणजे काय ?**— पर्ण या शब्दांत र् अैकूं येतो. याचें लेखन नेहमीच्या र–हून भिन्न आहे; व तो रेघेच्या खाली नसून वर ' असा रेफरूपाने लिहिलेला आहे. शिवाय हा र् जोडव्यंजनांत असून त्याचा पहिला घटक आहे. यावरून अुघड होतें की र् जोडव्यंजनांत पहिला घटक असल्यास तो रेफाने दर्शविण्यांत येतो. **सारांश**—– रेफ हा र–चा विशिष्ट प्रकार आहे. मराठींत अशा स्थितींतच र–ला रेफ म्हणतात. संस्कृतांत रेफ म्हणजे कोणत्याहि स्थितींतील र्. र् आणि रेफ हे दोन्ही शब्द संस्कृतांत सर्वथा तुल्यार्थक आहेत. मराठींत वर सांगितल्याप्रमाणे त्यांच्या अर्थांत भेद आहे. 'भिन्न स्थिति दर्शविण्यास भिन्न शब्द असणें ' हें केव्हाहि अुपयुक्त. म्हणून मराठींतील व्यवस्था अधिक सोअीची आहे; आणि तदनुसारच या लेखांत रेफ हा शब्द योजिला आहे. ज्या व्यंजनांचें जोडव्यंजन बनतें त्यांत पहिलें व्यंजन र् असेल तर त्या र्–ला रेफ म्हटलें जातें, व त्याचें लेखन रेघेच्या वर करण्यांत येतें. अर्थात् येथे रेफ या शब्दाने ( १ ) जोडव्यंजनांत पहिलें आणि ( २ ) रेघेच्या वर राहणें या दोन गोष्टी रेफासंबंधी विशेषेंकरून लक्षांत ठेवाव्या.

**२ रेफ कोठे लिहावा ?**—– रेफ रेघेच्यावर असतो व तो जोडाक्षरांतच असतो हें वर सांगितलें. येथे प्रश्न असा की रेफ वर लिहावयाचा तो कोणत्या अक्षरावर ? रेफ जोडाक्षरांत प्रथम येत असल्याने हें स्पष्ट होतें की तो पूर्वस्वरानंतर लागोपाठ येतो. आणि परस्वरापासून जोडव्यंजनांतील घटकांनी तो अन्तरित असतो. म्हणजेच **पूर्वस्वर + रेफ + व्यंजन ( अेक अथवा अधिक ) + परस्वर** असा क्रम ठरतो. यावरून स्पष्ट दिसतें की रेफ पूर्वस्वरास अत्यंत जवळ असतो. अर्थात् तो पूर्वस्वराच्याच डोक्यावर लिहिणें योग्य. तो परस्वराच्या डोक्यावर लिहिण्यांत मधील ( अन्त्येतर ) व्यंजनांना अन्याय होतो. रेफापेक्षा हींच व्यंजनें परस्वरास जवळ असतां तीं दूर राहून रेफ मात्र त्या स्वराच्या डोक्यावर म्हणजे अत्यंत जवळ येतो. सर्प, मर्त्य, धार्ष्ट्य, कार्त्स्न्य या शब्दांत रेफ आणि परस्वर यांमध्ये क्रमाने अेक, दोन, तीन, चार अशीं व्यंजनें आलीं आहेत. यांपैकी परस्वर ज्यांत मिळतो अशा अेकाच व्यंजनास त्या स्वराच्या सान्निध्याचा लाभ घडतो; व तें होणें योग्यहि आहे; व यामुळे या व्यंजनास अन्याय होत नाही हेंहि खरें; तरी पण अितर व्यंजनें स्वरास रेफाहून जवळचीं असतां त्यांच्या सान्निध्यास मुकतात हें कायमच राहतें. हें टाळण्यास मी असें सुचवितों की रेफ ज्या स्वरास निकटतम त्याच्याच डोक्यावर तो लिहावा. म्हणजे त्याच्यापुढील व्यंजनास वरील अन्याय होणार नाही. हा झाला न्यायदृष्ट्या विचार. या व्यवस्थेंत आणखी कांही गुण आहे काय ?

**३ रेफ आणि परस्वर यांचें लेखन**—– कार्त्स्न्येन या शब्दांत रेफ परस्वरावर दिला आहे; व तो अे–च्या मात्रेनंतर. हें हेंगाडें दिसतें. रेफाचा अुच्चार जर स्वरापूर्वी करणें, तर तो

अनुक्रमणिका

रेफ-स्वरचिन्हानंतर कां द्यावा ! रेफ आणि परस्वर अे यांच्यामध्ये अुच्चारांत त् स् न् य् अितकीं व्यंजनें आहेत. तरीपण त्यांना ओलांडून रेफ अे-शीं भिडतो; आणि त्यांतहि विशेष असें की तो अे-च्या पूर्वी रहात नसून पुढे राहतो. अशा रीतीने रेफाचें अुच्चारण आणि लेखन यांच्या क्रमांत सर्वथा अनुपेक्षणीय असा विसंवाद दिसून येतो.

यावरून दिसतें की संस्कृतांत रेफाचें लेखन द्विधा दूषित आहे. (१) रेफ पुढील व्यंजनांना विनाकारण मागे सारितो; आणि (२) परस्वर चिन्हाच्या पूर्वी न येतां तो नंतर लिहिण्यांत येतो. मराठींत तर याहूनहि अधिक अडचण अुत्पन्न होते.

**४ पंचमवर्ण व अनुस्वार--** संस्कृतांत पंचमवर्णाच्या स्थानीं कांहीं ठिकाणीं अनुस्वार म्हणजे बिंदु लिहितां येतो. कोणी लोक तो बिंदु अनेक ठिकाणीं लिहितात. त्यांपैकी कांही ठिकाणीं तो शास्त्रतः अयोग्यहि असतो. तरी पण येथे मुख्यतः मराठीचा विचार कर्तव्य असल्याने मराठींतीलच प्रघात विचारांत घेणें योग्य आहे. हा प्रघात म्हणजे कोणत्याहि जोडाक्षरांत प्रथमघटक पंचमवर्ण असल्यास त्याचें लेखन बिंदूने करणें. रंग, वांछा, तंटा, बंधु, शंभु या सर्व शब्दांत मराठींत पंचमवर्णाचा अुच्चार बिन्दूने दर्शवितात. अशा रीतीने शृंग-वरून साधिलेलें विशेषण मराठींत शार्ंग असेंच लिहिलें जाणार. कदाचित् कोणी शांर्ग असें लिहील. तरी पण हे दोन्ही लेख सदोषच आहेत. येथे जोडाक्षरांतील वर्ण र् ङ् ग् अ अशा क्रमाने अुच्चारले जातात. या क्रमाचा मेळ शार्ंग आणि शांर्ग यांपैकी कोणत्याच लेखाशीं बसत नाही. पण हा क्रम रेफ पूर्वस्वराचे डोक्यावर दिल्यास चांगला साधतो. शॅंग असें लिहिल्याने या शब्दाच्या घटक-वर्णांचा श् आ र् ङ् ग् अ हा क्रम सर्वथा अनुसरला जातो. करितां अनुस्वारस्थानीं सर्वत्र बिंदु योजणाऱ्या मराठीने तरी रेफ पूर्वस्वरावर देणें हें विशेष सोअीचें ठरतें. अेतदनुकूल आणखी अेक कारण—

**५ अनुस्वाराच्या अुच्चाराशीं साम्य—** दंश आणि दर्श या दोन्ही शब्दांत अनुस्वार आणि रेफ यांचाच फरक आहे; अेरवीं दोहोंचीं रूपें अेकच आहेत. अेकांत जेथे अनुस्वार तेथे दुसऱ्यांत रेफ अैकूं येतो. असें असून अनुस्वार पूर्वस्वराच्या डोक्यावर, तर रेफ परस्वराच्या डोक्यावर लिहिण्यांत येतो. यांत अेकविधता आणणें तर रेफाने अनुस्वारास अनुसरावें; कारण भाषेंत रेफाहून अनुस्वार पुष्कळच अधिक वेळां येतो. अशा रीतीने रेफ पूर्वस्वरावर द्यावा असें अनुस्वारलेखनाचें साम्यहि आपणांस सांगतें.

**६ अुच्चारांत घोटाळा—** सूर्यः + अंशुमाली = सूर्योंऽशुमाली. या लेखांत 'रेफानंतर लागोपाठ बिन्दु' असा क्रम आहे. पण अुच्चार पाहतां रेफ आणि बिन्दु यांच्यामध्यें यो हें संपूर्ण अक्षर येतें. हा अुच्चार व लेख यांतील विरोध सर्वथा वर्जनीय आहे. प्रस्तुत ठिकाणचा बिन्दु स्वर आणि व्यंजन यांच्यामधील अनुस्वार दर्शवितो. शार्ंग यांतील बिन्दु दोन व्यजनांमधील अनुस्वार दर्शवितो. अशा रीतीने परस्वरावरील बिन्दूने दर्शविलेल्या अनुस्वाराचें स्थान नक्की कोणतें हें कळत नाही. यामुळे अुच्चारांत घोटाळ्याचा संभव आहे. वृंताक शब्दावरून साधलेलें विशेषण वारन्ताक असें होतें. हें संस्कृतांत शास्त्रतः वार्न्ताक असें लिहिण्यांत येतें. हेंच मराठींत वार्ताक असें लिहिण्यांत येअील. पण याच आकाराचा मराठींत अुच्चार वार्तांक (= वार्ता+अंक) असाहि होअील. म्हणजे मराठींत रेफाच्या पोटांतील बिन्दु कधी परस्वरानंतरचा, तर कधी रेफानंतरचा अुच्चार दर्शवील. हाच प्रकार मर्जीतला व कर्जीला या जोडींत

आढळतो. या घेोटाळयाचा परिहार रेफ पूर्वस्वरावर दिल्याने साधेल. र्वातांक=वार्ता+अंक. र्वाताक=वृंताक-चें साधित (वार्न्ताक.)

७ निगमन— (१) रेफ परस्वरावर दिल्याने संस्कृतांत तो लेखनदृष्टया परस्वरास जवळचा दिसतो; पण अुच्चारतः तसा नसतो. असा लेख आणि अुच्चार यांत विरोध अुत्पन्न होतो. काष्र्ण्य-मध्ये प् ण् यांहून रेफ परस्वरास लांबचा, पण लेखांत तो जवळ म्हणजे डोक्यावर बसतो. (२) सर्पेण— मध्ये रेफ पे-च्या पूर्वी अुच्चारित असून, लेखांत तो अे-दर्शक मात्रेच्या नंतर लिहिण्यांत येतो. हा अुच्चारदृष्टया लेखनाचा विपर्यय आहे. (३) मराठींत अनुस्वारस्थानीं बिंदु येत असल्याने, या आकाराचे अुच्चार दोन संभवून घोटाळा अुत्पन्न होतो. भर्ग आणि भृंग यांचीं साधितें संस्कृतात भार्ग व भार्ङ्ग अशीं होतात. पहिल्याचीं द्वितीया भार्गं अशी होओील. भार्ङ्ग याचेंहि लेखन भार्गं असें होओील. यामुळे भार्ग हा अेकच लेख द्विधा अुच्चारला जाओील. (१) भार्गम् व (२) भार्ङ्ग.

हे सर्व दोष रेफ पूर्वस्वरावर दिल्याने टळतात. काष्र्ण्य, सर्पेण, अर्चीषि हे शब्द क्रमाने कांष्ण्य, र्सपेण अर्चीषि असे लिहावे. भार्ग-चें लेखन र्भाग असें करावें आणि भार्ङ्ग-चें लेखन र्भांग असें करावें. म्हणजे येथे रेफांतील बिंदूने दर्शित अनुस्वार नित्य रेफाच्या पाठोपाठ म्हणजे अेकाविधच अुचारावयाचा असल्याने अुच्चारांत घोटाळा संभवणार नाही.

ज्ञातव्य— पूर्वस्वरावर रेफ देण्याची पद्धति अंगीकारिल्याने औष्र्या आणि और्म या दोनच शब्दांच्या लेखनांत पहिल्या अक्षरावर दोन रेफसदृश चिह्नें प्राप्त होतील. तीं टाळणें जरूर आहे. अेतदर्थ हे दोन शब्द और्ष्या आणि और्म असे लिहावे. याहून अितरत्र घोटाळा संभाव्य दिसत नाही. करितां विद्वानांस विनंती की त्यांनी सर्प, मर्त्य, धाष्टर्य, कात्स्र्न्य, सूर्योऽ शुमाली यांच्या स्थानीं र्सप, र्मत्य, र्धाष्टय, र्कात्स्न्य व र्सूयोंऽशुमाली असें लिहून अुच्चारांतील घोटाळा टाळावा. रेफ पूर्वस्वरावर न दिल्यास, कर्जी-ची सप्तमी लिहिणें अशक्यप्राय आहे.

—o—

# औद्भिद-विज्ञान*

[लेखक — चरकतीर्थ दिगंबरजी वक्षी, कैवल्यधाम, लोणावळें]

जीवमात्राकडे पाहिल्यास त्यांत सहजच दोन प्रकार व्यक्त होतात. अेक झाडां-झुडुपांचा आणि अेक जनावरें-पक्षी अित्यादिकांचा. पहिला स्थावर आणि दुसरा जंगम असें त्यांचें गुणवर्णन अेकेका शब्दांत करतां येतें. पुष्कळ निर्जीव वस्तूहि स्थावर असतात. म्हणून स्थावर जीवास अुद्भिद् असें अेक विशेष गुणवाचक नांव दिलेलें आढळतें. अुद्भिदाचें जें विज्ञान तें औद्भिदविज्ञान. अलीकडील मराठी वाङ्मयांत वनस्पति हाहि शब्द अुद्भिद् या अर्थी वापरण्यांत येअूं लागला आहे. तथापि त्या शब्दाची पूर्वपीठिका पाहिल्यास तो अुद्भिदांचा अेक प्रकार दर्शविण्याकरता वापरलेला आढळतो. आयुर्वेदग्रंथांत वडापिंपळासारख्या मोठमोठ्या झाडांनाच केवळ वनस्पति म्हटलेलें आढळतें. अितरांना ओषधि, वीरुध अित्यादि वर्गनामें आढळतात. अुद्भिद् हा शब्द मात्र या सर्वांना लावलेला आढळतो. तीच शब्दयोजना योग्य दिसते. कसें तें पाहा.

झाडांझुडुपांचें बीं मातींत पडतें आणि अनुकूल परिस्थिति आली म्हणजे मातीचा थर भेदून त्यांतील अंकुर वर निघतो. भेदून अुमटतें म्हणून अुद्भिद् असा सहज अर्थ ध्यानांत येतो. आता हें खरें की कांही स्थावर जीव असे आहेत की त्यांना मूळ कांड, पर्णे अित्यादि अंगें असूनहि ते जमिनींत न राहतां पाण्यांत किंवा झाडावर राहतात. अर्थातच ते भूमि भेदतात असें म्हणतां येणार नाही. तथापि त्यांनाहि दुसऱ्या अेका अर्थानें अुद्भिद् म्हणणें योग्य ठरतें. झाडेंझुडुपें आणि त्यांसारखी शरीरघटना ज्यांची आहे त्यांच्या अंतिम घटकांच्या भिंती, किंवा तट म्हणा, दृढ असतात; अुलट पशुपक्ष्यादि जीवांच्या शरीरघटकांच्या भिंती किंवा तट लिबलिबीत असतात. अर्थातच पहिल्याची वाढ ही 'अुद्भेद' तर दुसऱ्याची 'वीण' या स्वरूपाची असते. बियांतून वृक्ष निघणें किंवा सूक्ष्म अळिंबाच्या रेणूंतून नवें अळिंब निघणें हें 'अुगवणें', परंतु सिंहवाघांची चिलट, ढेकणांची किंवा हिमजंतूंची देखील 'वीण' होते असें म्हणतात.

## अंगप्रत्यंगवर्णन

कांही अुद्भिदें सपुष्प तर कांही अपुष्प असतात. तूर्त आपण सपुष्पांचाच विचार करूं.

---

* औद्भिद-विज्ञानावर संस्कृतांत स्वतंत्र ग्रंथ नाही, परंतु औषधिविज्ञानाच्या अनुषंगानें त्याचें वर्णन तद्विषयक ग्रंथांत आलेलें आहे. त्यांतील विचारसरणी व शब्दपरंपरा जमेस धरून अुद्भिदांचें अंगप्रत्यंगवर्णन व वर्गीकरण आधुनिक शास्त्रकारांच्या धर्तीवर करतां येण्याजोगें आहे, हें दर्शविण्याकरता प्रस्तुत प्रयत्न आहे. यांत अुपयोजिलेले पारिभाषिक शब्द चरक, सुश्रुत, निघंटु अित्यादि आयुर्वेदीय ग्रंथांतूनच बरेचसे घेतलेले आहेत.

सपुष्प अुद्भिदांना मूळ, खोड, फांद्या, फुलें अित्यादि अवयव असलेले स्पष्ट दिसतात. त्यांपैकी फुलें व फळें यांचा अुपयोग संततीकरता होतो तर मूळ, खोड, फांद्या यांचा अुपयोग व्यक्तिविस्ताराकरता. होतो म्हणून त्यांना जननार्थकारी आणि जीवनार्थकारी अवयव असें म्हणावें.

मूळ, स्कंध हीं पान, फूल यांना आधार असल्यामुळे तीं वृक्षाचीं आधारअंगें होत. व पान, फूल हीं आधेय अंगें होत. ह्या निरनिराळ्या अंगांचा शुद्रमहि दोन तऱ्हांनी होतो. पान फूल हीं वृक्षाच्या बाह्य त्वचेंतून निघत असल्यामुळे तीं वृक्षाची बहिर्भव वाढ म्हणावी व मुळें अुपमुळें हीं वृक्षाच्या आंतील घटकांतून निघत असल्यामुळे तीं त्याची आंतर्भव वाढ म्हणावी. बहिर्भव वाढ होण्याची शक्ति वृक्षांत आहे म्हणून आज आपणांस गुलाबाचीं किती तरी कलमें दिसतात.

बी — पावट्याचें बीं पाहिल्यास त्यांत अेका कवचांत सांठविलेल्या दोन डाळिंब्या व कडेला मध्यें अेक खांच असें दिसतें. त्यास 'खात' म्हणतात. त्यांतून आंत अुकरल्यास लहान जिभली आढळते. तीच वृक्षाचें मूलांग होय. बी रुजल्यावर त्या जिभलीचा अेक भाग सदैव वर वर प्रकाशाकडे धाव घेत असतो व दुसरा भाग खाली खोल खोल वाढत असतो. ह्याला मूल ही संज्ञा आहे. वर प्रकाशाकडे वाढणारा भाग बीजाचें आवरण तोडून भूमि फोडून वर येतो म्हणून त्याला 'उद्भेद्' म्हटलें आहे. हाच पुढे स्कंधशाखांमध्ये विकास पावतो. म्हणून त्याला आदिस्कंध किंवा स्कंधांकुरहि म्हणतात.

भूमींत बीं रुजल्यापासून मुळें जमिनींतील अन्नास ग्रहण करण्यास समर्थ होअीपर्यंत बीजदलांतूनच अुद्भेदाला अन्नांश मिळत असतो. पावट्याचें बीं रुजल्यानंतर त्यांतील डाळिंब्या म्हणजे बीजदलें आर्द्र होअून फुगतात व वरील आवरण फुटतें. आंतून जिभलीचा चिकटलेला भाग खाली मूळ या रूपाने व सुटा भाग वर अुद्भेद या रूपाने वाढत जातो. अुद्भेदाला प्रथम जमिनीवर दोन कोमल पर्णें अुगवलेलीं दिसतात. ह्यावरून त्या वृक्षाला 'द्विदलिक' असें नांव पडलें. गहूं, ज्वारी यांच्या बीजांतून प्रथमचें आदिपर्ण अेकच अुमटतें म्हणून त्यांना अेकदलिक म्हणतात. गव्हाच्या दाण्यावर कोपऱ्यांत त्याचें खात असतें त्यांतच अेक बारीक जिभली आढळते पण ती बी रुजल्याशिवाय नीट दिसणार नाही. बी रूजून वर अुठणाऱ्या आदिपर्णांच्या ह्या दोन प्रकारांवरून द्विदलिक व एकदलिक असे अुद्भिदाचे दोन विभाग पडतात. बी जमिनींत क्लिन्न होअून त्यांतून अुद्भेदांकुर अुठला की तें बीज रुजलें असें समजतात व तो अंकुर पर्णयुक्त होअून मोठा झाला की त्याला रोपा किंवा रोपटा म्हणतात.

मूल — बीजदलाचा भेद करून जमिनीकडे वाढत राहणारा वृक्षाचा जो पर्णरहित भाग तें मूळ.

मूळाची अुत्पत्ति ही आंतर्भव असते. मूळावर कधीहि पर्णांकुर नसतो. मूलाग्रावर अेक मृदु आवरण असतें तें मूलत्राण होय. स्कंधशाखादिकांवरून मूळाचा विशेष दाखविणारी हीं तीन लक्षणें आहेत.

मूळांचा मुख्य व्यवसाय म्हणजे वृक्षाला अन्नांश व जलांश पुरविणें. यामुळे मूळाची सकल घटना अितर वृक्षांगांहून थोडी भिन्न असते. आंब्याचें मूळ प्रथम सरळ भूमींत शिरतें, तें त्याचें प्रधान मूळ. त्यास ठिकठिकाणाहून आडवीं अनेक मुळें फुटतात तीं सर्व अुपमूळें म्हणावीं. गहूं, तांदूळ यांचीं मुळें प्रधान व अुप अशा लक्षणांचीं नसतात. अेकाच ठिकाणाहून अनेक दोऱ्यांप्रमाणे मुळें सुटलेलीं असतात. हा त्यांचा मूळोत्पत्तीचा अेक विशेष आहे. मूळाच्या आकृतीहि पुष्कळ बनलेल्या असतात. गाजराचें मूळ शंकूप्रमाणे तर शतावरीचीं

मुळें मांसल व ञुपक्याने अशीं राहतात. रताळीं हीं कंदाकार मुळें होत. बीटचें मूळ भोवऱ्याप्रमाणे बनतें. निंब वगैरेंचीं प्रदीर्घ व रज्जुमुळें जाणावीं.

वडाच्या पारंब्या हा अेक मूळाचा निराळा प्रकार दिसतो. त्यास हवअी मुळें म्हणतात. झाडांवर पुष्कळ वेळां आढळणाऱ्या कांही बांडगुळांत हा हवअी मुळांचा प्रकार पुष्कळसा दिसतो. अुसाच्या डोळ्यांतून किंवा कारंदाच्या गांठींना वर मुळें फुटलेलीं दिसतात. तीं सर्व अुपरी मुळें म्हणावीं.

स्कंध — मूळांतील प्रकारापेक्षा स्कंधांत कितीतरी भिन्न भिन्न प्रकार आढळतात. पुष्कळ वेळां हा स्कंध किं मूळ असा संशयहि येतो. स्कंधाचीं सामान्य लक्षणें अशीं— १. स्कंधाचें अग्र केव्हांहि मूळाच्या अग्राप्रमाणे आवरणयुक्त नसतें. २. मूळाप्रमाणे स्कंध प्रधान वा आदिस्कंध शिवाय करून केव्हांहि आंतर्भव नसतो. त्याची नेहमी बहिर्भव वृद्धि असते. ३. स्कंधावर पर्णांकुर असतात. स्कंधाचें मुख्य कार्य म्हणजे मूळांनी शोषलेलें अन्न वा पाणी वृक्षाच्या सर्व भागांना वाहवून पोचविणें हें होय. दुसरें अेक कार्य स्कंधांत आढळतें. वृक्षाच्या निरनिराळ्या घटकांनी बनविलेला पिष्ठमय सिद्ध अन्नांश पुनः परत वाहवून कोठेतरी वृक्षांगांत सांठवून ठेवण्याची क्रियाहि स्कंध करीत असतो. सुरण, शाल्मली कंद हे त्याचें स्पष्ट अुदाहरण आहे.

स्कंधाची वाढ नेहमी अंकुर येअून होते. अशा वाढत गेलेल्या स्कंधाची त्या दिशेकडील परिसमाप्ति पर्ण वा पुष्प अुत्पन्न होअून होते. प्रथम अंकुर, मग स्कंध, नंतर शाखा-उपशाखा-पर्णें फुलें व मग फळ असा क्रम होतो.

स्कंध कोवळेपणीं हरितार्द्र असतो. तोच जून झाल्यास धूसर व खरस्पर्शी होतो. म्हणून त्यास काष्ठस्कंध म्हणतात. अिष्टभूमीची अनुकूलता, निवाऱ्याची जागा, अिष्ट तपमान व आनुवंशिकता या गुणांवरच मुख्यतः वृक्षाची अुन्नत किंवा आयतवृद्धि अवलंबून असते. लोणावळ्यासारख्या ठिकाणीं निर्गुडी चांगली वृक्षत्वापर्यंत पोंचते पण नगरसारख्या ठिकाणीं ती क्षुपाहून अुंच होअूं शकत नाही. कडुनिंब, बेल हे देशावर महावृक्ष दिसतात पण लोणावळ्यास कुंड्यांतून लावण्याच्या योग्यतेचे राहतात.

ताड, माड या वृक्षांतील प्रधान स्कंध खूप जोरदार असतो. व बाकीचे अितर स्कंध अल्पसत्व असतात. अशा वेळीं वृक्षाची अुंची सपाटून वाढते. अशांना सरल वृक्ष म्हणावें. बाकीचे स्कंधहि जोरदार असतात. अशा वेळीं वृक्ष डेरेदार होतो.

स्कंधाचा शेवट पुष्पांत होअून झाड अेक वर्षांत मरून गेल्यास त्याला वर्षायु म्हणतात. पावसाळ्यांत अशीं वर्षायु फुलझाडें पुष्कळ अुगवत असतात. आयुर्वेदीय ग्रंथांत अशांना ओषधि ह्या वर्गात धरलेलें आहे. कांहींचे स्कंध दोन वर्षें टिकून झाडें मरतात त्यांस द्विवर्षायु म्हणावें. आंब्याचें झाड अनेक वर्षें फलफूल देतें म्हणून त्यास बहुवर्षायु म्हणावें. कारवी ही सात वर्षांनी मरून जाते. अशांना अनेकवर्षायु म्हणावें.

दूर्वा, ब्राह्मी वगैरेंतून स्कंध जमिनीलगत किंवा जमिनींतूनहि प्रसर पावत असतो. तेव्हां त्याला कांड, प्रकांड अशा संज्ञा असून भूगतकांड, भूलग्नकांड वगैरे नांवें द्यावीं.

ज्वारी, अूस यांतून स्कंध सरळ असतो. त्याला दंडस्कंध म्हणावें. दंडावर अंतराअंतराने पानें फुटण्याच्या जागीं कडा अुत्पन्न होते ती कर्णिका व तिच्या खाली वर असलेल्या फुगवटीस पर्व म्हणतात. दोन पर्वांतील अंतर तें पर्वांतर. कांहींत पर्वावर गांठ येअून तींतून अुपरी मुळें निघतात. गांठीस अक्षि म्हणतात.

बाजारांत सुंठ किंवा वेखंड मिळतें तें त्या त्या झाडाचें मूळ नसून स्कंधाचें भूगतकांड हा प्रकार आहे. भूगतकांड हें नेहमीच्या स्कंधाप्रमाणे हिरवट नसतें, पिंगट व धूसरवर्ण त्याला येतो म्हणून तें मूळ असावें असा भ्रम होतो. आपल्या नेहमीच्या खाण्यांतील बटाटा हा देखील स्कंधच आहे. वृक्षाच्या निरनिराळ्या भागांतून बनलेला सिद्ध अन्नांश परत वाहवून सांठवून ठेवण्याचा तो अेक स्कंधाचा प्रकार आहे. सुरण हाहि तसाच प्रकार आहे.

कांदा, लसूण यांतील स्कंधाचा प्रकार आणखी निराळा आहे. ह्यांत स्कंधाचा मुख्य अंकुर आंत असून त्यावर पर्णांचा थर बनून त्याला स्कंधाचें रूप आलेलें असतें.

शाखोपशाखा हे स्कंधाचेंच अवस्थान्तर होय. त्यांचे प्रकारहि पारिजातकांत चतुष्कोनी तर निर्गुडींत गोल असे विविध आहेत. वेलीचा स्कंध वेलीचा भार सहन करण्याअितका प्रबल नसतो. त्याला दुसरा आश्रय लागतो. अशांना प्रतान म्हणतात. लौकिकांत ह्यालाच ताणा म्हणतात. प्रतानाचीं अग्रें पुढे पुढे चांचपडत जाअून आधार घेत वाढत असतात. त्या अग्रांना शुंग म्हणतात. अशा तऱ्हेने पराश्रित वाढणाऱ्या अुद्भिदप्रकारास वीरुध ही संज्ञा आहे. त्याचेच त्या त्या लक्षणावरून गुल्मिनी, आलिंगिनी, प्रसारिणी असे प्रकार आहेत.

अुद्भिदाच्या जीवनक्रमास विशेष अडचण अुत्पन्न झाली तर त्याचें अेक अंग दुसऱ्या अंगाचें काम क्वचित् करतें. अशाला व्यवसायसंकर अथवा विपरिणाम म्हणावें. झाडावरील कांटे हे त्याचें ठळक अुदाहरण आहे. बेल, संत्री यांचे कांटे हे विपरिणमित शाखाच होत. त्यांची रचना, घटना व स्थान हीं सर्व शाखांप्रमाणेच राहतात. जीवनकलहांत अेक वेळ शाखांना हें स्वरुप प्राप्त झालें असावें. पुष्कळ वेळां ह्या कांट्यांवर पर्णोद्गम झाल्याचेंहि आढळतें. तेव्हा तर नक्की तो शाखांचा विपरिणाम म्हणून कळतेंच. अशा कांट्यांना कंट म्हणावें. बाभळीचे कांटे हे पर्णांचा विपरिणाम होत. त्यांना कंटक म्हणावें. रिंगणीच्या पानांवरील कांट्यांना शल्य वा शूक म्हणावें. स्कंधपर्णांवरील केसांचा तो विपरिणाम आहे.

स्कंधाचा आडवा छेद घेतल्यास अनेक वलयें दिसतात. मध्यें जो भाग असतो तो काष्ठ किंवा स्तंभ. त्याबाहेरचा भाग ती त्वचा. त्वचेंतहि बाह्यत्वचा व अंतस्त्वचा असतात. बाह्यत्वचा झाडाचें रक्षण करणारी असून खरस्पर्शी, धूसरवर्णी, कठीण अशी राहते. अंतस्त्वचा मृदु, आर्द्र असते. त्यांतून रसपरिवाह होअून झाडांना जीवन मिळतें. प्राचीन ग्रंथांत बाह्यत्वचेला परिपोटक व आंतील त्वचेला लिंशक अशीं नांवें आहेत.

आंबा, वड वगैरे महावृक्षांचा स्कंध कांही वर्षांनी खूप विशाल होतो. अशा घाटदार स्कंधांना बुध्न म्हणतात. निंब, बाभूळ या झाडांवर घाव करून ठेविल्यास त्यांतून गोंद येअून जमतो. तो त्यांचा निर्यास होय. हिंग, गुग्गुळ, धूप हे सर्व त्या त्या झाडाचे निर्यास आहेत. रुई, अुंबर यांतून फांदी तोडल्यावर जो पांढरा द्रव निघतो. त्याला क्षीर म्हणतात व त्या वृक्षांना क्षीरीवृक्ष म्हणतात.

पर्ण — पर्ण हें झाडाचें जीवनव्यवसायांतील अेक महत्त्वाचें अंग आहे. पर्ण हें नेहमी स्कंधावरच अुगवत असतें. त्याचा अुद्गम नेहमी अनुक्रमाने होत असतो; म्हणजे नूतन पल्लव अग्राकडे व जुनीं स्कंधाकडे असा क्रम राहतो. पर्णांची वाढहि स्कंधाप्रमाणे बहिर्भव असते. यांच्या अुद्गमाचे दोन ठळक प्रकार दिसतात. केळीच्या झाडांत अनेक पानांचें गुंडाळें आंतून बाहेर पडतें व त्यांतून अेकेक पान अलग होतें. हा अेक प्रकार झाला. त्याला संघप्ररोह म्हणावें. गुलाबाच्या फांदीवर अेक फुगवटी येअून त्यांतून अेक तांबूस प्ररोह निघतो. नंतर

त्यांतून अेक पान निघतें. त्यांतूनच मग दलें, अुपदलें निघतात. ह्या प्रकाराला क्रमप्ररोह म्हणतात.

पर्ण व स्कंध ह्यांच्या संधींत पुनः अंकुर येअून शाखा फुटते. पण पर्णांवर किंवा त्यांच्या देठावर कधीहि अंकुर येत नाही. पर्ण हे त्या दिशेचें वृक्षाचें टोंक झालें. नागवेलीचें पान वीतभर तर केळीचें तीन-चार हात लांब वेलाचें त्रिदली पर्ण; तर टेंटूचें पर्ण तीनचार हात लांब असून त्यांत दलें, अुपदलें किती तरी असतात. सर्व मिळून तें अेक पर्ण म्हटलें जातें. कारण त्यावर मध्यें कोठेहि शाखांकुर नसतो.

पर्णरचना ठराविक असते. तुळशीची पर्णरचना अभिमुख तर सातवणीची चक्राकृति. गुलाबाची पर्णरचना एकांतरानें असतें. पर्णाचीं अंगें दोन. एक वृंत (देठ) व दुसरें पत्र (पान). रिंगणीचें पान अवृंत असतें; म्हणजे पत्र व स्कंध यांमध्ये असणारा वृंत तिथे नसतो. कोरफडीचें पर्ण तसेंच असतें. टेंटूचें पर्ण दीर्घवृंत तर रुईचें ऱ्हस्ववृंत असतें. गुलाबाच्या पर्णवृंताच्या बुडाशीं पंख असतात म्हणून तो सदलक वृंत होय. वृंत सामान्यतः हरितपांडु असा असतो.

त्यापुढील भाग म्हणजे पत्र. हें हिरवें असून त्यावर अेक मध्यसिरा व बाजूला दुतर्फा पुनः सिरा असतात. भाताच्या पानावरील शिरा वृंतापासूनच समांतर फुटलेल्या असतात. त्यांना मध्यसिरा नसते. द्विदलिक व एकदलिक अुद्भिदांच्या पानांतील हा अेक फरक आहे.

पत्राची धारा गुलाबांत दंतुरित तर आंब्यांत अखंड असते. समुद्रशोकाचें पत्र पाठी-कडून रुवाळ तर सागाचें कर्कश अशा अनेक गुणांवरून पत्राची गणना करतात. रिंगणीचें शीर्णपत्र, सागाचें कर्कशपत्र, आपट्याचें युग्मपत्र, अुसाचें आसिपत्र, ताडाचें शिरालपत्र, शिरीषाचें राजीपत्र, ब्राम्हीचें मंडलपत्र, देवदारूचें सूचीपत्र, मेदाचें शल्यपत्र अशीं पत्राचीं नावें प्राचीन ग्रंथांत विपुल आहेत.

वेलाच्या पानांत तीन दलें असतात. तिन्ही मिळून अेकपर्ण. करंजाच्या पर्णांत दलें अनेक असून त्यांची संख्या विषम असते. पण शिरीष किंवा निंब यांच्या पर्णांत दलसंख्या सम असते. बिल्वपर्णाप्रमाणे टेंटूच्या पर्णांत अनेक त्रिदळें असतात. अशा वेळीं त्याचें निर्वचन अेकेरी, दुहेरी, तिहेरी, त्रिदळ असें करावें.

पत्राच्या मूळाशीं कांही वृक्षांमध्ये स्फोट असतात. अु. हिरडा, शिवण अित्यादि यांच्या पानाच्या मूळाशीं वृंतावर दोन स्फोट असतात. त्यांवरून पुष्कळ वेळां अुद्भिदपरिचय ठेवतां येतो. वेलाच्या किंवा संत्र्याच्या पानांत, तें पान अुजेडाशीं धरलें तर मध्यें मध्यें पोकळ छिद्रें दिसतात. त्यांत अेक सुगंध असतो. त्यांना गंधरंध्रें म्हणतात. हें त्या वर्गाचे अनेक लक्षणां-पैकी अेक परिचयचिन्ह आहे. तसेंच जांभूळ, पेरू वगैरे झाडांच्या पानांच्या धारेखालीं अेक आठवी लांब सिरा असते. तिला अुपांत्यसिरा म्हणतात. हेंहि त्या वर्गाचें अेक प्रधान चिन्ह आहे.

पुष्प — हा अत्यंत महत्त्वाचा असा वृक्षाचा आधेयभाग आहे. यांतूनच वृक्षसंतान जनित्रें निर्माण होअून त्यांपासून पुढील वृक्षव्यक्तींचीं बीजें तयार होतात. कांही झाडांतून हीं जनित्रें (अुत्पादक अवयव) अगदी अनावृत असतात; अु. देवदारू. त्यास प्रकटबीज वा प्रकटलिंग म्हणतात. आंबा वगैरे झाडांत तशीं बीजें तयार करणारे अवयव पूर्ण व संरक्षित असे असतात म्हणजे त्यांवर पाकळ्या वगैरे पुष्पाच्या भागाचें आवरण असतें. म्हणून त्यांना गूढबीज किंवा गूढलिंग म्हणावें.

बहावा, कण्हेर ह्यांतून फुलें संघशः येतात. पण सदाफुलीला अेकेकटेंच फूल फांदीशीं येतें. पहिल्यास संघपुष्प व दुसऱ्यास अेकाकी पुष्प म्हणतात. घायटीच्या फुलाचा अुद्गम पानांच्या कक्षेंत होतो म्हणून तीं कक्षस्थ पुष्पें होत. तुळशी, सब्जा यांना मंजेरी येअून त्यांतील मध्यकणावर फुलें येतात. कोरफडींत पानांमधून अेक सोट निघतो. तो दंड, व त्यावर भडक रंगाचीं फुलें येतात. त्यांना दंडपुष्प म्हणतात. कदंबाचें फूल मुंडक्याप्रमाणे असतें म्हणून तसलीं फुलें हीं मुंडपुष्पें होत. पारिजात, तगर यांच्यांत फुलांत पाकळयाखालीं दांडी असते. तिला पुष्पनाल म्हणतात. अडुळशाचें फूल सिंहाच्या जबड्याप्रमाणे दिसतें म्हणून तशा फुलांना व्यात्तपुष्प म्हणतात. म्हणून अडुळशाला संस्कृतांत सिंहमुखी म्हटलें आहे.

पर्णाप्रमाणेच फुलाचा अुद्गम अंकुरांतून होतो. हा पुष्पांकुर मोठा मोठा होअून अद्याप पुष्पत्वाप्रत पोंचला नसतो अशा फुलांस कलिका म्हणतात.

आता नमुन्यासाठी अेक गुलाबाचें फूल घेऊन त्याचे अवयव पाहूं. ह्या पुष्पांत निर-निराळीं वलयें पडलेलीं दिसतात. अगदी खालचें वलय हिरवें असून त्याला अेक देठ असतो. ह्या देठास पुष्पवृंत म्हणतात. त्यापुढे हिरव्या पाकळयांचें आसन असतें. तो पुष्पकोश होय. ह्याच्या प्रत्येक पाकळीस संदल म्हणतात. यापुढील वलयांत तांबड्या पाकळ्या आहेत. त्यांना प्रदलें म्हणावें. हीं प्रदलें ज्यावर स्थित आहेत असा जो मध्यभाग त्याला नाभि म्हणतात. प्रदलांची रचना अेकेरी, दुहेरी किंवा अनेक व्यूहांत असते. प्रदलांच्या ह्या व्यूहास फुल्लार म्हणतात. ह्याच्या आंतील वलयांत केसरसंघ असतो. त्यांतील प्रत्येक केसराच्या डोक्यावर अेकेक पीटिका असते ती पराग पीटिका व त्यांतून जी पिवळी पूड सांडते ते परागकण. ह्या वलयाच्या आंत किंजल्काचें वलय असतें. किंजल्कच्या खालीं त्याला आधार-भूत असलेला भाग हा किंजल व त्याच्याहि बुडाशीं असलेला तो किंज. ह्यांत बीजकोश असतात. बीजकोशामध्ये अनेक आशये असतात. किंजल्क हें किंजलाच्या द्वाराचें नांव. हें किंजल्क फलनानुकूल वेळीं बुळबुळीत होतें; व त्यावर अुडून सांडणारे पराग तेथेच चिकटून किंजलमार्गानें आंत बीजकोशांत ओढले जातात. बीजकोशांतील आशयांतून अनेक बीजकण असतात. त्यांच्याशीं ह्या परागकणांचा संयोग होअून ते बीजकण फलीभूत होअून फल या रूपाने आपणांस दिसतात.

गुलाबाच्या फुलांतील प्रत्येक भाग अगदी स्पष्ट व अलग असा दिसतो. पण धोतऱ्याच्या किंवा गुलछडीच्या फुलांत पाकळ्या अेकजीव होअून गेलेल्या दिसतात. गुलाबाचीं मुक्त प्रदलें तर धोतऱ्याचीं संयुक्त प्रदलें जाणावीं. पुष्पकोशांत असलेल्या नाभीवर किंवा खालीं असा पुष्पाचा बीजकोश असल्यास त्यास अनुक्रमें ऊर्ध्वनाभीबीजकोश किंवा अधो-नाभीबीजकोश म्हणावा. त्याचप्रमाणे पुष्पदलांची ठेवण त्यांत असलेल्या किंजाच्या अपेक्षेने ठरवितात. गुलाबांतील प्रदलें परिकिंज असतात. त्याच पाकळ्या किंजाच्या खालून वा वरून अुठलेल्या असतील तर त्यांस अधःकिंज किंवा ऊर्ध्वकिंज प्रदलें म्हणावीं. त्याचप्रमाणे केसरहि भिन्न भिन्न फुलांत कधी अधःकिंज, ऊर्ध्वकिंज किंवा परिकिंज असतात. किंजल्का-च्या संख्येप्रमाणे साधारणतः आंतील बीजकोशहि अेकाशयी, द्व्याशयी असतो. रुईंत बीजकोश द्व्याशयी असतो. जास्वंदींत पंचाशयी असतो. त्याप्रमाणे किंजल्कहि पंचमुखी असतो. या सर्वांचा अुपयोग अुद्भिद्-निश्चिती करण्यासाठी फार होतो. अुद्भिदाच्या अनेक भिन्न अव-यवांपेक्षा हे अवयव अत्यंत स्थिर व कधीहि फेरफार न होणारे असे आहेत. म्हणून त्यांचा विचार वृक्षांच्या वर्गीकरणांत फार महत्त्वाचा मानला आहे.

बीजकेसर, किंजल्क हीं अेकाच फुलांत असतात तेव्हा तीं अुभयलिंगी पुष्पें म्हणावीं. कधी नुसते केसरच किंवा नुसते किंजल्कच असतात तेव्हां तीं अेकलिंगी पुष्पें म्हणावीं. गुलाब हे अुभयलिंगी पुष्प व पपई, काकडी हीं पुष्पें अेकलिंगी असतात. अुभयलिंगी पुष्पांत बीजकणांचें फलीकरण त्यांतीलच केसराकडून होतें तेव्हा त्यास निजपरागव्यतिकर म्हणतात. अन्य ठिकाणाहूनच्या केसराकडून फलीकरण झाल्यास त्यास अन्यपरागव्यतिकर म्हणतात. दोन्ही प्रकारचे व्यतिकर अुद्भिद्सृष्टींत चालू आहेत. निजपरागव्यतिकर जेव्हा सृष्टीला नको असतो तेव्हा त्या पुष्पांतच अशी विलक्षण घटना बनते की त्यांचे पराग त्यांच्याच किंजल्कावर पडूं शकत नाहीत. जास्वंदींत किंजल्क अितका लांब असतो की त्यावर असलेलें र्‍हस्वकेसर व त्यावरील परागकण तिथवर पोचूंच शकत नाहीत. यदा कदाचित् समअुंचीचे असले तरी देखील त्यांचा प्रसेकोन्मुख होण्याचा काल भिन्न राहतो. केसरांच्या आधीच किंवा अुशीरा किंजल्क वयांत येतात. त्यामुळे निजपरागव्यतिकर टळतो.

गवत किंवा पावसाळी बारीक बारीक क्षुपांतून निजपरागव्यतिकर सर्वत्र प्रचलित आहे. त्यामुळे त्यांच्या पुष्पाचा दिखाअू भाग अितका अुत्कटहि नसतो. अन्यपरागव्यतिकरासाठी कृमीकीटकांची जरूरी असते. त्यांचें आकर्षण व्हावें म्हणून प्रदलांच्या बुडाशीं असलेल्या बारीक पिंडांतून गोड द्रव स्रवत असतो. त्यास मकरंद किंवा मधु म्हणतात. प्रदलाच्या भडक रंगाने कृमीकीटक तिकडे आकर्षिले जातात व त्यांतील मकरंद घेत असतांना अनेक परागकण त्यांच्या पायाला चिकटून ते जातील तिकडे निरनिराळ्या फुलांत फेकले जातात. नाहीतर वायूच्या झुळकीनेहि परागकण अुडून किंजल्कावर नाअून पडतात. पहिल्या प्रकारास कीटाहृत फलन व दुसर्‍यास वाताहृत फलन म्हणावें. पुष्पांतील मधुसंचयहि कांही कांही वृक्षांत फार असतो. अडुळशांतील मध माणसासहि ओढतां येतो. धायरीचें फूल तर मधाने भरलेला पेलाच वाटतो. अन्यपरागव्यतिकरच व्हावा असें जेथे अभीष्ट असतें तेथे पुष्पाचा दर्शनी भाग फार अुत्कट असतो व परागहि विपुल आढळतात. सहज केसरांना धक्का लागला तरी परागांची पिंवळी पूड सांडते.

परागकण किंजल्क द्वारीं येअून पडल्यानंतर आंतील बीजांडें वा बीजकण फलीभूत होण्याचा काल फार निरनिराळा आहे. कांही तासांपासून तों कांही दिवसांपर्यंत हा काल आढळतो. ओक वृक्षांत परागकण येअून पडल्यापासून आंत प्रविष्ट होअून बीजांडाशीं संयोग पावण्याचा काल अेखादा आठवड्याचा तरी असतो असें आढळून आलें आहे. अशा तर्‍हेने परागकणांतील पुंजनित्रें व बीजकोशांतील स्त्रीजनित्रें यांचें मीलन बीजकोशांतच होतें. त्यांतील दोन्ही जीवकें अेकवटतात व अन्य वृक्षव्यक्तिनिर्माणकारी असें अेक जनित तयार होतें. ह्या जनितावर अेक आवरण बनून आंतील जनित व बाहेरील जनितावरण अशीं क्रमाने वाढून पक्व झालीं म्हणजे तें बीज पक्व झालें असें आपण म्हणतों.

बीजाला पुष्कळ वेळां बाहेरून अन्नमय द्रव्याचा लेप असतो. आंब्याच्या कोयीवर मगज असतो तें फळ होय. आंब्याचें फळ मांसल असतें. तूर, वाटाणा याचें शिंबीफल असतें. गहूं, तांदूळ यांना शूकफल म्हणतात.

सावरी किंवा रुअी यांचीं फळें वाळल्यावर फुटतात व त्यांतील, टोंकाशीं कापूस असलेलीं बीजें बाहेर अितस्ततः अुडत असतात. वृक्षसंतान लांबवर नेण्याची ही निसर्गयोजनाच असते. आघाडा किंवा कुसळी गवत यांच्या बियांना कुसळी असतात. त्यामुळे कोणाच्या तरी अंगाला लागून बीजें लांबवर जाअूं शकतात.

उद्भिदांचें वर्गीकरण— प्राचीन आयुर्वेदीय ग्रंथांतून उद्भिदांचें वर्गीकरण शरीरावर दिसून येणाऱ्या त्यांच्या गुणधर्मांवरून केलेलें आहे; आणि तें युक्तच होय. कारण उद्भिद-शास्त्र हें त्या काळीं वैद्यकांतर्गत असा अेक भाग होता. उद्भिदांच्या रस, वीर्य, विपाका-वरून त्याचे भेद पाडून रक्तशोधक, मूत्रल, पाचन, बृंहण वगैरे वर्ग आयुर्वेद ग्रंथांत आढळतात. ही गुणतः वर्गीकरणपद्धती झाली. आता उद्भिदविज्ञान हें केवळ वैद्यकांतर्गत न राहतां स्वतंत्र शास्त्र बनलें आहे. त्यामुळे गुणतः वर्गीकरणापेक्षा रूपतः वर्गीकरणपद्धती पुढे आली. ह्या वर्गीकरणाप्रमाणे उद्भिदाचा मुख्य स्थिर भाग जो पुष्प त्यावर विशेष भर दिलेला आहे.

आंबा, डाळिंब, गुलाब, तुळस, अेरंड वगैरे फुलें जवळ ठेवून त्यांच्यांत साम्यासाम्य पाहून कसे गट पडतात तें पाहूं. प्रथम प्रदलें हें लक्ष्य ठेवून पाहिल्यास कांहींत प्रदलें प्रकट असतात तर कांहींत अस्पष्ट वा नसतातच. आंबा, गुलाब ह्या प्रदलीवर्ग म्हणूं व अेरंड, आघाडा वगैरे अप्रदली वर्ग म्हणूं. अप्रदली म्हणजे ज्यांत प्रदलें नसतात किंवा अल्प असतात असा अर्थ घ्यायचा. प्रदलीवर्गांतहि आंब्याचें किंवा गुलाबाचें फूल ह्यांतील प्रदलें मोकळीं असतात म्हणून तो मुक्तप्रदलीवर्ग व तुळस; धोत्रा यांचीं प्रदलें अेकवटलेलीं असतात म्हणून तो युक्तप्रदलीवर्ग होय.

युक्तप्रदलीवर्गांत संदलाच्या अपेक्षेने पुनः कांही भेद पडतात. सोनचाफा, कमळ यांच्या पुष्पकोशाचीं संदलें मुक्त दिसतात, तर आंबा, निंब यांचा पुष्पकोश कडेने जरासा युक्त झालेला असतो. डाळिंब, काकडी यांचा पुष्पकोश अगदी पेल्याप्रमाणे बनून संदलें अेकवटलेलीं अशीं असतात. त्यावरून पहिला मुक्तसंदलिक, दुसरा अयुक्तसंदलिक व तिसरा युक्तसंदलिक असे पोटभेद झाले. मुक्तसंदलिकांत पुन्हा बीजकोश व केसर संघ यांच्या रचनेवरून अनेक पोटभेद आहेत. त्यांना त्या त्या वर्गांतील अेखाद्या परिचित पुष्पाचें नाम देअून वर्ग बनवावा. त्यासाठी त्यांतील नमुनापुष्प पाठ करावें लागतें. उदा० मुक्तसंदलिकविभागांत कमळवर्ग, सीताफळवर्ग, चंपकवर्ग, सर्षपवर्ग असे येतात. अमुक्तसंदलिकविभागात आंबा, निंब, लिंब, शिग्र असे वर्ग येतात व युक्तसंदलिकविभागांत डाळींब, धायटी वगैरे वर्ग पडतात.

मुक्तप्रदलांचे असे तीन पोटभेद संदलावरून पडलेले आहेत. ह्या सर्वांत मुक्तप्रदलत्व हें सामान्य. मुक्तप्रदलत्व ह्या शब्दाने प्रदलें संपूर्णतया मुक्त असायला पाहिजेत. पारिजातक किंवा करवंद यांचीं प्रदलें वरच्या भागाने जरी मोकळीं दिसत असलीं तरी त्यांचा खालचा भाग अेकवटलेला असतो म्हणून तीं पुष्पें मुक्तप्रदली नव्हेत, धोतऱ्याच्या पुष्पाप्रमाणे तींहि युक्तप्रदलीच म्हणावीं.

ह्या युक्तप्रदलीविभागांत पुनः तीन तऱ्हा आहेत. झेंडू, कॉफी ह्यांत बीजकोश अधोनाभी असतो. तर चित्रक, बेहडा, यांत तो अूर्ध्वनाभी असतो. रुअी, धोत्रा, तुळस यांत बीजकोश अूर्ध्वनाभी असून द्व्याशयी असतो व केसर परिप्रदल असे असतात. म्हणजे केसर प्रदलांतूनच अुठलेले दिसतात. चित्रकाचे केसर प्रदलांच्या बुडाशीं लागलेले असतात. अधोनाभी बीजकोश असलेले, अूर्ध्वनाभी बीजकोश असलेले व अूर्ध्वनाभि द्व्याशयी बीजकोश असलेले, असे युक्तप्रदलीचे तीन अुपविभाग झाले. ह्यांत झंडूवर्ग, काफीवर्ग, चित्रकवर्ग, पारिजातवर्ग, अर्कवर्ग वगैरे येतात.

अप्रदली वा प्रदलहीन विभागांत पुष्पकोश किंवा प्रदलें बहुशीं नसतात. असल्यास पुष्पकोश कांहींत असतो. क्वचित् प्रदलें असल्यास अस्पष्ट व संदलाशीं समरसून असतात; म्हणून

तीं नाहींतच असें धरलें जातें. पुष्पें अेकलिंगी असतात; अुदा० अेरंड, आघाडा, गुलबास अि. आतापर्यंतच्या वर्गीकरणांत पहिलें वर्गीकरण प्रदलावरून, नंतर संदलावरून व नंतर बीज-कोशाच्या ठेवणीवरून व केसरांच्या ठेवणीवरून करण्यांत आलें. येथपर्यंतची गणना विशिष्ट हेतु धरून झाली. यापुढचें वर्गीकरण त्या त्या वर्गांतील परिचित पुष्पावरून त्याला नांव देअून करतात; अुदा० कमळासारखी केसरबीजकोशादिकांची रचना असणारीं सारीं पुष्पें कमळवर्गांत, सर्षपाप्रमाणे असणारीं सर्षपवर्गांत अशी पद्धती ठेवावी. त्यांत त्या त्या नांवाने बोधित होणाऱ्या वर्गाचें अेक नमुनापुष्प अगदी पाठ करायला पाहिजे.

अिंग्रजींत ह्याला natural orders म्हणतात. हे वर्ग पाडतांना त्यांनी अेकच धोरण वापरलें नाही. कांही ठिकाणीं परिचित पुष्पावरून वर्गाला नांव दिलेलें असतें; अुदा० रोझेसीद ओलीएसी. म्हणजे रोझ् म्हणजे गुलाबाप्रमाणे फुलें असणारा वर्ग इत्यादि. कधी कधी तीं अुद्भिदें शोधून काढणाऱ्या शास्त्रज्ञाचें नांव त्या वर्गास देतात; अुदा० लोग्यानीएसीद (कुचला-वर्ग) लोग्यान् नामक औद्भिदशास्त्रज्ञाच्या नांवाने तो वर्ग झाला. जेन्शीनेई (चिरायता वर्ग) जेन्शन् नामक राजाने तें अुद्भिद् औषधार्थ अुपयोगांत आणिलें म्हणून त्याचें नांव त्या वर्गास दिलें. कधी कधी त्या अुद्भिदाच्या गुणावरूनहि नांवें पडलीं आहेत. अुदा० स्क्राफ्युलारिनीई (नीरब्राह्मी) ह्यांत गंडमाळा बऱ्या करण्याचा धर्म आहे असा समज होता. ॲप्योसॉनेसीई (कुडा) ह्यांतील वृक्ष कुत्र्याला घातक म्हणून समजले जात असत. असो. या वरील अुताऱ्या-वरून शेवटचें वर्गीकरण कसें आहे ती कल्पना येअील. आपल्याला हे वर्ग त्यांतील अेखाद्या अत्यंत परिचित वृक्षाचें नांव देऊन आत्मसात् करतां येणें शक्य आहे. मात्र तो वर्ग दाख-विणाऱ्या अुद्भिदाचें पुष्प हें वर्गनिदर्शक म्हणून समजावें. याच विचारसरणीने वर्गीकरण केल्यास पारिभाषिक शब्द कसे योजतां येतील याचें किंचित् दिग्दर्शन वर केलें आहे. अेकंदर अुद्भिदांचा विस्तार फार आहे. त्यांतील अगदी नेहमी डोळ्यांसमोर दिसणाऱ्या व सहज बागेंत गेल्याने आढळणाऱ्या अशांचाच समावेश या लेखांत केला आहे. त्यावरून वर्गी-करण कसें करीत असतात, अपरिचित वृक्ष कशा तऱ्हेने ओळखावा व त्याची ओळख मनांत कशी ठेवावी वगैरे गोष्टींची थोडी फार कल्पना येअील.

---

# साभार स्वीकार

१. श्रीमत्पूज्य पाद-स्वामीकृत समाधिशतक– अनुवा० श्री. रा. ने. शहा; प्रका० श्री. जिनवाणी प्रसारक चारित्र्य चक्रवर्ती श्रीमदाचार्य शांतिसागर दिगंबर जैन शासन माला, मालेगांव.

२. जैन धर्मावरील आक्षिप्त विधानें व त्यांचें निरसन— ले० श्री. रा. ने. शहा; प्रका० श्री. बाळासाहेब आ. पाटील; मूल्य ४ आणे.

३. मराठवाड्यांतील आधुनिक कविता— ले० कृष्णाकुमार; प्रका० श्री. ग. ना. अंबेकर, नांदेड; मूल्य १॥ रु.

म. सा. प. (१३-३-८)

४. भग्न मूर्ति— कर्ता: श्री. आत्माराम रावजी देशपांडे; प्रका० श्री. ना. ल. प्रयागी, सुबोध सिंधु प्रेस, खांडवा; मूल्य १॥ रु.

५. चांदण्यांतील सावल्या— ले० श्री. दत्त रघुनाथ कवठेकर; प्रका० श्री. ज. मा. महाजन, कॉन्टिनेन्टल् प्रकाशन, टिळक रस्ता, पुणें २.

६. तिसावें भारत नाट्यसंमेलन, नागपूर (संपूर्ण वृत्तान्त)— प्रका० श्री. पां वा. गडकरी, बी.अे., अेल्‌अेल्.बी., चिटणीस, अभिनव नाट्यमंदिर, वॉकर रोड, नागपूर; मूल्य १ रु.

७. बालकांचा मनोविकास— ले० कै. न. ल. आठवले; प्रका० श्री. पां. ना. बनहट्टी, सुविचार प्रकाशनमंडळ लिमि., धनतोली, नागपूर; मूल्य १॥ रु.

८. प्रो. ना. सी. फडके यांचीं गाजलेलीं भाषणें— प्रका० श्री. व. वि. परांजपे, पु. रा. भिडे आणि कं., पुणें २.

९. जाऊं मी सिनेमांत ?— ले० शांता आपटे; प्रका० वी. गोविंद, खटाववाडी, मुंबअी ४; मूल्य १ रु.

१०. अतिप्रसंग— ले० दत्तू बांदेकर; प्रका० श्री. व. वि. परांजपे, पु. रा. भिडे आणि कं., पुणें २; मूल्य १ रु. २ आ.

११. हिरवळ व रस्ता— ले० श्री. रं. कृ. चिंचलीकर; प्रका० रा. ना. सापळे, रामकृष्ण प्रकाशन मंडळ, मुंबअी ४; मूल्य १। रु.

१२. लोकहितवादींचीं शतपत्रें— संपा० श्री. श्री. रा. टिकेकर; प्रका० श्री. व. श्री. सातवळेकर, अुषाप्रकाशन, औंध (सातारा); मूल्य ३ रु.

१३. आनंदीबाअी पेशवे— ले० व प्रका० श्री. चिं. ग. कर्वे, २०४ सदाशिव, पुणें २; मूल्य ६ आणे.

१४. ज्वाला— ले० माधव मनोहर; प्रका० श्री. व. श्री. सातवळेकर, अुषाप्रकाशन, औंध (सातारा); मूल्य १॥ रु.

१५. पिंजऱ्यांतील पक्षी— ले० श्री. भ. दि. गांगल; प्रका० अेफ्. बाबूराव आगशी-कर; मूल्य १॥ रु.

१६. आदिमाया— ले० प्रो. त्र्यं. रा. वनमाली; प्रका० श्री. पु. आ. चित्रे, 'जीवनसाहित्य', बडोदें.

१७. श्रुतिगुण-नाटिका— (Redio-Drama) ले० श्री. शं. ब. तळेकर; प्रका० गोडबोले आणि गोडबोले, २६५ बुधवार, पुणें शहर; मूल्य २ रु.

१८. फडक्यांच्या शब्दांत फडके— संपा० श्री. आ. ना. नारळकर व श्री. कृ. ग. भागवत; प्रका० श्री. व. वि. परांजपे, पु. रा. भिडे आणि कंपनी, लक्ष्मी रोड, पुणें २; मूल्य १२ आणे

१९. राष्ट्रपति आझाद— ले० श्री. हरि मोरेश्वर जोशी; प्रका० श्री. शं. न. जोशी; चित्रशाळा प्रेस, पुणें २; मूल्य १२ आणे.

———

# रत्नागिरी येथे भरलेल्या २४ व्या म. सा. संमेलनांत मान्य झालेले ठराव

ठराव १— मिरज (थोरली पाती) या संस्थानचे वयोवृद्ध आणि ज्ञानवृद्ध राजे श्रीमंत सर गंगाधरराव अुर्फ बाळासाहेब पटवर्धन, के. सी. आय. ई., यांना मिरज येथे सोमवारीं (११।१२।३९) देवाज्ञा झाली याबद्दल या सभेस अत्यंत दुःख होत आहे. श्रीमंत राजे बाळासाहेब पटवर्धन हे मोठे साहित्यप्रेमी आणि कीर्तनसंस्थाभिमानी असून ज्ञानाभिवृद्ध्यर्थ त्यांनी अनेक ग्रंथ आणि शाळा अित्यादिकांना आर्थिक साहाय्य केलें होतें. ते स्वतः नीतिवलोत्साह-वर्धक, विद्वत्वप्रचुर आणि वक्तृत्वयुक्त कीर्तनें करीत आणि १९२५ सालीं मुंबअी येथे झालेल्या म. सा. संमेलनाचें अध्यक्षस्थान त्यांनी भूषित केलें होतें. त्यांच्या निधनाने त्यांच्या प्रजाजनांस आणि आप्तेष्टमित्रांस होणाऱ्या दुःखांत हें संमेलन सहभागी आहे.

ठराव २– जळगांव येथील १९३६ या वर्षी भरलेल्या म. सा. संमेलनाचे अध्यक्ष, म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे सदस्य व माजी चिटणीस आणि म. सा. पत्रिकेचे माजी संपादक डॉ. माधवराव पटवर्धन यांच्या ता. २९।११।३९ या दिवशीं झालेल्या शोचनीय मृत्यूमुळे या संमेलनास अत्यंत दुःख होत आहे. प्रतिभावान् कवि, रसिक आणि मार्मिक टीकाकार, चिकित्सक आणि मूलग्राही छंदःशास्त्रज्ञ, परिश्रमी आणि व्युत्पन्न कोशकार, फारशी भाषेचे पारंगत अभ्यासक, मराठी भाषेचे निःसीम अभिमानी, प्रेमळ आणि व्यासंगी प्राध्यापक, समंजस व निर्भय समाजसुधारक आणि तेजस्वी व सच्छील व्यक्ति या नात्यांनी डॉ. माधवराव, पटवर्धन यांची योग्यता थोर होती. अशा थोर व्यक्तीच्या अकालीं निधनाने मराठी भाषेची, वाङ्मयाची आणि अखिल महाराष्ट्रीय जनतेची अपरिमित हानि झाली आहे.

ठराव ३— (१) श्री. दुर्गाप्रसाद आसाराम तिवारी, (२) श्री. वामनशास्त्री किंजवडेकर, (३) श्री. गणेशशास्त्री फाटक, (४) श्री. सदाशिवशास्त्री भिडे, (५) श्री. अप्पाजी धुंडिराज मुर्तुले अुर्फ कवि 'सुमंत', (६) श्री. महादेव राजाराम बोडस, (७) श्री. गोविंद पांडुरंग पावशे, (८) श्री. केशवराव छापखाने, (९) श्री. द्वारकानाथ गोविंद वैद्य, (१०) डॉ. मालचंद्र सीताराम सुकथनकर, (११) श्री. नानासाहेब सरपोतदार, (१२) श्री. सीतारामपंत बाबाजी गुर्जर, (१३) श्री. पु. वा. फाटक, (१४) श्री. श्रीकृष्ण विठ्ठल आठल्ये वगैरे जे साहित्यभक्त व साहित्यसेवक कालवश झाले त्यांच्या निधनाबद्दल या संमेलनास अतिशय दुःख होत आहे.

ठराव ४— स्वभाषेच्या द्वारा शिक्षण देण्याकरितां आणि स्वभाषेच्या अभ्यासास अुत्तेजन देण्याकरिता प्रो. कर्वे यांनी स्थापिलेल्या व अुदारधी सर विठ्ठलदास ठाकरसी यांनी पुरस्कारिलेल्या 'श्रीमती नाथीबाअी दामोदर ठाकरसी' या विद्यापीठास सरकारी सनद देण्याची हिंदुस्थान सरकाराकडे शिफारस करून आणि यापुढे शक्य तें अधिक आर्थिक साहाय्य देअून विद्यापीठाच्या प्रगतीस आणि परंपरेने स्त्रीशिक्षण व देशी भाषा यांच्याहि प्रगतीस हातभार लावावा अशी या संमेलनाची मुंबअी सरकारास विनंती आहे.

अनुक्रमणिका

ठराव ५— महाराष्ट्र साहित्य संमेलनाची हिंदुस्थान सरकारास अशी आग्रहाची आणि निकडीची सूचना आहे की, महाराष्ट्र देशाचा विस्तार, संस्कृति आणि वैशिष्ट्य हीं लक्षांत घेअून हिंदुस्थान सरकारने पुणें व नागपूर येथे अेकेक स्वतंत्र नभोवाणी केंद्र स्थापन करण्याची त्वरा करावी. मद्रास अिलाख्यांत ज्याप्रमाणे तामील प्रांताकरिता त्रिचनापल्ली येथे किंवा पूर्वबंगाल-मध्ये डाक्का येथे स्वतंत्र नभोवाणी केंद्रें स्थापन करण्याला हिंदुस्थान सरकार तयार झालें आहे, त्याप्रमाणे पुणें व नागपूर येथेहि तशी व्यवस्था करणें हें न्याय्य आणि अिष्ट होअील असें या संमेलनाचें मत आहे.

ठराव ६— (अ) मराठी भाषेंत प्रसिद्ध होणाऱ्या आणि प्रांतिक सरकारांकडे द्यावयाच्या प्रत्येक पुस्तकाच्या प्रतींपैकी अेकेक प्रत अेखाद्या मध्यवर्ती ग्रंथालयांत विनामूल्य सार्वजनिक अुपयोगाकरितां ठेवण्याची सरकारने व्यवस्था करावी अशी या संमेलनाची प्रांतिक सरकारास विनंती आहे.

(आ) जर सरकाराकडे येणाऱ्या पुस्तकांच्या प्रतींपैकीं प्रत सरकारास देतां येत नसेल तर अशीं पुस्तकें विकत घेअूनहि वरील व्यवस्था करावी.

(अि) याशिवाय प्रांतिक सरकाराच्या संग्रहीं जीं जीं पुस्तकें पडून असतील तीं तीं पुस्तकेंहि वर सुचविलेल्या मध्यवर्ती ग्रंथालयांत ठेवावींत.

ठराव ७— कर्नाटकाच्या अेकीकरणाचा जो ठराव मुंबअी प्रांताच्या कायदेमंडळांत मान्य करण्यांत आला आहे त्याच्या अंमलबजावणीच्या वेळीं कर्नाटकाच्या सीमा ठरवितांना सरकारने खालील सूचना अवश्य ध्यानांत घ्याव्या अशी या संमेलनाची सरकारास विनंती आहे.

(१) प्रांताची सीमा ठरवितांना खेडें हें परिमाण ठरविण्यांत यावें. कोणतें खेडें कोणत्या भाषेच्या प्रांतांत समाविष्ट करण्यांत यावें याचा निर्णय त्या त्या खेड्यांतील प्रौढ रहिवाशांचीं मतें गुप्त मतदान पद्धतीने मागवून करण्यांत यावा.

(२) बेळगांव, कारवार व धारवाड या तीन्ही जिल्ह्यांतील जीं खेडीं व शहरें मराठी बोलणाऱ्या बहुसंख्य लोकांचीं असतील तीं सर्व एकत्रित करून त्यांचा एक नवीन मराठी जिल्हा सिद्ध करावा आणि तो महाराष्ट्रांत समाविष्ट करण्यांत यावा. तसेंच विजापूर जिल्ह्यांतील अशीं मराठी खेडीं शेजारच्या मराठी जिल्ह्यास जोडण्यांत यावीं.

ठराव ८— महाराष्ट्र साहित्य परिषदेने पुरस्कारिलेल्या शुद्धलेखनपद्धतीचा स्वीकार नियतकालिकांनी, ग्रंथकारांनी, शिक्षणखात्याने व मुंबअी विद्यापीठाने त्वरित करावा अशी त्यांस या संमेलनाची आग्रहपूर्वक विनंती आहे.

ठराव ९— माजी कांग्रेस सरकारने जप्ती अुठविल्यामुळे कांही थोडें आक्षिप्त वाङ्मय प्रकाशांत येअूं शकलें हें पाहून संमेलन समाधान व्यक्त करीत आहे. परंतु अुरलेल्या आक्षिप्त वाङ्मयाचें त्वरित बंधमोचन करण्याबाबत अुदार धोरण चालू सरकाराने स्वीकारावें अशी या सरकारास आग्रहाची मागणी आहे.

ठराव १०— महाराष्ट्र साहित्य परिषद् ही साहित्यप्रांतांतील प्रतिनिधिक संस्था असल्याने शालेय अभ्यासक्रम, पुस्तकांची निवड वगैरे भाषाविषयक गोष्टींचा विचार करतांना विश्वविद्यालयाने व सरकाराने परिषदेचा अभिप्राय घ्यावा असें या संमेलनाचें मत आहे.

ठराव ११— महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या बैठकींतून इ. स. १९२१ सालापासून महाराष्ट्र विद्यापीठ स्थापिलें जावें अशा आशयाचे ठराव अनेकवार मान्य झालेले असूनहि आणि या कार्याविषयी जनतेचा जिव्हाळ्याचा पाठिंबा अनेक रीतींनी प्रकट झाला असूनहि अद्यापि सदर विद्यापीठाची स्थापना घडून आलेली नाही म्हणून या संमेलनाची मुंबअी सरकाराकडे पुन्हा अशी आग्रहाची मागणी आहे की यापुढे हा विषय निकडीचा समजून सरकाराने हें कार्य सिद्धीस न्यावें. तसेंच या कामीं जनतेने सर्व प्रकारें साहाय्य द्यावें व सहकार करावा.

ठराव १२—चित्रपटाच्या सेन्सॉर बोर्डावर (नियामक मंडळावर) महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फेचा अेक प्रतिनिधि सभासद म्हणून घेण्यांत यावा अशी मागणी संमेलनाने गेल्या वर्षी केली होती. या मागणीबद्दल सरकारने जी दिरंगाअी दाखविली त्याबद्दल या संमेलनास खेद होत असून, ह्या मागणीची त्वरित अंमलबजावणी व्हावी अशी या संमेलनाची सरकाराकडे मागणी आहे.

ठराव १३— निजाम संस्थानांतील प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षणक्रमांत मराठी भाषेचें जें शिक्षण दिलें जातें तें मराठी भाषेची परागति करणारें अपुरें व निरुपयोगी आहे; विशेषतः तें मराठवाडा विभागांतील (औरंगाबाद, बीड, अुस्मानाबाद अि. जिल्हे) मराठी भाषेची पिछेहाट करणारें आहे. हा प्रकार मराठी वाङ्मयास व साहित्यास अडथळा आणणारा आहे. तरी निजामी शिक्षणक्रमांत अुच्च शिक्षणापर्यंत मराठी भाषा मराठवाड्यापुरती तरी निदान प्रमुख म्हणून शिकविली जावी, अशी निजामीय शिक्षणमंत्र्यांकडे या संमेलनाची आग्रहाची आणि हक्काची मागणी आहे.

ठराव १४— प्रतिवर्षी प्रसिद्ध होणाऱ्या मराठी वाङ्मयाचें वर्गीकृत व पद्धतशीर समालोचन व आकडेवारी प्रसिद्ध होणें अगत्याचें आहे. पूर्वी सरकारतर्फे वाङ्मयसमालोचनाची प्रसिद्धि होत असे. तरी मुंबअी सरकारने पुन्हा हा अुपक्रम हाती घ्यावा अशी या संमेलनाची सरकारास शिफारस आहे.

ठराव १५— मराठी भाषेंतील अनेक जुन्या अप्रकाशित ग्रंथांच्या प्रकाशनासाठी, तसेंच प्रकाशित ग्रंथांच्या पाठशुद्ध आवृत्ति तयार करण्यासाठी अुपलब्ध हस्तलिखितांची समग्र यादी होणें अत्यंत अवश्य आहे. महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेर अशा हस्तलिखितांचे ठिकठिकाणीं बरेच संग्रह आहेत. समर्थ वाग्देवता मंदिर, धुळें व तंजावरची सरस्वती महाल लायब्ररी या संस्थांतर्फे त्यांच्या संग्रहांतील याद्या प्रकाशित झाल्या आहेत. त्याचप्रमाणे महाराष्ट्रांतील अितर संग्रहांच्या याद्या म. सा. परिषदेने तयार कराव्या आणि परदेशांतील अशा याद्या मागवून घ्याव्या की जेणेंकरून Catalogus Catalogorum सारखी मराठी हस्तलिखितांची बृहत्सूची तयार करणें शक्य होअील. यासंबंधी व्यवहार्य योजना तयार करण्यासाठी खालील समिति नेमण्यांत यावी व या समितीने म. सा. परिषदेला आपला अहवाल सादर करावा. अधिक सभासद स्वीकृत करून घेण्याचा अधिकार या समितीस देण्यात येत आहेः—

(१) श्री. शंकर श्रीकृष्ण देव, (२) श्रीमंत राजे बाळासाहेब प्रंतप्रतिनिधि, (३) श्री. पुरुषोत्तम मंगेश लाड.

ठराव १६— या संमेलनाचें असें मत आहे की मातृभाषेचें शिक्षण अद्यापि जेथे सक्तीचें झालेलें नाही तेथे तें तसें सक्तीचें करण्यांत यावें.

हें धोरण अंमलांत आणण्यासाठी अभ्यासक्रमाची आंखणी करतांना मराठी ही मातृभाषा असणाऱ्या विद्यार्थ्यांची मातृभाषेची परीक्षा स्वतंत्र राखावी आणि तींत अुत्तीर्ण होण्यासाठी आवश्यक गुणांचें किमान प्रमाण अितर विषयांच्या मानाने अधिकांत अधिक असावें.

मराठीचें शिक्षण चालणाऱ्या ठिकाणीं जेथे वरील धोरणाच्या दृष्टीने कांही उणीवा आढळतील त्यांची चौकशी करून त्या त्या ठिकाणीं वर नमूद केल्याप्रमाणे अंमल होईल अशी खटपट महाराष्ट्र साहित्य परिषदेने करावी.

**ठराव १७**— (अ) महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचें धोरण खाली लिहिल्याप्रमाणे असावें—

(१) पत्रिकेचें अेक प्रमुख कार्य मराठी ग्रंथांचीं परीक्षणें शक्य तितक्या लवकर देणें.

(२) तसेंच पत्रिकेचें दुसरें प्रमुख कार्य साहित्यविषयक व संशोधनात्मक लेख प्रसिद्ध करणें.

(३) कलम १ मधील कार्याच्या पूर्ततेसाठी प्रांतिक सरकारांनी प्रसिद्ध केलेल्या महत्त्वाच्या ग्रंथांच्या याद्या छापणें.

(आ) (१) साहित्यपत्रिका त्रैमासिक असावी.

(२) छपाअी व सजावट यांना बाध न येतां कमी खर्चांत जास्त पानें देण्यांत यावीं. या कामासाठी जाहिराती मिळविण्याची तजवीज करावी.

(३) ललित, काव्य, कला, अितिहास आणि शास्त्रीय व अितर वाङ्मय असे विभाग पाडून या प्रत्येक विभागाचा अधिकारी संपादक संपादक-मंडळांत घ्यावा व या प्रत्येक संपादकाने दर तिमाहींत प्रसिद्ध झालेल्या सर्व महत्त्वाच्या पुस्तकांचा परामर्श घेण्याची व्यवस्था स्वत: करावी अगर करवून घ्यावी.

(४) कोणत्याहि परीक्षणात्मक लेखावर परीक्षकांचीं नांवें प्रसिद्ध करूं नयेत.

(५) वैयक्तिक टीकेच्या स्वरूपाचा लेख 'पत्रिके'त घेअूं नये.

(६) लायब्रऱ्या व अितर सार्वजनिक संस्था आणि व्यक्ति यांच्यांत 'पत्रिके'चा प्रसार मोठ्या प्रमाणांत होण्याचे सर्व प्रकारचे प्रयत्न करण्यांत यावे.

**ठराव १८**— मॅट्रिक परीक्षेच्या अिंग्रजी प्रश्नपत्रिकेंत गेलीं दोन वर्षें मराठीचे सदोष नमुने घालण्यांत आले त्यायोगें मराठी भाषेची जी विटंबना मुंबअी विद्यापीठाकडून झाली आहे त्याबद्दल हें संमेलन मुंबअी विद्यापीठाचा निषेध करीत आहे. अशी मराठी भाषेची होणारी विटंबना तावडतोब थांबवावी अशी या संमेलनाची मुंबअी विद्यापीठास मागणी आहे.

**ठराव १९**-- महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या घटनेंतील नियम ३ (अी) अन्वयें मराठी भाषेचा कोश तयार करणें हें अेक महत्त्वाचें कर्तव्य आहे.. नुकत्याच श्री. दाते यांच्या कोश-मंडळाने अत्यंत परिश्रमपूर्वक महाराष्ट्र शब्दकोश तयार करण्याचा खाजगी प्रयत्न पुरा केला असल्यामुळे New English Dictionary सारख्या सर्वांगीण स्वरूपाचा कोश निर्माण करणें किती कष्टाचें काम आहे हें पटवून दिलें आहे. हें कार्य खासगी संस्थांनी करण्यापेक्षा म. सा. परिषदेमार्फत महाराष्ट्रांतील अखिल विद्वानांच्या व संस्थांच्या सहकार्याने होणें अवश्य आहे. अशा प्रकारें कांही वर्षें अखंड कार्य चालू ठेवून ज्ञानेश्वर, अेकनाथ, रामदास, वामन, तुकाराम मोरोपंत प्रभृतींच्या ग्रंथांच्या समग्र शब्दसूची तयार करून New English Dictionary प्रमाणेच हा कोश तयार झाला पाहिजे. यासंबंधी व्यवहार्य योजना तयार करण्याकरिता खालील विद्वानांची समिति नेमण्यांत यावी:—

(१) डॉ. कात्रे, (२) प्रो. कृ. पां. कुळकर्णी, (३) प्रो. धर्मानंद कोसंबी, (४) श्री. य. रा. दाते (निमंत्रक), (५) श्री. य. खु. देशपांडे, (६) श्री. पुं. म. लाड, (७) डॉ. भावे.

वरील समितीने आपला अहवाल म. सा. परिषदेस सादर करावा.

ठराव २०— मुंबअी येथील सरकारी चित्रकला शिक्षण-विद्यालय (Sir J. J. School of Arts) या संस्थेवरील मुख्याधिकाऱ्याच्या जागीं हिंदी कलावंताची नेमणूक करण्याची मागणी हिंदी कलावंतांकडून गेलीं कित्येक वर्षे केली जात असूनहि, अद्यापि त्या मागणीप्रमाणे सरकारने व्यवस्था केली नाही याबद्दल हें संमेलन मुंबअी सरकारचा निषेध करीत आहे. हिंदुस्थानांतील अितर सर्व चित्रकला नि अितर कला–विद्यालयें हिंदी कलावंतांच्या नेतृत्वाखाली चालू असतांनाहि, मुंबअीचे विद्यालयावर अद्यापि परकीय कलावंतच प्रमुखस्थानीं आहेत हें मुंबअी सरकारचें धोरण प्रतिगामी आहे असें या संमेलनाचें मत आहे. कारण त्यामुळे कला-साहित्यनिर्मितीस अवश्य तितका अवसर मिळत नाही. चित्रकला-विद्यालयें चालविण्याची पात्रता असलेले पहिल्या दर्जाचे हिंदी कलावंत मुंबअी अिलाख्यांत आहेत, याची जाणीव ठेवून मुंबअी सरकारने त्या संस्थेचें हिंदीकरण शक्य तितक्या लौकर करावें अशी या संमेलनाची मागणी आहे.

ठराव २१— ह्या संमेलनाचें असें मत आहे की महाराष्ट्रांतील साहित्यिक संस्थांनी महाराष्ट्र ज्ञानकोशाचें काम चालू ठेवण्यासाठी अुपाययोजना करावी. तसेंच आतापर्यंत निर्माण झालेल्या व पुढे होणाऱ्या अेकंदर मराठी साहित्याची अेक समीक्षणसूची तयार करून तीहि पुढे चालू ठेवावी. यासंबंधी श्री. राम गोगटे यांनी अेक योजना तयार करून ती संमेलनापुढे सादर करण्याकरिता परिषदेकडे सादर करावी.

ठराव २२— गेल्या वर्षी संमेलनांत 'बालवाङ्मया'संबंधी जो ठराव संमेलनाने केला आहे त्यांत एक समिति नेमण्यांत आली होती. गतवर्षी कांही कारणाने समितीचें कार्य होअूं शकलें नाही.

या वर्षी त्याच ठरावांतील मूलभूत तत्त्वें मान्य करून खालील दुसरी लहान व सुटसुटीत समिति हें संमेलन नेमीत आहे व वेळोवेळीं जरूरीप्रमाणे स्वीकृत सभासद करून घेण्याची या समितीस परवानगी देत आहे:—

(१) श्री. ताराबाअी मोडक (अध्यक्ष), (२) श्री. गोपीनाथ तळवळकर, (३) प्रो. श्री. बा. रानडे, (४) श्री. पा. ना. मिसाळ, (५) श्री. पालवणकर, (६) श्री. गं. दे. खानोलकर, (७) श्री. देवदत्त नारायण टिळक, (८) कु. माअी वरेरकर (आमंत्रक).

ठराव २३— महाराष्ट्र नाट्यकला व रंगभूमि यांचा शताब्दिमहोत्सव १९४३ सालीं रंगभूमीचें अुगमस्थान सांगली येथे व अखिल महाराष्ट्रांत अितरत्र शक्य होअील तेथे, या अपूर्व प्रसंगास साजेशा रीतीने साजरा केला जावा अशी या संमेलनाची अुत्कट अिच्छा आहे. या अुत्सवासंबंधीची योजना सहा महिन्यांच्या आंत तयार करण्यांत येअून ती प्रसिद्ध करण्यांत यावी अशी महाराष्ट्र नाट्यसंमेलनास या संमेलनाची विनंती आहे.

ठराव २४— सर्वमान्य अशा मराठी लघुलिपीच्या अभावीं बातमीदारांचें व लेखकांचें काम सुकर होत नाही असा अनुभव आहे. मराठी लघुलिपीची निर्दोष व यशस्वी योजना सिद्धीस न्यावी म्हणून आजवर श्री. भुजंगराव मानकर, श्री. विनायकराव नाफडे, श्री. वासुदेवराव वैद्य आणि कै. दावके अित्यादींनी केलेले प्रयोग अभिनंदनीय व आशादायक ठरले आहेत हें लक्ष्यांत घेअून कार्याची पुढील प्रगति कुंठित होअूं नये म्हणून हें संमेलन म.सा.परिषदेस विनंती करीत आहे की परिषदेने पूर्वी झालेली प्रगति विचारांत घेअून मराठी लघुलिपीची अेखादी

सर्वमान्य योजना तयार करून तिचा प्रचार सर्वत्र करण्याची खटपट करावी. अशी योजना सिद्ध करण्यास साह्यभूत म्हणून खालील गृहस्थ अुपसमितींत राहावे आणि जरूरीप्रमाणे आणखी तीन पावेतो सभासद जोडून घेण्याचा वरील अुपसमितीस अधिकार देण्यांत यावा. साहित्य परिषदेने अेका वर्षाच्या आंत अुपर्युक्त स्वरूपाची योजना तयार करून ती पुढील संमेलनास सादर करावी अशी विनंती आहे—

(१) श्री. भुजंगराव मानकर, (२) श्री. विनायक दत्तात्रेय नाफड, (३) श्री. भा. वि. वरेरकर (निमंत्रक), (४) श्री. काका कालेलकर, (५) श्री. द. वा. पोतदार.

**ठराव २५**—— दक्षिणी संस्थान साहित्य सभा, सांगली ही शाखासभा आणि साहित्य-सेवामंडळ, सोलापूर ही संलग्न संस्था अशा दोन संस्थांकडून पुढील संमेलनासाठी निमंत्रणें आलीं आहेत या निमंत्रणांबद्दल हें संमेलन या अुभय संस्थांचे आभार मानीत आहे. सांगलीकरांकडून पूर्वी अेक वेळ संमेलनास आमंत्रण आलें होतें. त्यामुळे त्यांच्याकडे या प्रकरणीं वडीलकीचा मान जातो हें खरें; तथापि सोलापूर बाजूकडील मराठीच्या संरक्षणाबाबतची परिस्थिति व निकड विचारांत घेतां वरील दोन्ही आमंत्रणांपैकी सोलापूर येथील आमंत्रण हें संमेलन स्वीकारीत आहे आणि त्याच वेळीं सांगलीकरांस प्रेमाने पुढील विनंती करीत आहे की त्यांनी संमेलनावरील आपला लोभ बिलकूल अुणावूं देअूं नये आणि योग्य समयीं शिलकी निमंत्रण मान्य करून घ्यावें.

———

[ म. सा. प. अङ्क ५४, पृ. १५८ वरून पुढे चालू. ]

याशिवाय फिल्मचें संकलन करणारे संपादक, ट्रायलसाठी थिअेटर ऑपरेटर, जाहिरातीसाठी फोटो घेणारा अेक साधा स्थिर चित्रलेखक, लहान चित्रांवरून मोठीं चित्रें तयार करणारा पोस्टर पेन्टर वगैरे अितर कामगार असतात.

अेवढा कामगारांचा संच जमला की, दिग्दर्शकाच्या देखरेखीखाली चित्रपटांतील संवादांच्या तालमी सुरू होतात. सर्व नटनटींना त्यांच्या संवादांचा अगोदर परिचय करून देण्याचें काम या तालमींनी साधतें. हल्ली आपल्याकडील कांही स्टूडिओंतून आविर्भाव नाटकी होअूं नयेत म्हणून तालमी घेण्याचें अजीबात बंद करण्यांत आलें आहे. पण त्यापासून म्हणण्यासारखा फायदा होण्याअैवजी तोटाच झालेला दिसून येतो. तालमी घेतांना थोडीशी जास्त काळजी घेतली तर त्या फायदेशीरच ठरतात. ज्या दिवाणखान्यांत तालमी घ्यावयाच्या तेथेच सेटिंगची साधारण कल्पना येअील अशा रीतीने रेघा आंखून घेतल्या तर अैन शूटिंगच्या वेळीं होणारा बराचसा त्रास वांचतो असा परदेशी लोकांचा अनुभव आहे. याच वेळीं हावभावांचें नाही, तरी शब्दोच्चारांचें पूर्ण शिक्षण देतां येतें. आणि हें शिक्षण देतांदेतांच कॅमेऱ्याचा दृष्टिकोनही ठरवितां येतो.

यापुढील सर्व कामें करण्यासाठी चित्रमंदिराची जरुरी असते. चित्रमंदिर (Studio) म्हणजे साधारणतः साठ फूट रुंद, शंभर फूट लांब, आणि तीस फूट अुंच अशी अेक कोठडीच असते. तिच्या वर खालीं पंखे लावून हवा खेळत ठेवलेली असते पण अुजेडासाठी मात्र विजेच्या दिव्यांचा अुपयोग करतात. हीं चित्रमंदिरें आवाजापासून सुरक्षित असलीं तर फारच अुत्तम. हिंदुस्थानांत फार थोड्या ठिकाणीं साअुंडप्रुफ स्टूडिओ आहेत. या साअुंडप्रुफ स्टूडिओंत मुख्य अिमारतीच्या भिंतीच्या आंत दुसरी अेक खोटी भिंत असते. या दोन भिंतींच्या दरम्यान न हालणाऱ्या हवेचा (dead air) थर असतो. शिवाय बाहेरील बाजूने यांचा पृष्ठभाग अितका स्वच्छ आणि गुळगुळित असतो की बाहेरील ध्वनींच्या लहरी बाहेरच्या बाहेरच परतून लावल्या जातात. आंतील आवाजाच्या सुरक्षिततेसाठी निघालेली प्रत्येक लहर आंतल्या आंतच दूरवर विरून जाणें श्रेयस्कर असतें. आणि म्हणून कोठे कोठे पडदे, फ्लॅनेल, लोकर असले पदार्थ लावून त्या लहरी विरवून टाकल्या जातात. मग प्रतिध्वनि किंवा असल्याच अितर गोष्टींचा त्रास होत नाही.

चित्रीकरणासाठी ज्या दिव्यांचा अुपयोग करतात त्यांचे तीन प्रकार आहेत.

आकाराने साधारण अर्धगोलाकार होल्डरमध्ये बसविलेला दिवा असला म्हणजे त्यांतून फेकला जाणारा प्रकाश सर्वत्र पसरून पडतो. अशा दिव्याला डिफ्यूझर म्हणतात. प्रकाश याहून जास्त पसरावा अशी अिच्छा असेल तर दिव्यासमोर जाळी किंवा घासलेली काच ठेवतात. सिलिंडरच्या आकाराच्या होल्डरमध्ये अेका बाजूस दिवा दिव्याच्या मागे परावर्तक आरसा आणि पुढच्या बाजूस मोठें भिंग असलेला दिवा कन्डेन्सर या नांवाने ओळखला जातो. याचा प्रकाश नेमका पाहिजे तेथे झणझणीतसा पाडतां येतो. तसें करण्यासाठी आरसा अथवा दिवा मागे पुढें करण्याची यांत सोय असते. स्पॉट लाअिट हा सुद्धा कन्डेन्सरसारखाच असतो. परंतु यांत भिंग नसतें. याचाहि प्रकाश अेका ठराविक भागावरच पाडतां येतो.

यांपैकी पाहिजेत तसे दिवे अेकत्र जोडून टॉप लाअिटस् बनवितात आणि ते छताला बांधून वरून पाहिजे तशी रचना करितात. हे सर्व दिवे खाली वर आणि दोन्ही बाजूंस हलवितां येतील अशा रीतीने स्टँडला अडकविलेले असतात. आणि या स्टँड्स्ना खाली चाकें असतात त्यांमुळे दिवा वाटेल तेथे नेतां येतो. या दिव्यांची कँड्ल् पॉवर पांचशेपासून दहा हजारपर्यंत असते.

चित्रमंदिराच्या बाहेर करावयाच्या चित्रीकरणासाठी सूर्यप्रकाशाचाच अुपयोग करितात. निरनिराळ्या ठिकाणीं आरसे आणि शिशयाचे चकाकणारे पत्रे लावून केलेले रिफ्लेक्टर्स यांचा तेथे अुपयोग होतो.

— ६ —

चित्रीकरणाची सर्व तयारी झाली. आता चित्रीकरण सुरू करावयाचें. नेहमीची रीत म्हणजे दिग्दर्शनसहायकाने पुढील प्रकारचें दुसऱ्या दिवशींच्या कार्यक्रमाबद्दलचें अेक आज्ञापत्रक अगोदरच्या दिवशीं काढावयाचें.

आज्ञापत्रक

| | |
|---|---|
| चित्रपटाचें नांव : गुलाबाचें फूल. | स्थलनिर्देश : स्थलक्रमांक ७. |
| भाषा : मराठी. | कालनिर्देश : सकाळीं ८ वाजतां. |
| तारीख : १·१·१९४०. | मेकअप्‌ची वेळ : ७ वाजतां. |

खालील लोकांनीं मेकप् करावा.

तो : श्री. नाअीक.

ती : कु. तारा.

रस्त्यावरील गर्दीसाठी सुमारें पंचवीस लोक.

| | |
|---|---|
| अितर | सूचना |
| कॅमेरा खातें, वायरमेन. | |
| साअुंड रेकॉर्डिंग खातें. | |
| मेकअप् खातें, सेटिंग. | सेटवरील सामान. |
| कपडेखातें. | यादीप्रमाणे तयार ठेवणें. |
| सही— व्यवस्थापक. | सही— अ. डायरेक्टर. |

हें आज्ञापत्रक निघण्याच्या अगोदर अर्थातच सात नंबरच्या स्थलाची म्हणजे रस्त्याची पूर्ण अुभारणी झालेली असते. आणि आज्ञापत्रकाबरहुकूम सर्व तयारी जय्यत असते.

चित्रीकरण ज्यावर होतें ती फिल्म सेल्युलॉअिडची तयार केलेली असते. ही सुमारें १$\frac{3}{8}$" रुंद असून तिचे अेक अेक हजार फूट लांबीचे गुंडाळे ( Rolls ) करून डब्यांत बंद केलेले असतात. डब्यांत भरण्यापूर्वी तिच्या अेका बाजूवर अिमल्शनचा अेक थर चढविलेला असतो. अिमल्शन् म्हणजे सिल्व्हर् नायट्रेट, पोटेशियम् ब्रोमाअिड्, जिलेटिन् व गरम पाणी यांचें मिश्रण होय. या मिश्रणांत सिल्व्हर् ब्रोमाअिड् हा पदार्थ तयार होअून राहतो. या सिल्व्हर ब्रोमाअिडला प्रकाशाचें दर्शन झाल्याबरोबर अशी अेक शक्ति येते की पुढे डेव्हेलप् केल्यानंतर त्यांतील सिल्व्हरचा भाग काळा होअून सेल्युलॉअिडला चिकटून राहतो. ही गोष्ट सांगावयास आणि समजावयास सोपी असली, तरी असल्या प्रकारची सारख्या घनतेची आणि

अेकाच गुणांचा रासायनिक थर तीवर बसवलेली फिल्म तयार करणें ही अतिशय खर्चाची आणि कठिणतम गोष्ट आहे. असली फिल्म करण्यासाठी लागणाऱ्या कारखान्यांतील माल, यंत्रें आणि सरतेशेवटीं विशिष्ट ठराविक अुष्णतामान पाहिजे तेव्हा पाहिजे तसें कायम ठेवतां येअील अशी मोठी थोरली अिमारत, या फार खर्चाच्या गोष्टी आहेत. हल्ली कोडॅक आणि आग्फा हीं दोन या प्रकारच्या फिल्म्स् तयार करणाऱ्या कंपन्यांचीं नांवें सर्वश्रुत आहेत. चित्रीकरणासाठी वापरण्यांत येणाऱ्या या फिल्मूला रॉ निगेटिव्ह् म्हणतात. छायालेखन आणि ध्वनिलेखन झाल्यानंतर ती अेक्स्पोज्ड् निगेटिव्ह होते. अेक्स्पोज्ड् निगेटिव्हवर डेव्हेल-पिंगची रासायनिक क्रिया झाली म्हणजे तिच्यावरील अदृश्य चित्र दृश्य स्वरूपांत येतें. डिव्हेलपर म्हणचे पायूरो, क्विनोल्, मेटॉल् यांसारखा अेक पदार्थ आणि अेक अल्कली यांचें मिश्रण होय. दृश्य चित्र त्याच स्वरूपांत टिकून राहावें म्हणून त्याच्यावर सोडियम हायपो-सल्फाअिट (हायपो)ची क्रिया करतात. या क्रियेने निगेटिव्हमधील जेवढ्या भागावर प्रकाशाची क्रिया घडली नसेल तेवढ्या भागावरील सिल्व्हरब्रोमाअिड्चें सिल्व्हर सोडियम् थायोसल्फेट् होतें; आणि तें पाण्याबरोबर विरघळल्यामुळे वाहून जातें. नको त्या ठिकाणीं फिल्मवर प्रकाशाचा परिणाम झाला तर ती धूसर होते म्हणून अून असलेल्या जागेंत, छिद्र असलेल्या डब्यांत ती कधीहि ठेवीत नाहीत. प्रकाश लागल्याने मूळची पिंवळसर फिल्म् हळुहळू निळी होत जाते. वर म्हटलेंच आहे की फिल्मूला जेथे प्रकाश लागेल तेवढा भाग काळा होतो. स्वाभाविकच यामुळे जेथे वास्तविक प्रकाश तेथे फिल्मवर काळा भाग आणि छाया तेथे फिल्मवरील चित्रांत पांढरा भाग असतो म्हणून हिला निगेटिव्ह म्हणतात.

फिल्मवरील प्रत्येक चौकट फक्त ३/४ अिंच अुंच असते. रुंदीचे दोन विभाग असतात. त्यापैकीं ७/८ चित्रासाठी असतो आणि १/८ ध्वनीसाठी असतो. प्रत्येक लहान चित्र संख्या-बरोबर १/८ अिंच जाडीची अेक विभाग करणारी रेषा असते. फिल्मच्या दोन्ही बाजूंस सारख्या अंतरावर प्रत्येक चित्राच्या बरोबर चार याप्रमाणे भोकें पाडलेलीं असतात. यांना परफोरेशन्स् म्हणतात. छायालेखनासाठी आणि ध्वनिलेखनासाठी निरनिराळी निगेटिव्ह् वापरतात.

छायालेखनाचें यंत्र म्हणजे कॅमेरा आणि त्यांतली मुख्य चीज 'लेन्स'. जो देखावा चित्रित करावयाचा असेल त्याची अुलटी प्रतिमा या लेन्सच्या साहाय्याने फिल्मवर पडते. केवढ्या आकाराचें चित्र असावें हें चित्रकथेमध्ये ठरलेलें असतेंच. तेवढ्या आकाराचें तें आहे किंवा नाही हें कॅमेऱ्याच्या व्ह्यू फाअिंडरमध्ये दिसतें. अन्अेक्स्पोज्ड् रॉ निगेटिव्ह कॅमेऱ्यावर बस-विलेल्या अेका दोन कप्प्यांच्या डब्यांतील अेका कप्प्यांत असते. चित्रीकरणास सुरवात झाली म्हणजे ही अन्अेक्स्पोज्ड् रॉ फिल्म कॅमेऱ्यांतील मोटारचे साहाय्याने फिरूं लागते. आणि अेक्स्पोझ झाल्यावर दुसऱ्या कप्प्यांत जाते. या दोन कप्प्यांच्या डब्याला मॅगेझिन् (Magazine) असें म्हणतात. या डब्याच्या कप्प्यांतून येणाऱ्या फिल्मच्या सच्छिद्र कडा दांतेरी चाकांत अडकविलेल्या असतात. आणि तें चाक हळुहळू सारख्या गतीने फिरत असतें. यामुळे फिल्म हळुहळू पुढे ओढली जाते. फिल्मूवरील चित्रीकरण ज्या दरवाजांत (Gate) चालू असतें त्याच्या समोर अेक पंखा असतो. या पंख्याची रचना मधून मधून फिरणाऱ्या दांत्याच्या चाकाशीं अशा रीतीने जुळविलेली असते की चाक फिरूं लागलें की पंख्याचें पातें दरवाज्यासमोर यावें आणि दरवाजा बंद व्हावा, आणि चाक फिरण्याचें थांबलें की पातें निघून जाअून दरवाजा अुघडा राहावा. अशा रीतीने अेक्स्पोज्ड् फिल्म् दुसऱ्या कप्प्यांत ओढली जाते आणि अन् अेक्स्पोज्ड् फिल्म् दरवाज्यासमोर येअून अुभी राहते. असें सारखें चालू राहिलें म्हणजे अेका सेकंदांत २४ प्रतिमा

चितारल्या जातात. प्रत्येक प्रतिमेवर प्रकाशाचा परिणाम फक्त $\frac{१}{४८}$ सेकंदच होतो. फिल्मची गति दर सेकंदास २४ प्रतिमा ही सर्व जगांत ठरून गेलेली आहे. कॅमेऱ्यांत निरनिराळ्या कामांसाठी जवळून किंवा दुरून वापरण्यासाठी निरनिराळ्या प्रकारचीं लेन्सेस् जोडण्याची सोय केलेली असते. किती अंतरावर चित्र स्पष्ट दिसेल हें देखील कॅमेऱ्यावर खुणा करून दाखविलेलें असतें.

ही सर्व सामग्री अर्थातच अेका पेटींत बसविलेली असते. ही पेटी सर्व बाजूंनी फ्लॅनेल, रबर वगैरे घालून आवाज बाहेर येअूं नये अशा रीतीनें बंद केलेली असते. मॅगॅझिनच्या चाकांचा आवाज येअूं नये म्हणून त्याच्यावर जी गादीची पिशवी घालतात तिला ब्लिंप म्हण-तात. कॅमेऱ्याचा आवाज बाहेर येअूं नये अशी व्यवस्था करणें बोलपटांच्या काळांत अतिशय अवश्यक असतें. नाही तर कॅमेऱ्याचा आवाजच रेकार्ड होतो !

कॅमेरा ठेवण्यासाठी अक युनिव्हर्सल जॉअिंटचा स्टॅंड असतो. त्यांत कॅमेरा घट्ट अडक-विला म्हणजे कॅमेऱ्याला असलेल्या हँड्ल्च्या साहाय्याने तो वाटेल तसा फिरवितां येतो. या युनिव्हर्सल स्टॅंडवर कॅमेरा ठेवूनच पॅनिंग, टिल्टिंग किंवा फॉलो शॉट घेतात. त्याशिवाय कॅमेरा ट्रॉलींत ठेवणें आणि कधी कधी क्रेनमध्यें अडकविणेंहि जरूर पडतेच.

शूटिंगच्या सुरुवातीस दिग्दर्शक कॅमेरामनला आपल्या दृष्टिकोनाची साधारण कल्पना देतो. त्यावरून आपला कॅमेरा योग्य तेथे ठेवून तो प्रकाश आणि छाया यांची रचना करतो. यांतच कॅमेरामनचें सारें कसब असतें. शिवाय रात्रीचा किंवा दिवसाचा देखावा असेल तर कॅमेऱ्याचें लेन्स कितपत अुघडें ठेवावयाचें हेंहि अेक महत्त्वाचें अंग असतें. आपलें काम झालें म्हणजे कॅमेरामन तें दिग्दर्शकाला दाखवितो आणि तें त्याला पसंत पडलें म्हणजे झालें.

यानंतर दिग्दर्शक पात्रांकडून अेकदोन वेळां तालीम करवितो. या वेळीं पात्रांची हालचाल कॅमेऱ्याच्या क्षेत्राच्या बाहेर कोठें जात नाही वगैरे पाहून घेतात. यानंतर नटनटींच्या चेहऱ्यावर आविर्भाव कसकसे केले गेले पाहिजेत त्याचें दिग्दर्शन दिग्दर्शक करतो. कोणते शब्द किती जोराने कोठे बोलावयाचे, कुणीकडे किती तिरप्या नजरेने बघावयाचें, या सगळ्या गोष्टी तोच ठरवितो. आणि तें सर्व ठरलें म्हणजे साअुंड रेकॉर्डिस्टचें काम सुरु होतें. पात्रांनी म्हटलेले संवाद, नव्हे केलेला प्रत्येक ध्वनि, त्याला चित्रित करावयाचा असतो..

रेकॉर्डिंगसाठी अैन सेटवर अेक खूपच मोठा तीनचाकी स्टॅंड असतो. त्याला बूम म्हणतात. या स्टॅंडच्या मधोमध अेक अुभा खांब असतो आणि त्या खांबाला काटकोन करून अेक नळी अडकविलेली असते. ही नळी हात पुरेल अशा अुंचीवर ठेवलेल्या दोन तीन चाकांच्या साहाय्याने मागें, पुढे; या बाजूला, त्या बाजूला अशी फिरवितां तर येतेच पण वरखालीहि अुचलतां येते. तिच्या दुसऱ्या टोकाला मायक्रोफोन हें आवाजाच्या लहरी ग्रहण करतां येणारें यंत्र अडकविलेलें असतें. आवाजाच्या लहरींमुळे त्याला अडकविलेल्या विजेच्या तारांतून प्रवाह सुरू होतो. हा विद्युत्संचय किती प्रमाणांत घ्यावयाचा तें कायम करण्यासाठी मिक्सर हा यंत्राचा दुसरा भाग अेका काचेच्या बंद खोलींत (Booth) ठेवलेला असतो. ही बंद खोली सेटवरच असते. मिक्सरमधून हा विद्युत्प्रवाह ॲम्प्लिफायरमध्ये जातो. येथे त्याची वाढ होते. आणि नंतर तो फिल्मवर रेकॉर्ड होतो. पण फिल्मवर जाण्यापूर्वी तो तेथे कसा काय जातो आहे तें अैकण्यासाठी याच ठिकाणीं अेक ध्वनिक्षेपक (लाअुडस्पीकर) जोडलेला असतो. त्यांतून तो

अैकूं येतो. फिल्मवर रेकॉर्ड होण्यासाठी हा विद्युत्संचय कांही पद्धतींत अेका दिव्याला जोडलेला असतो. ज्या मानाने आवाज कमीजास्त असेल त्या मानाने दिवा कमीजास्त प्रकाशमान होतो आणि त्याच्या समोर असलेल्या फटींतून (slit) कमी किंवा अधिक जोराचा प्रकाश फिल्मवर पडतो. या फटीशीं रॉ साअुंड निगेटिव्ह चिकटून ठेवलेली असते. कांही पद्धतींत विद्युत्संदेश अेका गॅल्व्हानोमीटरला जोडतात. आणि या गॅल्व्हॅनोमीटरमध्ये बसवलेला आरसा विद्युत्संदेशाच्या धक्क्यांनी हलतो. त्या आरशावर मात्र अेका स्थिर दिव्याचा प्रकाश सारखा पडत असतो. त्यामुळे आरसा अेका बाजूला सरकला की त्याच्या समोर असलेल्या फटीच्या अेकाच बाजूने प्रकाश जातो व दुसऱ्या बाजूस अंधार राहतो. फार अधिक विद्युत्संदेश अेकदम आला तर मात्र दिवा किंवा गॅल्व्हॅनोमीटर जळून जाण्याचा संभव असतो. वर दिलेल्या दोन पद्धतींपैकी पहिलीस व्हेरिअेबल डेन्सिटी सिस्टिम असें म्हणतात. कारण या पद्धतीमुळे तयार झालेल्या फिल्मवर फटीच्या आकाराचे परंतु निरनिराळ्या घनतेचे चौकोन चित्रित केलेले असतात. दुसरीस व्हेरिअेबल् अेरिया सिस्टिम असें म्हणतात. कारण हींत अेकाच घनतेचे पण निरनिराळ्या आकाराचे पट्टे चित्रित केले जातात. मायक्रोफोन हलवून निरनिराळ्या जागीं ठेवून किंवा मायक्रोफोनमधून जास्त विद्युत्संचय घेअून किंवा अँप्लिफायरमध्ये कमी संदेश घेअून व नंतर वाढवून घेअून आवाज बरोबर येतो असें वाटलें म्हणजे रेकॉर्डिस्ट तयार असल्याचें शिंग फुंकतो.

यानंतर जणू आता चित्रीकरणच होणार अशा थाटाने अेक अखेरची तालीम होते. या तालमीच्या वेळीं कंटिन्युअिटी गर्ल शॉर्ट् हँडमध्ये चालू असलेल्या शॉट्चीं टिपणें घेते हीं टिपणें चित्रकथेपेक्षाहि जास्त सविस्तर असतात. कारण चित्रकथेंत केलेले फरक आणि अेडिटिंगसाठी टिपणें यांचाहि यांतच समावेश होतो. सुसंबद्धतेच्या दृष्टीने खालीलसारख्या गोष्टी फार महत्त्वाच्या असतात. त्यांची ती नोंद करून ठेवते.

(अ) ताअीने कोणत्या हाताने दरवाजा अुघडला?

(ब) बाबा आंत आले तेव्हा त्यांच्या तोंडांत सिगारेट होती की त्यांनी ती हातांत काढून घेतली होती की फेंकून दिली होती?

(क) ते आंत आले तेव्हा बाळ कोठे होता?

(ड) त्यांचा बाहेर जातांना पोशाख कोणता होता?

कारण ज्या वेळीं घराचा आंतील भाग मांडून तयार असतो त्या वेळीं चित्रकथेच्या सुरुवातीपासून शेवटपर्यंत घराच्या आंतील भागांत जें काय घडलें असेल त्या सर्वांचें चित्रीकरण करण्यांत येतें. अर्थात् घराच्या आंतून बाहेर पडणारी किंवा घरांत शिरणारी कोणतीहि व्यक्ति घरांत अेकदम शिरणें शक्य नाही. समग्र चित्रपटांत जर ती पांच वेळां घरांत शिरतांना दाखवली असेल तर दर वेळीं ती कोणत्या पोशाखांत आली याची नोंद ठेवावयास पाहिजे. आणि पुढे घराच्या बाहेरील भागाचें चित्रीकरण करतांना ती त्या त्या पोशाखांत पांच वेळां घरांत येतांना दाखविली पाहिजे; तरच गोष्टीची सुसंबद्धता ( Continuity ) कायम राहील.

चित्रीकरणास सुरुवात साअुंड रेकॉर्डिस्टकडून होते. त्याने आपल्या मोटरचा स्विच दिला की फिल्म फिरूं लागते आणि त्यानंतर अेक शिंग ( Horn ) वाजवून याची सूचना सेट्वरील सर्वांस दिली जाते. हें शिंग वाजतांच स्टूडिओच्या दरवाजांवर लाल दिवे लागतात

आणि त्याचा अर्थ "ध्वनिलेखन सुरू आहे. आवाज करूं नका" असा होतो. ही सूचना झाल्यावर कॅमेरामन कॅमेरा सुरू करतो आणि दोन्ही मोटर्स सुरू झाल्या की चित्रीकरण सुरू होतें.

असिस्टंट डायरेक्टरच्या हाताखाली आणखी अेक असिस्टंट असतो. त्याच्याजवळ अेक क्लॅपर असतो. हा क्लॅपर म्हणजे दोन लांकडी फळ्या अेका बिजागरीने अेकमेकांना अडकवून टाकलेल्या असतात अेवढेंच. त्यांतल्या अेका फळीला अेक पाटी अडकविलेली असते या पाटीवर त्या शॉट्चा क्रमांक लिहिलेला असतो. नांव, भाषा, तारीख व पहिला अंक सीनचा, दुसरा शॉटचा आणि तिसरा टेकचा असतो. शॉट घेतांना तो प्रथम बरोबरच येअील असें नाही. तो पुनः घेतला तर टेकचा आंकडा बदलतात. पुनः घेतला तरी तसेंच. T2, T3 असे अंक दिले जातात. हा नंबर रेकॉर्डिस्टला अगोदर कळवितात तो रेकॉर्डरचें दार अुघडून फिल्मवर तो लिहून ठेवतो. दोन्ही मोटर्स सुरू होतांच हा दुय्यम सहायक ती पाटी कॅमेऱ्यासमोर धरून क्लॅपरचा 'फट्' असा आवाज करतो. आणि कॅमेऱ्याच्या दृष्टिकोनाबाहेर निघून जातो. अशा रीतीने चित्राच्या सुरवातीस ही पाटी आणि आवाजाच्या सुरुवातीस फट् असा आवाज चित्रित होतो. त्या शॉट्साठी ठरलेली हालचाल संपतांच पुनः क्लॅपरचा आवाज करतात. या दोन 'फट्' मध्यें चित्रित होणारा भाग म्हणजे खरा शॉट् होय. असे शॉट्स अेका बोलपटांत सुमारें हजार असतात. हे सर्व जसजसे चित्रित होतात तसतसे लॅबोरेटरीकडे पाठविले जातात.

पूर्वी लॅबोरेटरीमध्ये मोठाल्या डिव्हलपिंग फ्रेम्स् असत पण अलीकडे ऑटोमॅटिक लॅबोरेटरी असते. लॅबोरेटरी अेका दुहेरी दरवाजाच्या आंत असलेल्या अंधेऱ्या खोलींत असते. अेकाआंत दुसरा दरवाजा असला म्हणजे अेक अुघडला तरी दुसरा बंद असल्यामुळे प्रकाशाला अटकाव होतो आणि पहिला बंद करून दुसरा अुघडला म्हणजे प्रकाशाला आंत कधीच रिघाव मिळत नाही. अशा अंधाऱ्या खोलींत अेकामागे अेक असे सहा हौद बांधलेले असतात. या प्रत्येक हौदाची खोली सुमारें तीन फूट, रुंदी तीन फूट आणि लांबी नअू अिंच असते. अेकाजवळ अेक असे हे हौद अुभे केले म्हणजे अेकूण लांबी तीन फुटांपेक्षा जास्त होते. प्रत्येक हौदांत खाली वर चाकें बसवलेलीं असतात. यांपैकी अगदी पहिलें आणि शेवटलें हीं दांत्यांचीं असतात. अगदी पहिल्या हौदांत पाणी, दुसऱ्यांत डेव्हेलपर, तिसऱ्यांत व चौथ्यांत पाणी, पांचव्यांत हायपो, सहाव्यांत पाणी अशी साधारण रचना असते. यापुढील भाग अुजेडाच्या खोलींत ठेवलेला असतो. अंधाऱ्या खोलींतून अुजेडाच्या खोलीशी असलेल्या भिंतीला प्रकाश आंत जाणार नाही असें अेक भोक पाडलेलें असतें. अुजेडाच्या खोलींत फिल्म् वाळण्यासाठी अगदी प्रथम तिच्यावर अून हवेचा जोराचा मारा करतात आणि पुढे हीटर ठेवलेल्या अेका काचेच्या कपाटांत ती बराच वेळ राहील अशी व्यवस्था केलेली असते. सरते शेवटीं अेका मोठ्या तबकडीवर ती गुंडाळली जाते. हीं सर्व चाकें फिरविण्यासाठी अेक मोटार आणि शेकडो साखळ्या काम करीत असतात. प्रथम हा सगळा मार्ग अेक जाड फिल्मचा तुकडा भरून काढतो. सर्व चाकांवरून तो तबकडीपर्यंत नेअून पोचविलेला असतो आणि याच्या अलीकडल्या टोकाला डेव्हेलप करावयाची असेल ती फिल्म जोडतात म्हणजे ती त्या सर्व मार्गाने जाअून तबकडीवर गुंडाळली जाते. डेव्हेलप करण्याची फिल्म संपली म्हणजे पुनः अेक जाड तुकडा शेवटीं जोडून ठेवतात तो या सर्व चाकांवरून जाअून तबकडीपाशीं आला की यंत्र थांबवितात. या फिल्मच्या तुकड्याला लीडर म्हणतात.

निगेटिव्हवरून रोजच्या रोज पहिली पॉझिटिव्ह तयार करतात. त्यासाठी अेक प्रिंटिंग

मशीन अुपयोगांत आणलें जातें. या प्रिंटिंग मशीनवर चार तबकड्या असतात. वर दोन आणि खाली दोन. मधोमध प्रिंटिंगचा दिवा आणि अेक दरवाजा असतो. या दरवाजाला दोन दारें असतात. अेकाची रुंदी $\frac{1}{2}$ आणि दुसऱ्याची $\frac{1}{2}$ असते. वरच्यांपैकी अेका तबकडीवर रॉ पॉझिटिव्ह आणि दुसरीवर जिच्यावरून पॉझिटिव्ह तयार करावयाची असेल ती निगेटिव्ह असते. दरवाजासमोर या दोन्ही फिल्म्स् अेकमेकांना त्यांची अिमल्शन असलेली बाजू लागेल अशा रीतीनें घट्ट अडकविलेल्या असतात. अेक दरवाजा साअुंडचा आणि दुसरा चित्राचा असतो हें अुघडच आहे. निगेटिव्हच्या प्रमाणांत पॉझिटिव्ह् कमीजास्त घनतेची काढावयाची असेल त्यासाठी दिव्याचा किती प्रकाश फिल्मवर जाअूं द्यावयाचा त्यावर अेक कंट्रोल असतो. हा कांही यंत्रांत हाताने फिरवावा लागतो तर कांहींत तो आपोआप फिरविण्याची व्यवस्था असते. जेथे निगेटिव्ह काळी असेल तेथून प्रकाश पॉझिटिव्हपर्यंत पोचणार नाही आणि तो भाग पांढराच राहील; जेथे निगेटिव्ह पारदर्शक असेल तेथे पॉझिटिव्ह् काळी होओील म्हणूनच निगेटिव्हच्या निगेटिव्हला पॉझिटिव्ह् म्हणतात. ही प्रकाशलेखित पॉझिटिव्ह आणि मूळ निगेटिव्ह खालच्या बाजूस असलेल्या तबकड्यांवर गुंडाळल्या जातात. पॉझिटिव्ह तयार झाली म्हणजे ती थिअेटरमध्ये पडद्यावर पाहतात. ही शूटिंगची व त्यापुढील कामाची नेहेमीची पद्धत.

कांही विशेष युक्त्यांसाठी निरनिराळ्या मार्गांचा अवलंब करावा लागतो.

कांही शॉट्स् केवळ चेहेऱ्यावरील हावभावांच्याच दृष्टीने महत्त्वाचे असतात किंवा कांहींचा आवाज शूटिंग करतांना घेतां येणें शक्य नसतें असे शॉट्स् आवाजाशिवाय मूक चित्रित करतात, आणि हे मुके (Silent) तुकडे जरूर असेल त्याप्रमाणे जोडून घेतात.

कित्येक दृश्यें स्टूडिओच्या आवारांत घेणें शक्य नसतें. अशा दृश्यांसाठी तीं जेथे घ्यावयाचीं तेथे चित्रीकरणाचीं जरूर तीं सर्व साधनें घेअून जावें लागतें. गर्दीचीं दृश्यें किंवा सैन्य असले भाग दाखविण्यासाठी शेकडो अितर लोक बाहेरून आणवावे लागतात. अशी गर्दी, पार्टी, रस्ता अशा ठिकाणीं तर नेहेमी असते. ठराविक ठिकाणीं साधारण जनसमूह अुभा करून मुख्य पात्रें पुढील बाजूस (forefront) येतात. अशा रीतीनें तींच तींच माणसें कॅमेऱ्यासमोरून गेलीं तेव्हा ११० च माणसें ८०,००,००० माणसांसारखीं भासलीं असें अेक सुप्रसिद्ध असिस्टंट डायरेक्टर म्हणतो. दृश्य घेतांना पात्रांस बरीच हालचाल करावयाची असली किंवा ट्रॉली पुष्कळ हलणार असली तर त्यांनी कोठून निघावयाचें, कोठे थांबावयाचें याच्या खुणा करून ठेवतात.

कांही दृश्यें फेड अिन् करून घ्यावीं लागतात. त्यासाठी कॅमेऱ्यांत कॅमेऱ्याचा दरवाजा (aperture) हळुहळू अुघडत जावा अशी व्यवस्था असते, आणि याच्याच अुलट फेड आअुटसाठी या दोन्ही प्रकारांचें मिश्रण करून मिक्स किंवा डिझॉल्व्ह हा प्रकार साधतो. प्रथम पहिलें दृश्य फेड आअुट करतात आणि नंतर फेड आअुटसाठी लागलेली फिल्म कॅमेऱ्याचें दार बंद करून मागें परत गुंडाळून घेतात. जेथून पहिल्या दृश्याचा फेड आअुट सुरू झाला असेल तेथूनच दुसऱ्या दृश्याचा फेड अिन सुरू करतात आणि फेड आअुट जेथे संपला असेल तेथेच फेड अिनहि संपवितात म्हणजे पहिलें चित्र हळुहळू नाहीसें होत गेलें आहे आणि त्याच्या जागीं दुसरें आलें आहे असा भास होतो. चित्रलेखनाच्या बहुतेक युक्त्या डबल् अेक्स्पोजिंगवरच आधारलेल्या आहेत. तरीसुद्धा आणखी कांही मदत लागतेच. आगगाडींतून जातांना झाडें—जमीन पळतांना दिसणें किंवा रस्त्याने बोलत जात असतांना रस्ता

मागे पडतो आहे असें भासवावयाचें असेल तर बॅक प्रोजेक्शनचा अुपयोग करतात. कारण रस्त्यावर जाअून "अहो, आम्हांला येथे चित्रीकरण करावयाचें आहे; मेहेरबानी करून आवाज करूं नका" असें म्हटलेले कोणी अैकत नाही. बरें, खर्चाच्या दृष्टीने लांबच लांब रस्ता स्टुडिओंत तयार करणेंहि परवडणार नाही. मग जो रस्ता दाखवावयाचा असेल त्याचें संपूर्ण दृश्य प्रथम कॅमेरा अेका मोटारींत घालून घेअून टाकतात. नंतर त्याची अुत्कृष्ट पॉझिटिव्ह तयार करतात. ही पॉझिटिव्ह अेका काचेच्या पडद्यावर सिनेमा थिअेटरमधल्यासारखी दाखवितात आणि या पडद्याच्या बाजूस रस्त्यांतून जी गाडी, मोटार, व्यक्ति जें काय दाखवावयाचें असेल तें स्थिर ठेवतात आणि त्याच्याहि पलीकडून कॅमेऱ्यानें चित्रीकरण करतात. अशा चित्रलेखनाने वास्तविक स्थिर असलेल्या वस्तु व व्यक्ति हलत आहेत असा भास होतो. चित्रलेखनाच्या दृष्टीने चित्रीकरणाला फार महत्त्व आहे; कारण कॅमेरामनला आपली सारी कुशलता अेवढ्याच काळांत दाखवावयाची असते. अितरांना आपलीं कामें सुधारण्याला थोडी फार संधि पुढे मिळते; तीहि कॅमेरामनला नसते. त्यामुळे त्याला याच वेळीं डोळ्यांत तेल घालून राहावें लागतें.

देशी चित्रपटांत गाण्यांना फार महत्त्व असतें. आणि गाण्यांचें चित्रीकरण हा अेक स्वतंत्रच भाग आहेही. अेक तर गाणाऱ्या व्यक्तीस खूपच हालचाल करावयाची असते. ती सर्व हालचाल कॅमेऱ्याच्या आवाक्यांत शक्य असेलच असें नाही. बरें, तशी ती शक्य नाही म्हणून त्या हालचालींचे तुकडे पाडले तर गाण्यांचे तुकडे तुकडे ध्वनिमुद्रित करतां येत नाहीत. गाणें हें अेकसारखें (Continuous) च घ्यावें लागतें. गाणाऱ्या व्यक्तीची सारी हालचाल मायक्रोफोन फॉलो करून आवाक्यांत ठेवणें हेंहि शक्य नाही, आणि क्वचित् तें जरी शक्य असलें तरी वाद्यांच्या आणि गायकांच्या आवाजांत त्यामुळे विलक्षणच फेरबदल होअील. या सर्व आपत्तींतून मुक्त होण्याचा प्ले बॅक (Playback) हा अेक अुत्तम मार्ग आहे. गाणें जसें अैकूं यावयास पाहिजे असेल तसें तें प्रथम ध्वनिमुद्रित करतात. या वेळीं मायक्रोफोन अेका जागीं असतो आणि त्याच्या समोर सर्व वजवय्ये आणि गायक असतात. सबंध ऑर्केस्ट्रा आणि गायक यांच्या आलापांचा ध्वनिलेख तयार करतात. पुढें जेव्हा त्याचें चित्रलेखन करावयाचें असेल तेव्हा हें फिल्मवर चित्रित केलेलें गाणें फिल्मवरून किंवा ग्रॅमोफोनवरून गायकाला अैकवितात आणि तें त्याला हुबेहूब म्हणतां येअील अशी संवय करवितात. न चुकतां तो तें तसें म्हणूं लागला म्हणजे मग चित्रीकरणाच्या सोअी-प्रमाणे त्यांतील निरनिराळा भाग म्हटला जात असतांना निरनिराळे तुकडे चित्रित करतात. याच वेळीं नेहमीच्या गतीने, म्हणजे दर मिनिटास ९० फूट या गतीने, फिल्म सरकत असते आणि त्यावरून अैकूं येणाऱ्या गाण्याबरहुकूम तो गायक ओठांची हालचाल करीत असतो. मग चित्रित झालेलें चित्र आणि मूळ गाणें हालचाल जुळेल अशा रीतीने जोडून घेतलें म्हणजे जणू तो खरोखरीच गाणें म्हणत आहे अितकें हुबेहूब होतें. अेखाद्या नटाला वा नटीला गातां येत नसलें तर तिच्या बदली दुसऱ्या कोणाला गायला लावून तीच गात आहे असाहि भास अुत्पन्न करतां येतो.

चित्रलेखन चालू असतांनाच ठिकठिकाणीं महत्त्वाचे हावभाव दर्शविणारीं, लोकांची नजर खेचून घेतील अशीं स्थिर चित्रेंहि साध्या कॅमेऱ्याने घेअून ठेविलीं जातात.

साधारणतः शूटिंग सुमारें तीन महिन्यांत संपतें.

[ अपूर्ण

# कै. डॉ. माधवराव पटवर्धन स्मारक

## प्रसिद्धि-पत्रक

जुलै अखेर पर्यंत आश्वासित व रोख देणग्यांची अेकूण रक्कम रु. २३४७-८-० झाली आहे. श्री. ना. ग. जोशी यांच्या आस्थेमुळे व परिश्रमांमुळे अहमदाबादेस दीडशे रुपयांच्या देणग्या वसूल झाल्या आहेत. कोल्हापुराहून व पुण्यास कांही सद्गृहस्थांनी आपण होअून देणग्या पाठविल्या हें अुत्साहजनक आहे. देणगीदारांची यादी खाली दिली आहे.

आता माधवरावांच्या चाहत्यांस विनंती अशी की कोणी मागण्यास येण्याची वाट न पाहतां आपुलकीच्या भावनेने शक्य तितक्या लवकर खजिनदारांकडे देणग्या पाठविण्याची कृपा करावी. पहिल्या पुण्यतिथीस निधि पुरा करून प्रत्यक्ष स्मारकाच्या कार्यास आरंभ करण्याचा मानस आहे तो सिद्धीस नेण्यास मनःपूर्वक साहाय्य करावें अशी त्यांस आग्रहाची विनंती आहे.

रु. ५००

श्रीमंत राजे मालोजीराव निंबाळकर, फलटण.

प्रत्येकीं रु. २००

श्रीमंत सौ. राणीसाहेब, फलटण; श्रीमंत सरदार रास्ते, पुणें व श्री. वि. ह. दामले, पुणें.

प्रत्येकीं रु. १००

श्री. ग. स. मराठे, पुणें; न्या. मू. म. वि. भिडे, लाहोर; डॉ. बा. ल. देशपांडे, पुणें; श्री. द. ग. आगाशे, पुणें; प्रि. प्र. के. अत्रे, पुणें; श्री. ल. ना. गोडबोले, पुणें.

प्रत्येकीं रु. ५०

डॉ. य. वा. मोडक, पुणें; रा. ब. कों. म. कुमठेकर, पुणें; प्रि. घ. रा. गाडगीळ, पुणें व न्या. मू. शं. बा. ढवळे, पाटणा.

प्रत्येकीं रु. २५

ना. ग. वा. मावळंकर, अहमदाबाद; रा. ब. द. ल. सहस्रबुद्धे, पुणें; श्री. दि. कृ. कोल्हटकर, पुणें; श्री. गो. ब. जोशी, पुणें; व प्रो. श्री. ल. आजरेकर, पुणें.

रु. २०

श्री. ग. स. राजाध्यक्ष, अहमदाबाद.

प्रत्येकीं रु. १५

श्री. न. चिं. केळकर, पुणें व श्री. श्री. वि. दामले, पुणें.

रु. ११

रावसा. बाबासाहेब देशपांडे, पुणें.

म. सा. प. (१३-३-१०)

प्रत्येकीं रु. १०

श्री. ज. स. करंदीकर, पुणें; श्री. वि. ना. दीक्षित, पुणें; प्रो. वा. म. जोशी, पुणें; श्री. गं. दे. खानोलकर, मुंबअी; श्री. द. ग. काळे, पारनेर; प्रो. शं. के. कानेटकर, पुणें; श्री. वि. स. खांडेकर, कोल्हापूर; श्री. के. ना. काळे, पुणें; प्रो. स. वि. आपटे, पुणें; श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, नागपूर.

प्रत्येकीं रु. ५

प्रो. ना. ग. नारळकर, पुणें; श्री. श्री. भा. जोशी, अहमदाबाद; प्रो. स. कृ. पिंपळखरे, पुणें; प्रि. ना. म. पटवर्धन, हिंगणें; डॉ. के. सी. घारपुरे, पुणें; श्री. दा. वा. पोतदार, पुणें; श्री. ना. ग. जोशी, अहमदाबाद; श्री. स. पां. नाडकर्णी, अहमदाबाद; श्री. शं. अ. खेर, अहमदाबाद, श्री. वि. र. मनोहर, अहमदाबाद; प्रो. शं. ग. देशपांडे, अहमदाबाद; श्री. ग. रा. सरदेसाई, अहमदाबाद; प्रो. भांडारकर, अहमदाबाद; डॉ. मोहिले, अहमदाबाद; प्रो. दीक्षित, अहमदाबाद; श्री. रा. गो. पाटील, अहमदाबाद; श्री. द. के. चित्रे, अहमदाबाद; प्रो. व. ह. गोळे, अहमदाबाद; श्री. गो. ल. जोशी, अहमदाबाद; श्री. डी. सी. जोशी, अहमदाबाद; प्रो. व. ना. जोशी, अहमदाबाद; सौ. कमळाबाअी आपटे, पुणें; श्री. गो. शि. उपळेकर, कोल्हापूर; श्री. त्र्यं. गो. ढवळे, पुणें; प्रो. मो. ल. चंद्रात्रेय, पुणें व प्रो. चिं. रा. देवधर, पुणें;

पांच रुपयांखालील मिळालेल्या देणग्या एकूण रु. ३१-८-०.

र. लु. जोशी,
चिटणीस व खजिनदार,
पटवर्धन स्मारक समिति.

---

# येती शिरगणती आणि महाराष्ट्र



[लेखक : शंकर रामचंद्र शेंडे]

फेब्रुवारी २८ आणि मार्च १ व २ खिस्ताब्द १९४१ या तीन दिवशीं येत्या शिरगणतीच्या नोंदी होणार आहेत. नोंदीची पद्धत व व्यवस्था, तसेंच नोंदून घ्यावयाच्या माहितीची प्रश्नपत्रिका, हीं अेरवी अेक वर्षाहून अधिक आधीच मुक्रर होअून जातात, परंतु यंदा विशेष कारणामुळे या दोन्ही गोष्टी शिरगणती अधिकाऱ्यांना परवापर्यंत निश्चित करतां आल्या नाहींत व जनतेकडून सूचना घ्यावयास अवधि फार थोडा आहे. याचा महाराष्ट्राने फायदा घ्यावयाच्या गोष्टींचा निर्देश करतों.

(१) नोंदीचे तक्ते (Schedule) जाअून त्या जागीं अेका व्यक्तीसाठीं अेक चतकोर कागद (Slip) माहिती घेण्यासाठी योजिला आहे व त्यांवरहि प्रत्यक्ष प्रश्न नसून प्रश्नांचे संदर्भांक आहेत. या व्यवस्थेमुळे नोंदींत चुका होतील, आणि जर कोणास स्वतःच्या घरच्या मंडळींच्या

नोंदी स्वतः लिहाव्यात असें मनांत आलें तर शक्य होणार नाही. तरी हे दोन्ही दोष नाहीसे करून घेणें.

(२) प्रश्नावलींत (अ) Birthplace च्या अैवजी Provinciality, (आ) Community च्या अैवजी Race, Tribe & Caste, (अि) Religion ची नोंद प्रथम व Race अि. ची नंतर, (अी) Mothertongue बरोबर (असल्यास) dialect या दुरुस्त्या करून घ्यावयाच्या. (अु) Other Indian languages in common use हें सदर गाळावें. (अू) Whether able to read and write and script of literacy यांपैकी and script of literacy अितके शब्द गाळावेत. (अे) Whether literate in English हा प्रश्न गाळावा (कारण litaracy च्या आणि digrees of education या प्रश्नांच्या अुत्तरांत अिंग्रजी शिक्षणाच्या अुत्तराचा समावेश आहेच.); अितक्या सुधारणा करून घेणें.

(३) जातींच्या तपशीलांत पुष्कळ काट बसण्याचा संभव दिसतो. तरी जातींची तपशीलासह नोंद व्हावी व कांही गाळलें जाणार नाही अशी खात्री करून घेणें.

(४) नोंदचिठ्या (Enumeration slip) विल्हेवारीसाठी (Sorting) मूळ पुस्तकांतून फाडल्या जाअून फिरत राहणार व त्यामुळे अेखाद्याच्या नोंदींत चूक घडली असल्यास, संशयनिवृत्ति अथवा चूकदुरुस्ती करविण्यास साधन राहत नाही. तरी चिठ्ठीची कार्बन प्रत मूळ पुस्तकांत घेण्याची सोय करून ठेवविणें.

(५) कोकणी (गोव्याची), खानदेशी, सौराष्ट्री आणि कुकणी (धरमपूर-नाशिक-वासदा भागांतील) या चारी मराठीच्या बोली आहेत म्हणून मराठींत सामील करवून घेणें.

(६) प्रश्नावलींत Community ची नोंद प्रथम होण्याची सोय असून नंतर धर्माची नोंद घेतली जाणार आहे. त्यामुळे Community धर्माहून निराळी समजली जाणार किंवा काय अशी शंका वाटते. तरी धर्माची नोंद प्रथम घेअून Community च्या अैवजी जाती ह्या धर्माचीं अुपांगें आहेत, म्हणून त्यांची तशी नोंद होअील अशाबद्दल खात्री करवून घेणें.

शिरगणतीविषयक आणखी पुष्कळ कामें करावयाचीं आहेत. परंतु वरील सहा तात्काळ व्हावयास पाहिजेत म्हणून Census Superintendents– मुंबई, मध्यप्रांत, निझाम व मद्रास यांना प्रथम भेटून आपलें म्हणणें पटवून द्यावयास पाहिजे व त्यांच्या शिफारसी घेअून Census Commissioner कडून या दुरुस्त्या करवून घ्यावयास पाहिजेत. (आणखीहि सूचना करावयाच्या आहेत पण त्या सवडीने केल्या तरी चालतील. तसेंच नोंदीच्या वेळीं महाराष्ट्रभाषा व समाज यांच्या नोंदी चुकीच्या केल्या जाअूं नयेत म्हणून करावयाच्या आहेत. त्याहि फुरसतीने झाल्या तरी हरकत नाही.)

वरील कामासाठी अधिकाऱ्यांकडे व्यक्तीने जाण्यापेक्षा संस्थांचे प्रतिनिधि म्हणून ४।५ जणांनी जाणें परिणामकारक होअील. यांपैकी कांही तक्रारी स्थानिक आहेत त्या तेथल्या लोकांकडून जाण्याने, तसेंच या सर्व तक्रारी सर्व महाराष्ट्रांतून जाणें, फलप्राप्तीच्या दृष्टीने निकडीचें आहे.

**या सर्व कामांसाठी महाराष्ट्राची शिरगणतीपरिषद् भरविण्याच्या कामीं महाराष्ट्र साहित्य परिषदेने पुढाकार घ्यावा अशी म. सा. प. चे सभासद तजवीज करतील काय ?**

शिरगणती अहवाल हें समाजाचें सद्यःकालीन चित्र राहणार व कालान्तराने अितिहासाचें अधिकृत साधन होअून राहणार आहे; हें यांचें महत्त्व लक्षांत घेअून सर्वांनी तत्परतेने पुढे यावें अशी विनंती आहे.

## डे. व्ह्. ट्रा. सोसायटीनें १९३९-४० सालीं दुसरे सहामाहींत बक्षिस व शिफारसपत्र दिलेल्या पुस्तकांची यादी

| पुस्तकाचें नांव | कर्त्याचें नांव | बक्षिसाची रक्कम |
|---|---|---|
| | | रु. |
| १ स्मृतिस्थळ | रा. वामन नारायण देशपांडे | ५० |
| २ सोशॅलिझम् | रा. पां. वा. गाडगीळ | २१ दि.ब.गोडबोले प्राआीझ |
| ३ फॅसिझम् | रा. पां. वा. गाडगीळ | १५ केळकर प्राआीझ |
| ४ बांध, ताली, बंधारे आणि निचरा | रा. का. न. पटवर्धन | ३० |
| ५ मराठेशाहीचा वद्यपक्ष द्वितीया | साधुदास | ४० |
| ६ मध्यभारतीय मराठी वाङ्मय | रा. कृ. गं. कवचाळे | ५० |
| ७ वज्रांग-निबुद्ध-शिक्षा | कै. ग. स. वझे मास्तर | ३० |
| ८ महाराष्ट्र संत कवयित्री | रा. ज. र. आजगांवकर | ३० |
| ९ पत्त्यांची चलाखी व खेळ | डॉ. के. भा. लेले | ३० |
| १० महाराष्ट्रांतील पाणीपुरवठा | रा. न. गं. आपटे | ३० |
| ११ प्रणवोपासना (द्वितीयावृत्ति) | डॉ. श्री. म. वैद्य | ४५ अिचलकरंजी प्रो.भानू प्राआीझ |
| १२ शासन साचा | रा. न. गं. देवधर | ५५ |
| १३ साम्राज्यशाही | भाअी ना. ग. गोरे | ३० |
| १४ जीवनप्रकाश | रा. श्री. दा. सातवळेकर | ४० |
| १५ मराठवाड्यांतील अर्वाचीन मराठी वाङ्मय | रा. चिं. नी. जोशी | ४० |
| १६ अुपासमार कीं नियोजन | सौ. चंद्रकला हाटे व कु. कृष्णाबाअी कोल्हटकर | ४५ |
| १७ आर्यसंस्कृतीचा अुत्कर्षापकर्ष (अुत्तरार्ध) | रा. महादेवशास्त्री दिवेकर | ५० संस्थेचे फंडांतून देणें |
| १८ त्रिधातु-त्रिदोष-चर्चा | प्रो. ग. स. दीक्षित | ३० |
| १९ आपुलकी | श्री. काशीताअी नाटेकर | शिफारसपत्र |
| २० शिखांचा शाह | रा. दा. ब. दांडेकर | ,, |
| २१ शिखांचा स्फूर्तिदायक अितिहास | रा. शं. पु. जोशी | ,, |
| | | ६६१ रु. |

* पुस्तकांच्या बक्षिसांच्या रकमा पुढील सालीं देण्यांत येतील. कारण चालू सालांत बक्षिस देण्याची सर्व रक्कम खर्च झालेली आहे.

# २३ व्या (अहमदनगर) महाराष्ट्र साहित्य संमेलनांतील ठरावांच्या अंमलबजावणीचा वृत्तान्त

संमेलनाध्यक्ष प्रा. द. वा. पोतदार यांनी सान्या ठरावांविषयी परिश्रमपूर्वक सविस्तर प्राथमिक सूचना केल्या होत्या. यानंतर यासंबंधी होत असलेलें कांही कार्य व उद्भवलेले अितर प्रश्न यांजविषयी त्यांनी जागरूकतेने वेळोवेळीं परिषदेच्या कार्यालयाशीं पत्रव्यवहार केला. त्यांनी केलेल्या सूचनांच्या शक्याशक्यतेचा कार्यकारी मंडळाकडून विचार होऊन ठरावांची अंमलबजावणी करण्यांत आली आहे. या त्रोटक वृत्तान्तांत जुजबी स्वरूपाच्या ठरावांचा अुल्लेख केलेला नाही.

ठराव ४— महिलाविद्यापीठास सरकारी सनद (Charter) मिळवून देण्याविषयीचा हा ठराव मुंबअी सरकाराकडे पाठविण्यांत आला असतां त्याची रीतसर पोच आली आहे.

ठराव ६— येत्या लोकगणतीच्या वेळीं प्रत्येक जिल्ह्यांत, तालुक्यांत व गांवांतहि भाषावार नोंद व्हावी अशा अर्थाचा हा ठराव आहे. शिरगणती-खात्याच्या प्रमुखाकडून या प्रश्नाचा विचार होत आहे असें हिंदुस्थान सरकाराकडून लिहून आलें आहे. हा प्रश्न आता 'संयुक्त महाराष्ट्र सभा' या नवीन संस्थेने विशेष प्रकारें हातीं घेतला असून कार्यालय या कामीं सहकार्य करीत आहे.

ठराव ७— व्ही. पी. 'अन् रजिस्टर्ड' पाठविण्यास पूर्वीप्रमाणे सवलत मिळण्याविषयीच्या या ठरावासंबंधी शिष्टमंडळाची योजना तयार होत आहे तोंच युद्धास आरंभ झाला. अनुकूल काळ येईपर्यंत हा प्रश्न तसाच ठेवण्यांत आला आहे.

ठराव ८— पुणें व नागपूर येथे स्वतंत्र नभोवाणी केंद्रें स्थापन करण्याविषयींचा हा ठराव हिंदुस्थान सरकारास पाठविण्यांत आला. त्याची रीतसर पोच मात्र आली आहे. बॉंबे रेडिओ लिसनर्स गिल्डने अनेक वेळां स्मरण दिलें असतांहि आपल्या प्रतिनिधींचीं नांवें न कळविल्यामुळे नेमलेल्या समितीचें कार्य होऊं शकलें नाही.

ठराव ९— सरकारकडे येणाऱ्या पुस्तकांच्या प्रतींपैकी अेकेक प्रत अेखाद्या मध्यवर्ती ग्रंथालयास द्यावी अशा अर्थाचा हा ठराव मुंबअी व मध्यप्रांत सरकारांकडे पाठविण्यांत आला. नागपूर सेक्रेटरियट लायब्ररींत तशी व्यवस्था असल्याचें मध्यप्रांत सरकाराकडून पत्र आलें व परवानगी घेऊन या लायब्ररीचा अुपयोग अभ्यासकांस करितां येतो असें चौकशीअंतीं समजलें आहे. मुंबअी सरकाराकडून कांहीच उत्तर आलें नाही.

ठराव १०— सरदार किबे व गायकवाड सरकार यांच्या देणग्यांसंबंधी स्मरणपत्र गेल्यानंतर मुंबअी सरकारकडून आता खुलासा आला आहे तो असा की सरदार किबे यांच्या देणगीच्या व्याजाचा विनियोग रसायनशास्त्रविषयक किंवा विज्ञानविषयक प्रांतिक भाषांतून कोणत्या तरी भाषेंत लिहिलेल्या निबंधासाठी करावयाचा आहे व तसें करण्यास विद्याधिकाऱ्यांस लिहून गेलें आहे. गायकवाड सरकारने दिलेल्या देणगीच्या व्याजाचा विनियोग कोणत्याहि अेका विषयासाठी करावयाचा नसून मॅट्रिक्युलेशन परीक्षेच्या निकालाप्रमाणे अेकंदर सान्या विषयांत लायकी दाखविणाऱ्या विद्यार्थ्यांस शिष्यवृत्त्या देण्यासाठी करावयाचा आहे व त्याप्रमाणे व्यवस्था करण्यांत येत असते.

अनुक्रमणिका

ठराव ११— स्वतंत्र कर्नाटक प्रांत निर्माण करण्याच्या वेळीं स्वयंनिर्णयाच्या तत्त्वावर गांव हें परिमाण धरून मतें घेण्यांत यावीं अशा अर्थाचा हा ठराव हिंदुस्थान व मुंबआी सरकारांकडे पाठविण्यांत आला. मुंबआी सरकारांकडून औपचारिक पोच आली आहे.

ठराव १२— नवीन शुद्धलेखनपद्धतीच्या स्वीकाराविषयीचा हा ठराव परिषदेच्या २६ संलग्न संस्था, २० वृत्तपत्रें व नियतकालिकें यांजकडे पाठविण्यांत येअून मराठी शुद्ध-लेखनाची होत असलेली अवहेलना थांबविण्याचा प्रयत्न करण्यास त्यांस विनंती करण्यांत आली. मात्र दोन संलग्न संस्थांकडून आश्वासनवजा पत्रें आलीं आहेत. मुंबआी विद्यापीठाकडे ठराव पाठविला असतां या प्रश्नाचा मागेच अखेरचा (प्रतिकूल) निकाल लावण्यांत आला असल्याचें कार्यालयास कळविण्यांत आलें आहे ! मुंबआी सरकाराकडून अुत्तर न आल्यामुळे पुन्हा लिहिलें असतां कार्यालयाच्या पत्राची नक्कल मुंबआी विद्यापीठास पुढील व्यवस्थेसाठी आता पाठविली आहे असें लिहून आलें आहे.

ठराव १३— गुजराती आणि कानडीच्या अुच्च संशोधनाकरिता सरकारने दिलेल्या देणग्यांविषयीचा हा ठराव मुंबआी सरकाराकडे पाठविण्यांत आला, परंतु कांहीच अुत्तर आलें नाही.

ठराव १५— अभ्यासक्रम अित्यादि भाषाविषयक गोष्टींचा विचार करितांना परिषदेचा अभिप्राय घ्यावा अशा अर्थाचा हा ठराव मुंबआी विद्यापीठ व मुंबआी सरकार यांजकडे पाठ-विण्यांत आला. असें करणें शक्य नाही असें मुंबआी विद्यापीठाने कळविलें आहे. मुंबआी सरकाराकडून कांहीच अुत्तर आलें नाही.

ठराव १७— कोकणी व अहिराणी बोलींविषयीच्या या ठरावासंबंधी श्री. शं. रा. शेंडे यांचीं तीन व्याख्यानें करविण्यांत आलीं. धुळें व नाशिक येथे शक्य तितकी जागृति करण्यास तेथील पुढारी मंडळीस विनंती केली होती. मुंबआी मराठी-साहित्यसंघ या संलग्न संस्थेने या कामीं बरीच खटपट केली आहे. परिषदेच्या २६ संलग्न संस्थांस यासंबंधी जोराची हालचाल करण्याची विनंती करण्यांत आली. दोन संस्थांचीं काय तीं अुत्तरें आलीं. हा प्रश्न 'संयुक्त महाराष्ट्र सभा' या संस्थेने विशेष प्रकारें हातीं घेतला असून कार्यालय या कामीं सहकार्य करीत आहे.

ठराव १८—महाराष्ट्र विद्यापीठासंबंधीचा हा ठराव मुंबई सरकारास पाठविण्यांत आला. पुण्यांतील व इतर ठिकाणच्या कॉलेजांच्या मुख्यांच्या सूचना मागविल्या आहेत व त्या आल्या-नंतर या प्रश्नाचा विचार करण्यांत येअील असें मुंबई सरकाराकडून कळविण्यांत आलें आहे.

ठराव २१— चित्रपटाच्या सेन्सॉर बोर्डांत प्रतिनिधि घ्यावा म्हणून केलेला हा ठराव मुंबई सरकाराकडे पाठविण्यांत आला. बोर्डाची पुनर्रचना करतेवेळीं या ठरावाचा विचार कर-ण्यांत येअील असें सरकाराकडून अुत्तर आलें. यानंतर हा प्रश्न विशेष प्रकारें धसास लागावा म्हणून शिष्टमंडळाची योजना करण्यांत आली. परंतु कामाच्या विशेष गर्दीमुळे शिष्टमंडळास भेट देणें तूर्त शक्य नाही असें गृहमंत्र्यांकडून पत्र आलें.

ठराव २६— निजाम संस्थानांतील मराठी शिक्षणाविषयीच्या ह्या ठरावासंबंधी तेथील प्रतिकूल राजकीय वातावरणामुळे कांहीच योजना करण्यांत आली नाही. आता हा प्रश्न विशेष प्रकारें हातीं घेण्याचा विचार आहे.

ठराव २७— मोशन पिक्चर कॉंग्रेसकडून लेखकवर्गाच्या झालेल्या अुपेक्षेसंबंधीचा हा ठराव साऱ्या साहित्य-परिषदांकडे पाठविण्यांत आला. हिंदी व कन्नड या साहित्यपरिषदांनी या कामीं सहकार्य केलें. बराच पत्रव्यवहार केल्यानंतर मोशन पिक्चर कॉंग्रेसने आपल्या पुढील अधिवेशनाच्या वेळीं लेखकवर्गाचा पूर्ण उपयोग करण्यांत येअील असें आश्वासन दिलें.

ठराव २९— मराठी या विषयास स्वतंत्र स्थान देण्यासंबंधीचा हा ठराव मुंबअी व मध्यप्रांत सरकारांकडे व मुंबअी व नागपूर या विद्यापीठांकडे पाठविण्यांत आला. दोन्ही विद्यापीठांची पोच आली आहे. मुंबई सरकाराने हा प्रश्न विद्यापीठापुढे ठेवावा असें सुचविलें आहे.

ठराव ३०— बालवाङ्मयाची योजना करण्यास नेमलेल्या समितीने कांहीच कार्य केलें नाही असें दिसतें. स्मरणपत्र पाठविलें त्याचेंहि अुत्तर आलें नाही.

ठराव ३१— संमेलनाध्यक्षांच्या निवडणुकीसंबंधीचा हा ठराव यंदाच्या निवडणुकींत कार्यकारी मंडळाच्या अनुज्ञेने अंमलांत आणण्यांत आला. परिषदेच्या वार्षिक साधारण सभेंत नियमांत अवश्य ती दुरुस्ती करण्यांत येअील.

ठराव ३२— वाङ्मयसमालोचन पूर्वीप्रमाणे सरकाराकडून प्रतिवर्षी करण्यांत यावें यासंबंधीचा ठराव मुंबअी सरकाराकडे पाठविण्यांत आला त्याची पोच आली.

ठराव ३३— मराठी साहित्यांतील ग्रंथ-रत्नांची अिंग्रजी भाषान्तरें करण्याच्या दृष्टीने नेमलेल्या समितीने काम केलें आहे किंवा नाही हें समजत नाही. स्मरणपत्र पाठविण्यांत आलें त्याचेंहि अुत्तर नाही.

ठराव ३४— युद्धामुळे कांही काळ बोटी बंद झाल्याने अैन वेळीं रत्नागिरीकरांस थोड्या अवकाशांत साहित्य संमेलनाची तयारी करावी लागली व म्हणून या ठरावांत इच्छिल्याप्रमाणे वाचनालय कार्यकर्त्यांचें संमेलन यंदा भरवितां आलें नाही.

ठराव ३६, ३७, ३८ व ३९— सरकारी प्रकाशनें वाचनालयाला विनामूल्य पुरविण्याविषयी व फिरतीं पुस्तकालयें काढण्याविषयी केलेले ठराव मुंबई व मध्यप्रांत सरकारांकडे पाठविण्यांत आले. या ठरावांसंबंधी महाराष्ट्र लायब्ररी अॅसोसिअेशनचे चिटणीस श्री. द. वा. जोशी यांनी खालीलप्रमाणे माहिती पाठविली आहे:—

(१) ग्रंथालयें व वाचनालय-संस्था रजिस्टर करण्यांत याव्या अशाबद्दल संस्थांना विनंती करण्यांत आली असून त्या बाबतींत चालना मिळाली आहे.

(२) मुंबअी सार्वजनिक ग्रंथालय बिलाची योजना मुंबअी माजी मंत्रिमंडळाने हातीं घेतलेली होती; परंतु ह्या योजनेची प्रगति चालू राजकीय घडामोडींमुळे तात्पुरती तरी तहकूब झालेली आहे.

(३) तथापि महाराष्ट्रीय वाचनालयसंघाने मागील १०।१२ वर्षें अुपक्रम केल्याप्रमाणे सरकारने भाषावार मध्यवर्ती सार्वजनिक ग्रंथालयें निर्माण करून, सार्वजनिक ग्रंथालयांचा प्रसार करून त्यांना कार्यक्षम करण्याच्या योजनेकरिता अेक समिति नेमलेली असून तिचा कार्यक्रम जाहीर केलेला आहेच.

(४) विनामूल्य सरकारी गॅझेट, रिपोर्टस् व प्रसिद्धिपत्रकें सरकाराकडून सार्वजनिक ग्रंथालयांना मिळण्याविषयी खटपट चालू आहेच. कांही मोठ्या संस्थांना सदरहु पत्रकें मिळूं लागलीं आहेत. ग्रंथालयें रजिस्टर झाल्यावर हा प्रश्न पुन्हा योग्य परिस्थिति प्राप्त होतांच हातीं घेण्यांत येअील.

(५) सार्वजनिक ग्रंथालयांतील कार्यकर्ते आणि दुय्यम व कॉलेज शिक्षणसंस्थांमधील ग्रंथालयाधिकाऱ्यांकरिता अेक अल्पमुदतीचा लायब्ररीशिक्षणक्रम लवकरच करण्याची खटपट सुरू आहे. या बाबतींत सरकारी शिक्षणाधिकारी यांचें सहकार्य झाल्यास काम सुलभ होणार आहे. योजना पुढे मांडण्यांत आली असून विचार होत आहे.

# नियामक मंडळाची सभा



परिषदेच्या नियामक मंडळाची सभा रत्नागिरी येथील पटवर्धन हायस्कूलच्या गोडबोल हॉलमध्ये ता. ३ मे १९४० शुक्रवारीं रात्रीं १० वाजता परिषदेचे अेक अुपाध्यक्ष श्रीमंत सरदार मा. वि. किबे यांच्या अध्यक्षतेखालीं भरली. सभेस पुढील १५ सभासद अुपस्थित होतेः-

मा. वि. किबे, के. ना. काळे, गं. गो. कानेटकर, शकुंतलाबाई परांजपे, रा. ब. हिवरगांवकर, द. वा. पोतदार, रा. श्री. जोग, अ. ना. भालेराव, वा. दा. गोखले, वा. म. जोशी, स. रं. सुंठणकर, श्री. ना. बनहट्टी, भा. ल. पाटणकर, श्री. ग. देवरुखकर, वि. ह. निजसुरे.

मागील संमेलनापूर्वी व संमेलनानंतर भरलेल्या नियामक मंडळाच्या दोन्ही सभांचे वृत्तान्त वाचून पक्के करण्यांत आले.

खालील दुखवट्याचे ठराव सभेपुढे मांडले असतां त्यांस सर्वांनी अुभें राहून मान्यता दिली.—

**ठराव १—** मिरज (थोरली पाती) या संस्थानचे वयोवृद्ध आणि ज्ञानवृद्ध राजे श्रीमंत सर गंगाधरराव अुर्फ बाळासाहेब पटवर्धन, के. सी. आय. ई., यांना मिरज येथे सोमवारीं (११।१२।३९) देवाज्ञा झाली याबद्दल या सभेस अत्यंत दुःख होत आहे. श्रीमंत राजे बाळासाहेब पटवर्धन हे मोठे साहित्यप्रेमी आणि कीर्तनसंस्थाभिमानी असून ज्ञानाभिवृद्ध्यर्थ त्यांनी अनेक ग्रंथ आणि शाळा अित्यादिकांना आर्थिक साहाय्य केलें होतें. ते स्वतः नीतिबलोत्साहवर्धक, विद्वत्त्वप्रचुर आणि वक्तृत्वयुक्त कीर्तनें करीत; आणि १९२५ सालीं मुंबअी येथे झालेल्या म. सा. संमेलनाचें अध्यक्षस्थान त्यांनी भूषित केलें होतें. त्यांच्या निधनाने त्यांच्या प्रजाजनांस आणि आप्तेष्टमित्रांस होणाऱ्या दुःखांत ही सभा सहभागी आहे.

**ठराव २—** जळगांव येथील १९३६ या वर्षी भरलेल्या म. सा. संमेलनाचे अध्यक्ष, म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे सदस्य व माजी चिटणीस आणि म. सा. पत्रिकेचे माजी संपादक डॉ. माधवराव पटवर्धन यांच्या ता. २९।११।३९ या दिवशीं झालेल्या शोचनीय मृत्यूमुळे या सभेस अत्यंत दुःख होत आहे. प्रतिभावान् कवि, रसिक आणि मार्मिक टीकाकार, चिकित्सक आणि मूलग्राही छंदःशास्त्रज्ञ, परिश्रमी आणि व्युत्पन्न कोशकार, फारशी भाषेचे पारंगत अभ्यासक, मराठी भाषेचे निःसीम अभिमानी, प्रेमळ आणि व्यासंगी प्राध्यापक, समंजस व निर्भय समाजसुधारक आणि तेजस्वी व सच्छील व्यक्ति या नात्यांनी डॉ. माधवराव पटवर्धन यांची योग्यता थोर होती. अशा थोर व्यक्तीच्या अकालीं निधनाने मराठी भाषेची, वाङ्मयाची आणि अखिल महाराष्ट्रीय जनतेची अपरिमित हानि झाली आहे.

**ठराव ३—** (१) श्री. दुर्गाप्रसाद आसाराम तिवारी, (२) श्री. वामनशास्त्री किंजवडेकर, (३) श्री. गणेशशास्त्री फाटक, (४) श्री. सदाशिवशास्त्री भिडे, (५) श्री. अप्पाजी धुंडिराज मुर्तुले अुर्फ कवि 'सुमंत', (६) श्री. महादेव राजाराम बोडस, (७) श्री. गोविंद

पांडुरंग पावशे, (८) श्री. केशवराव छापखाने, (९) श्री. द्वारकानाथ गोविंद वैद्य, (१०) डॉ. मालचंद्र सीताराम सुकथनकर, (११) श्री. नानासाहेब सरपोतदार, (१२) श्री. सीतारामपंत बाबाजी गुर्जर, (१३) श्री. पु. वा. फाटक, (१४) श्री. श्रीकृष्ण विठ्ठल आठल्ये वगैरे जे साहित्यभक्त व साहित्यसेवक कालवश झाले त्यांच्या निधनाबद्दल या संमेलनास अतिशय दुःख होत आहे.

कार्यकारी मंडळाने तयार केलेलें १९३९ या वर्षाचें अितिवृत्त व हिशेब हीं सभेपुढे मांडलीं असतां तीं सभेने मंजूर करावीं याबद्दलची सूचना प्रो. वा. म. जोशी यांनी मांडली. तीस प्रो. गं. गो. कानेटकर यांनी रीतसर अनुमोदन दिल्यानंतर वरील अितिवृत्त व हिशेब सभेने मान्य केले.

अि. स. १९३९ या वर्षी अंदाजपत्रकापेक्षा खालील बाबींत अधिक खर्च झाला:—

कचेरीखर्च रु. ४२–८–९, परीक्षा ४४–११–९, श्रीमंत गायकवाड सरकार मानपत्र खर्च रु. ९१–१४–०, प्रॉव्हि. फंड २१, अितर १०–४–०.

वरीलप्रमाणे जो अधिक खर्च झाला त्याबद्दलचा खुलासा कार्याध्यक्षांनी केल्यानंतर हा खर्च मंजूर करावा अशी प्रो. रा. श्री. जोग यांनी सूचना मांडली. तीस प्रो. गं. गो. कानेटकर यांनी अनुमोदन दिल्यानंतर ही सूचना सभेने मान्य केली.

यानंतर १९४० या वर्षाकरिता कार्यकारी मंडळाने तयार केलेलें अंदाजपत्रक मंजुरीसाठी सभेस सादर करण्यांत आलें. खर्चाच्या बाजूकडील परिषदेच्या इतिहासास रु० २०० ची जी रकम कार्यकारी मंडळाने अंदाजिली आहे ती अपुरी पडेल, त्यासाठी अधिक रकमेची जरुरी लागेल असें प्रो. द. वा. पोतदार यांनी सांगितलें व या बाबतीत आपण परिषदेस लिहिलेलें पत्र विचारांत घ्यावें असें सुचविलें. हें पत्र वाचण्यांत आल्यावरून खालील ठराव प्रो. वा. म. जोशी यांनी मांडला:—

'परिषदेच्या अितिहासकार्याकरिता रु. २०० मंजूर झाले आहेत. त्यापेक्षा अधिक खर्च करणें अिष्ट वाटल्यास व शक्य असल्यास दीडशे रुपयांपर्यंत अधिक खर्च करण्यास नियामक मंडळाची कार्यकारी मंडळास अनुज्ञा आहे.'

या ठरावास श्री. के. ना. काळे यांनी अनुमोदन दिल्यानंतर हा ठराव सभेने मान्य केला.

यानंतर १९४० या सालाकरिता सभेपुढे मांडण्यांत आलेलें अंदाजपत्रक सभेने मंजूर करावें अशी सूचना प्रि. वा. दा. गोखले यांनी केली. तीस श्री. स. रं. सुंठणकर यांनी अनुमोदन दिल्यानंतर हें अंदाजपत्रक सभेने मंजूर केलें.

'वाङ्मयविहारमंडळ, नाशिक; साहित्यसेवामंडळ, अकोलें; रामबाग मोफत वाचनालय, इंदूर, व साहित्यसेवामंडळ, जळगांव या संलग्न संस्थांकडून बाकी वर्गणी व पत्राचीं उत्तरें येत नसल्यामुळें व त्यांच्या अस्तित्वाविषयी शंका येत असल्यामुळे नियामक मंडळाच्या संमतीने त्यांचीं नांवें पटावरून काढून टाकावीं.' हा कार्यकारी मंडळाचा ठराव सभेपुढे मांडण्यांत येअून तो सर्वानुमतें मंजूर झाला.

म. सा. प. (१३-३-११)

प्रो. ना. सी. फडके यांच्या कोल्हापूर गटांतील जागेच्या राजीनाम्यामुळे आणि कै. डॉ. मा. त्रिं. पटवर्धन व कै. डॉ. भा. सी. सुकथनकर या उभयतांच्या मृत्यूमुळे नियामक मंडळांतील रिकाम्या झालेल्या जागीं प्रो. द. सी. पंगू, डॉ. कृ. गो. गोसावी व श्री. दि. वि. अमोणकर यांची योजना व्हावी असें सभेने सर्वानुमतें ठरविलें.

पुढील संमेलनाचें अधिवेशन सोलापुरास भरविण्यास परवानगी मिळावी अशा आशयाचें सोलापूर येथील साहित्यसेवामंडळाच्या चिटणिसांचें कार्यकारी मंडळाकडे विचारार्थ आलेलें पत्र निर्णयासाठी कार्यकारी मंडळाकडून नियामक मंडळाच्या चालू सभेपुढे ठेवण्यांत आलें. घटना नियम ५२ प्रमाणे संमेलनाचें निमंत्रण परिषदेशीं 'संलग्न' अगर 'सहकारी संस्था' या नात्याने संबंध जोडलेल्या संस्थेकडून यावयाचें असतें. घटना नियम ५४ प्रमाणे हें निमंत्रण साहित्यसेवामंडळ, सोलापूर, या संस्थेकडून जरी ठरलेल्या मुदतींत आलें असलें तरी निमंत्रण पाठवितांना ही संस्था 'संलग्न' अगर 'सहकारी' म्हणून नोंदली गेली नव्हती म्हणून हें निमंत्रण नियमबाह्य होत असल्यांने त्याचा स्वीकार करतां येणार नाही असा आक्षेप सभेंत घेण्यांत आला. परंतु नियम ५४ प्रमाणे कोणत्याहि संस्थेस संमेलनाचें निमंत्रण देतां येतें, मात्र संमेलनाच्या वेळेपावेतो ही संस्था नियम ५२ प्रमाणे 'संलग्न' अगर 'सहकारी' म्हणून नोंदली गेली पाहिजे, असा ५२ व ५४ या नियमांचा अर्थ होत असल्याचें श्री. के. ना. काळे यांनी सभेच्या निदर्शनास आणिलें. ह्या मुद्यावर चर्चा होऊन मतें घेण्यांत आलीं. दोन्ही बाजूंस सारखींच मतें पडल्याने अध्यक्षांनी आपलें निर्णायक मत श्री. के. ना. काळे यांच्या बाजूने दिलें. अर्थात् साहित्यसेवामंडळ, सोलापूर, या संस्थेचें निमंत्रण रीतसर असल्याचें ठरलें. वरील निर्णयानंतर साहित्यसेवामंडळ, सोलापूर, या संस्थेचें निमंत्रण व पूर्वीच संमेलनाकडे पाठविलेलें दक्षिणी संस्थान साहित्यसभा, सांगली, या संस्थेचें निमंत्रण, या निमंत्रणांपैकी कोणत्या निमंत्रणाचा स्वीकार संमेलनाने करावा, याबद्दल परिषदेच्या नियामक मंडळाने आपला अभिप्राय स्पष्ट केल्यास निर्णय ठरविण्याच्या कामीं संमेलनासहि या अभिप्रायाची मदत व्हावी म्हणून ह्या तऱ्हेची अेखादी शिफारसवजा सूचना नियामक मंडळाने जरूर करावी असें साहित्यसेवामंडळाचे चिटणीस श्री. शं. गो. पटवर्धन यांनी सुचविलें. त्यावरून साहित्यसेवामंडळ, सोलापूर, व दक्षिणी संस्थान साहित्यसभा, सांगली, या संस्थांकडून पुढील संमेलन भरविण्यासाठी जीं निमंत्रणें परिषदेकडे आलीं आहेत त्यांपैकी साहित्यसेवामंडळ, सोलापूर, या संस्थेचें निमंत्रण स्वीकारलें जाण्याबद्दलची शिफारस नियामक मंडळाने संमेलनास करावी असें सभेने बहुमताने ठरविलें.

अहमदनगर साहित्य संमेलनांतील ठरावांच्या अंमलबजावणीविषयीचा कार्यकारी मंडळाने तयार केलेला छापील वृत्तान्त सभेस सादर करण्यांत आला. नगर संमेलनाचे अध्यक्ष प्रो. पोतदार यांनी याचविषयी आपल्या कार्याचा चिटणिसांकडे पाठविलेला अहवाल व त्याबद्दलच्या खुलाशाचें पत्र सभेस सादर करण्यांत आलें. हा विषय पुन्हा साधारण सभेपुढे येत असल्याने याबद्दलचा विचार साधारण सभेने करावा त्या वेळीं करावा असें ठरलें. हीं कामें झाल्यानंतर अध्यक्षांनी सभा बरखास्त केली.

---

## नियामक मंडळाची दुसरी सभा

घटना नियम ३० प्रमाणे संमेलनाच्या अधिवेशनानंतर संमेलनस्थळीं होणारी नियामक मंडळाची सभा संमेलनमंडपांत ता. ६ मे सोमवारीं दुपारीं १२ वाजतां भरली. सभेस पुढील १२ सभासद अुपस्थित होते :— द. वा. पोतदार, वा. म. जोशी, वा. दा. गोखले, अ. ना. भालेराव, श्री. ग. देवरुखकर, स. रं. सुंठणकर, कृ. ग. लिमये, य. रा. दाते, गं. गो. कानिटकर, म. रा. पाळंदे, ना. सी. फडके, श्री. ना. बनहट्टी. अुपाध्यक्ष प्रो. द. वा. पोतदार हे अध्यक्षस्थानीं होते.

प्रो. वा. म. जोशी यांनी खालील ठराव मांडला :—

'रत्नागिरी साहित्य संमेलनांत मान्य झालेले ठराव कार्यकारी मंडळाकडे पुढील व्यवस्थेसाठी पाठवावे.'

या ठरावास श्री. य. रा. दाते यांनी अनुमोदन दिल्यानतर हा ठराव सर्वानुमतें सभेने मान्य केला.

घटना नियम ४९ प्रमाणे खालील गृहस्थांचें संपादकमंडळ नियुक्त करण्यांत आलें :–

१ प्रो. द. वा. पोतदार, २ श्री. कृ. ग. लिमये व ३ श्री. श्री. म. वर्दे.

याप्रमाणे कामें झाल्यानंतर सभा बरखास्त करण्यांत आली.

---

## वार्षिक साधारण सभा

परिषदेची वार्षिक साधारण सभा ता. ४ मे १९४० शनिवारीं दुपारीं २ वाजतां रत्नागिरी येथे पटवर्धन हायस्कूलमधील गोडबोले हॉलमध्ये भरली होती. अध्यक्षस्थानीं परिषदेचे अेक अुपाध्यक्ष श्रीमंत सरदार मा. वि. किबे हे होते. खालील २७ सभासद सभेस आले होते :–

वि. पां. नेने, दि. वि. अमोणकर, के. रा. पुरोहित, स. रं. सुंठणकर, गो. शि. अुपळेकर, रा. ब. हिवरगांवकर, ज. अे. नरवणे, रा. ने. शहा, द. व. मुद्गल, शं. नी. जामदार, रा. अ. क्षीरसागर, सी. न. जोशी, वि. ह. निजसुरे, के. ना. काळे, वा. रा. ढवळे, रा. श्री. जोग, य. रा. दाते, भा. वि. वरेरकर, सौ. कुसुमावती देशपांडे, श्री. ना. बनहट्टी, गं. गो. कानेटकर, नी. शं. नवरे, द. वा. पोतदार, वा. दा. गोखले, वा. म. जोशी, मा. वि. किबे, अ. ना. भालेराव.

१ गेल्या वार्षिक साधारण सभेचा वृत्तान्त वाचून पक्का करण्यांत आला.

२ नियामक मंडळाच्या ता. ३ मे १९४० च्या सभेंतील ठरावाप्रमाणे दिवंगत साहित्यिक व साहित्यभक्त यांच्या मृत्यूबद्दल दुखवट्याचे ठराव अध्यक्षांनी मांडले व त्यांस सर्वांनी अुभें राहून मान्यता दिली.

३ अध्यक्षांनी १९३९ या वर्षाचें छापील अितिवृत्त व हिशेब हीं सभेपुढे मांडलीं व त्यांस सभेने मान्यता दिली.

४ १९४० या वर्षाकरिता श्री. द. दा. देशपांडे व श्री. म. वि. गोखले यांची हिशेब-तपासनीस म्हणून नेमणूक करावी अशी सूचना प्रो. वा. म. जोशी यांनी केली. तीस डॉ. अ. ना. भालेराव यांनी अनुमोदन दिल्यानंतर सभेने ती मान्य केली.

५ अहमदनगर साहित्य संमेलनांतील ठरावांच्या अंमलबजावणीचा वृत्तान्त सभेस सादर करण्यांत आला. या संमेलनाचे अध्यक्ष प्रो. पोतदार यांच्या अध्यक्षीय कामाचा छापील अहवाल व त्यासंबंधीचें अेक पत्र त्यांजकडून आलें तेंहि सभेस सादर करण्यांत आलें. या विषयाबद्दल थोडीशी चर्चा झाल्यानंतर प्रो. वा. म. जोशी यांनी खालीलप्रमाणे ठराव मांडला :–

"नगर-संमेलनाध्यक्ष प्रो. पोतदार यांच्या पत्रांतील सूचनेनुसार संमेलन ठराव अंमल-बजावणी करण्याच्या दृष्टीने निधि निर्माण करून याबद्दल कार्यकारी मंडळाने अेखादी योजना नियामक मंडळापुढे सादर करावी व त्याची संमति मिळाल्यानंतर ही योजना अंमलांत आणावी."

या ठरावास प्रो. श्री. ना. बनहट्टी यांनी अनुमोदन दिल्यानंतर हा ठराव सभेने मान्य केला.

६ मागील संमेलनाने घटनानियम ५५ मध्ये फेरफार करण्याबद्दल जी शिफारस परिषदे-कडे केली होती तीअन्वयें खालीलप्रमाणे ठराव प्रो. वा. म. जोशी यांनी सभेपुढे मांडला व त्यास श्री. रा. ब. हिवरगांवकर यांनी अनुमोदन दिल्यानंतर हा ठराव सभेने सर्वानुमतें मान्य केला :–

"घटना नियम ५५ च्या २ च्या ओळींतील 'सूचित नांवें' या शब्दांनंतर असलेला वाक्याचा भाग गाळून त्याजागीं पुढील शब्दांची योजना करावी– 'पाहून निवडून आल्यास जे अध्यक्षीय काम करण्यास संमति दर्शवितील अशांचीं नांवें चिटणीसांनी नियामक मंडळाच्या सभासदांकडे लेखी मताकरिता पाठवावीं'."

हीं कामें झाल्यानंतर अध्यक्षांनी सभा बरखास्त केली.

अनुक्रमणिका

# परिषद्वार्ता

(चिटणिसांकडून)

ता. ३ व ६ मे आणि ९ जून व २८ जुलै याप्रमाणे अेकूण कार्यकारी मंडळाच्या चार सभा झाल्या.

ता. ३ मे या दिवशीं झालेल्या कार्य. मंडळाच्या सभेंत खालील दुखवट्याचा ठराव झाला:-

"महाराष्ट्रांतील अेक नट, नाटककार, चित्रपटकथालेखक व चित्रपटदिग्दर्शक रा. न. दा. अुर्फ नानासाहेब सरपोतदार यांना मंगळवार ता. २३।४।४० रोजीं देवाज्ञा झाली हें नमूद करण्यास म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळास दुःख होत आहे. रा. सरपोतदार यांचीं 'बाजीरावाचा बेटा', 'रुक्मिणीस्वयंवर', 'भगवा झेंडा', 'संत जनाबाई', 'अुमाजी नाअीक', 'ताअी तेलीण', 'चंद्रराव मोरे' अित्यादि बोलपट व नाटकें अुल्लेखनीय आहेत. त्यांच्या निधनामुळे त्यांच्या आप्तेष्टांना झालेल्या दुःखांत हें कार्यकारी मंडळ सहभागी आहे."

'साहित्यसेवामंडळ, सोलापूर' या संस्थेस परिषदेची संलग्न संस्था म्हणून मान्यता देण्यांत आली.

६ मे व ९ जून या तारखांस भरलेल्या सभांत रत्नागिरी संमेलनांत मान्य झालेल्या ठरावांची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने चर्चा झाली.

ता. २८ जुलैच्या सभेंत आचार्य परिक्षेचा अभ्यासक्रम निश्चित तयार करण्याच्या दृष्टीने चर्चा झाली. पूर्वीच्या समितीने तयार केलेला अभ्यासक्रम लक्ष्यांत घ्यावा व कार्य. मंडळाच्या सभासदांच्या सूचना मागवून त्यानंतर हा अभ्यासक्रम पक्का करून प्रसिद्ध करावा असें ठरलें.

संमेलन— महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें २४ वें अधिवेशन रत्नागिरी येथे ता. ४, ५ व ६ मे या तारखांस सुप्रसिद्ध कादंबरीकार प्रो. नारायण सीताराम फडके यांच्या अध्यक्षतेखाली मोठ्या अुत्साहाने भरलें. संमेलनाचे स्वागताध्यक्ष सुप्रसिद्ध नाटककार श्री. भा. वि. वरेरकर हे होते. संमेलनाचें अुद्घाटन हर हायनेस श्रीमंत रीजंट राणीसाहेब, सावंतवाडी, यांनी केलें. संमेलनास जोडून चित्रकलाविषयक विभाग-संमेलनहि भरविण्यांत आलें होतें. या संमेलनास प्रख्यात शिल्पकार श्री. वि. पां. करमरकर हे अध्यक्ष लाभले असून स्वागताध्यक्षाचें काम श्री. व. र. आंबेरकर यांनी केलें. संमेलनांत मान्य झालेले ठराव याच अंकांत अितरत्र छापले असून त्यांची अंमलबजावणी करण्याचें काम चालू आहे.

म. सा. संमेलनाचें पुढील अधिवेशन सोलापुरास भरविण्याबद्दलचें निमंत्रण 'साहित्यसेवामंडळ, सोलापूर' या संस्थेने दिलें असून संमेलनाने तें मान्य केलें आहे.

अहमदनगर संमेलनाचा अहवाल रत्नागिरी संमेलनापूर्वीच प्रसिद्ध केला गेला असून या संमेलनांतील ठराव अंमलबजावणीचा वृत्तान्त याच अंकीं अितरत्र छापला आहे.

अनुक्रमणिका

परीक्षा— प्राज्ञ परिक्षेच्या पद्यप्रश्नपत्रिकेकरिता नेमिलेला महाराष्ट्र रसवंतीचा तिसरा भाग केवळ स्थूल वाचनासाठी (Rapid Reading) योजिला आहे.

देणग्या— प्रो. त्र्यं. शं. शेजवलकर, पुणें, व दि. ब. ल. पां. कुलकर्णी, कुंरुंदवाड, यांनी प्रत्येकीं रु. ५० प्रमाणे परिषदेच्या इमारतनिधीस देणग्या दिल्या आहेत. त्याबद्दल परिषद् त्यांची आभारी आहे.

अितर— ता. २४।४।४० रोजीं सायंकाळीं ६ वाजतां रत्नागिरी संमेलनाचे अध्यक्ष प्रो. ना. सी. फडके यांचा सत्कार प्रो. द. वां. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली परिषदेतर्फे करण्यांत आला. या समारंभास सुमारे १००–१२५ मंडळी हजर होती. प्रो. के. ना. वाटवे, प्रो. रा. श्री. जोग, प्रो. वा. म. जोशी, श्री. गं. भा. निरंतर यांचीं गौरवपर भाषणें झालीं.

परगांवांहून पुण्यांत आलेल्या पाहुण्यांनी परिषदेच्या कार्यालयास भेट द्यावी व परिषदेच्या कार्याविषयी त्यांजकडून कांही सूचना मिळाव्या या अुद्देशाने प्रतिवर्षाप्रमाणे सुमारे ६० सद्गृहस्थांस निमंत्रणें केलीं होतीं. हा कार्यक्रम ता. ५ जून रोजीं सायंकाळीं ६ वाजतां परिषदेच्या कार्यालयांत करण्यांत आला. परिषदेचे स्थानिक सभासदहि या वेळीं अुपस्थित असून या प्रसंगीं सुमारे १००-१५० मंडळी हजर होती.

परिषदेचे अेक अुपाध्यक्ष प्रो. पांडुरंग वामन काणे यांच्या शष्ठ्यब्दिपूर्तिनिमित्त ता. २७ जुलै रोजीं पुणे येथे झालेल्या सत्कारसमारंभांत म. सा. परिषदेने भाग घेतला होता.

## नवीन सभासद

### तहहयात

१ प्रो. त्र्यंबक शंकर शेजवलकर, पुणें

### साधारण

२ श्री. यशवन्त बाळाजी शास्त्री, पुणें
३ ,, विनायक विष्णु रानडे ,,
४ सौ. लक्ष्मीबाई यशवंत धर्माधिकारी, पुणें
५ प्रो. मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष, मुंबई
६ ,, गणेश शंकर चुनेकर, काशी
७ डॉ. नरसिंह नारायण गोडबोले, काशी
८ प्रो. (कु.) चंपावती वासुदेव केतकर, लष्कर
९ श्री. महादेव कृष्ण मालसे, खेड
१० ,, विष्णु नारायण मराठे, कलकत्ता
११ ,, काशीनाथ भिकाजी जोशी, मुंबई
१२ ,, दामोदर महादेव गोवित्रीकर, सोलापूर
१३ ,, सदाशिव अनंत शुक्ल, मुंबई
१४ ,, दत्तात्रेय अनंत देशपांडे, पुणें

### तहहयात (साधारणांतून)

१ श्री. यशवंत रामकृष्ण दाते, पुणें
२ दि. ब. लक्ष्मण पांडुरंग कुलकर्णी, कुरुंदवाड

# परिभाषा-वृत्त



(१) 'पत्रिके'च्या गेल्या अंकीं परिभाषा-चर्चा-मंडळाच्या अहवालांत औद्भिद किंवा वनस्पतिविषयक परिभाषेवर कांही चर्चा झाल्याचा अुल्लेख केला होता. या विषयावर शक्य तितकी सर्वांगीण चर्चा व्हावी आणि औद्भिदविषयक परिभाषेच्या निश्चितीचा प्रश्न मार्गी लागावा म्हणून चरकतीर्थ श्री. बक्षी यांनी मुद्दाम लिहिलेला लेख या अंकांत प्रसिद्ध झाला आहे. जुन्या संस्कृत वाङ्मयांतील अेतद्विषयक शब्दभांडार मराठी वाचकांपुढे मांडावयाचें अेवढाच या लेखाचा मुख्य हेतु आहे. तो ध्यानांत घेऊन 'पत्रिके'च्या शास्त्राभ्यासक वाचकांनी आधुनिक औद्भिद किंवा वनस्पतिशास्त्राला सोअीस्कर अशी परिभाषा या जुन्या शब्दांतून कितपत निवडतां येअील याविषयीचीं आपलीं मतें कळविल्यावर, किंवा जरूरीप्रमाणे अितर, नवी परिभाषा सुचविल्यास, योग्य त्या परिभाषेची निवड करणें सोपें जाअील.

(२) चालू अहवालाच्या तिमाहींत चर्चा-मंडळाच्या चार बैठकी झाल्या. ता. ११ अेप्रिलच्या बैठकींत श्री. त्र्यं. गो. ढवळे यांनी रावब. सहस्रबुद्धे यांच्या 'विश्वविहार' या पुस्तकांतील ज्योतिर्विषयक विभागांतील विश्वकल्पना, परिभाषेचा अुपयोग करून, विस्तृतपणें मांडली. मूळ पुस्तकांत परिभाषा फारशी नाही. Nebula या अर्थी मराठींत तेजोगोल, तारकागुच्छ अि० चुकीचे शब्द वापरले जातात त्यांअैवजीं 'अभ्रिका' म्हणावें आणि आकाशगंगा हा ज्याचा भाग आहे अशा विश्वद्वीपाला ( Island Universe ला ) 'दीर्घिका' म्हणावें म्हणजे मग दीर्घिकेय अक्ष, दीर्घिकेय ध्रुव वगैरे अितर आवश्यक परिभाषा बनेल असें श्री. ढवळे यांनी सुचविलें.

आकाश ( Sky ), अवकाश ( Space ), आकार ( Size ), आकृति ( Shape ), यंत्र ( Machine ), साधन ( Instrument ), उपाकृत (Apparatus ) यांतले कांही शब्द मराठींत निष्काळजीपणाने वापरले जातात. निश्चित अर्थच्छटांची जरूरी ध्यानांत घेतां ते योग्य अर्थी वापरले जावेत असें प्रो. आपटे यांनी सुचविलें.

ता. ९ मे च्या बैठकींत प्रो. स. वि. आपटे यांनी 'ध्वन'विषयक कांही परिभाषा वापरून दाखविली. त्या वेळीं 'ध्वनि' हा शब्द केवळ कर्णग्राह्य संवेदनांना लावावा, 'ध्वन' शब्दाने कर्णनिरपेक्ष-वस्तुगत-तरंग सुचवावेत, आणि 'ध्वान' हा शब्द disturbance या अर्थी वापरावा, तसेंच 'स्वर' हा केवळ स्वरव्यंजनादि व्यवस्थेसाठी राखून ठेवावा आणि गायनव्यवस्थेंत 'सूर' वापरावा असें त्यांनी सुचविलें.

ता. १३ जूनच्या बैठकींत नागपूरचे प्रा. डॉ. वि. ना. थत्ते यांनी १९३२ च्या फिलॉसॉफिकल मॅगेझिनमधील आपल्या शोधनिबंधाचा आशय मराठींत मांडला त्याचा सारांश असा :—

गारेच्या रवकांत किंवा स्फटिकांत ( Crystal ) तीन अक्ष ( Axis ) असतात, प्राकाशिक (Optical), वैजिक (Electrical) आणि यामिक (Mechanical). वैजिक अक्षाशीं काटकोन करील अशी रवकाची चकती घेतली तर तिच्यावर अेका बाजूला यामिक आंदोलनें निर्माण केल्याने दुसऱ्या बाजूला वैजिक किंवा वैजिव, निर्माण केल्याने यामिक, आंदोलनाने अुत्पन्न होतात. त्यांची क्षिप्रता जास्तींत जास्त जाड चकतीला पांच सहस्र वि.ग.प. पासून अतिपातळ चकतीला १·५ प्रयुत वि. ग. प. पर्यंत असते. तपमान (Temperature) वाढवीत गेल्याने या क्षिप्रतेंत कसकसे फेरफार होतात हें पाहण्यासाठी प्रयोग केले तेव्हा डॉ. थत्ते यांना असें आढळलें कीं तपमानाच्या फेरफाराशीं रवकाच्या अुत्पीडवैजिक आंदोलनक्षिप्रतेचा (Frequency of piezo-electric oscillations) संबंध अपास्ताकृतीने (Hyperbola) दाखवतां येतो. ५७३ अंशाला तपमान जातें तेव्हा ही आकृति आपल्या स्पर्शान्तिकेला भिडते. या सुमाराला गारेंतील अुत्पीडवैजिक धर्म नाहीसे होतात.

ता. ११ जुलैच्या बैठकींत प्रो. मो. ल. चंद्रात्रेय यांनी कलनशास्त्र (Calculus) विषयक कांही परिभाषा मांडली. यांतील कांही शब्द खुद्द प्रो. चंद्रात्रेय यांनीच ज्ञानकोशांतील आपल्या शून्यलब्धांवरील लेखांत वापरून दाखवलेले आहेत.

(३) मद्रास सरकारने नेमलेल्या परिभाषा-समितीचे अध्यक्ष ने. ना. श्रीनिवासशास्त्री यांच्या विचारणेवरून त्यांना महाराष्ट्रांतील परिभाषाविषयक परिस्थिति कळविली.

त्र्यं. गो. ढवळे,
कार्यवाह, परिभाषा-चर्चामंडळ.

# संपादकीय



महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा तेराव्या वर्षाचा हा तिसरा अंक वास्तविक पाहतां तीन-चार आठवड्यांपूर्वीच वाचकांच्या हातीं पडायला पाहिजे होता. परंतु अनेक अनिवार्य अडचणींमुळे तो तसा पडूं शकला नाही याबद्दल मी मनःपूर्वक खेद व्यक्त करतों.

मागील अंक निघाल्यानंतर महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें २४ वें अधिवेशन रत्नागिरी येथे भरलें. त्यानंतरचा पत्रिकेचा हा पहिलाच अंक. तेव्हा संमेलनविषयक कांही गोष्टींचा अितक्या अुशीराहि या ठिकाणीं अूहापोह करणें अप्रस्तुत ठरणार नाही, असें मी धरून चालतों. अलीकडे साहित्यसंमेलन हा कांहीसा मामुली स्वरूपाचा अेक वार्षिक समारंभ होऊन बसला आहे. परंतु या वर्षी प्रा. फडके यांच्यासारखा धडाडीचा व आपण आपल्या भाषणांत जें अुपदेशिलें तें अुत्साहाने साक्षात् प्रचारकार्य करून प्रत्यक्षांत आणण्याचा प्रयत्न करण्याची अुमेद बाळगणारा, प्रतिभासंपन्न, कला-पण्डित अध्यक्ष साहित्यसंमेलनाला लाभल्यामुळे ज्यावर मतामतांचा गलबला माजेल असेंच विचारसूत्र अध्यक्षीय भाषणांत गोवलें जाअूं शकलें. रत्नागिरी येथे भरलेल्या चोविसाव्या साहित्यसंमेलनाचा हा अभिनंदनीय विशेष होय. प्रा. फडके यांचें अध्यक्षीय भाषण, आतापर्यंतच्या संमेलनाच्या अध्यक्षांच्या भाषणांतून जी अेक विशिष्ट परंपरा आणि पद्धति प्रकट होत असलेली दिसत होती, तीहून बरेंच वेगळ्या स्वरूपाचें होतें. संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांत कांहीतरी महत्त्वाच्या साहित्यिक प्रश्नांची विशेष खोल आणि विद्वत्तापूर्ण अशी छाननी होअून तिला अनुसरून त्याबाबत कांहीतरी स्पष्ट स्वरूपाचे निष्कर्ष मांडले जावेत, अशी अध्यक्षीय भाषणाबद्दल साहित्यिकांची अपेक्षा असते. प्रा. फडके यांनी अेवढीच अपेक्षा गृहीत धरून आपलें भाषण लिहिण्याचें ठरवलें असतें, तर तसा अेखादा केवळ साहित्यिक महत्त्वाचा विषय घेअून त्याचा विद्वत्ताप्रचुर अूहापोह करणें त्यांना कठीण किंवा अशक्य होतें, असें त्यांचा अेखादा शत्रूहि म्हणूं शकणार नाही; पण त्यांनी तसें न करतां त्या ठरीव परंपरेकडे पाठ फिरवली. तत्त्वमीमांसकांच्या अुत्तानभ्रू (High-brow) भूमिकेचा त्याग करून साहित्यक्षेत्रांतील राबत्या कार्यकर्त्यांच्या व्यावसायिक जीवनक्रमांत शल्याप्रमाणे सलत राहणाऱ्या लौकिकसमस्यांकडे आपली दृष्टि वळवली आणि त्यांच्या स्वरूपाचें आत्मप्रत्ययाने व पोटतिडकीने विवेचन केलें, त्यांच्यावर अुपाययोजना करण्याबाबत चर्चा केली आणि त्याबाबत जें अनिष्ट व त्याज्य आहे त्याचें निर्मूलन करण्यासाठी जातीने प्रयत्न करण्याचा चंग बांधला, हें प्रा. फडके यांच्या अुत्साही व कार्यप्रवण स्वभावाशीं सर्वस्वीं सुसंगत असेंच झालें. आपल्याला दिलेलें अध्यक्षपदाचें मानाचें स्थान केवळ आपल्या पूर्वीच्या साहित्यसेवेचें चीज आणि पारितोषिक अेवढ्याच दृष्टीने नव्हे, तर आजच्या मराठी साहित्यक्षेत्रांतील अेक आघाडीवरील लढवय्या कलमबहादर या नात्याने आपण अधिकाराने भूषित करूं शकतों, असें त्यांनी सिद्ध केलें आहे. आपल्या अध्यक्षीय भाषणांत आजच्या वृत्तपत्रव्यवसायांतील त्यांनी दूषणाई म्हणून अुल्लेखिलेल्या ग्राम्य विनोद व असभ्य वैयक्तिक टीका या विशेषांपासून अलिप्त राहणारें आदर्श वृत्तपत्र कसें असलें पाहिजे, याचें प्रात्यक्षिक वृत्तपत्र चालकांपुढे व वाचकांपुढें ठेवण्यासाठी, त्यांनी शिरोभागीं

'ग्राम्य विनोद व असभ्य टीका यांपासून सर्वस्वी अलिप्त असें' असें प्रतिज्ञापूर्वक ध्येय मिरविणारें 'झंकार' साप्ताहिक दिग्दर्शनार्थ आपल्या कर्णधारत्वाखाली घेतलें, हें त्यांनी आपल्या भाषणांत मांडलेल्या विचारांबाबत त्यांची कशी दृढ व प्रामाणिक निष्ठा आहे, याचें पुरेपूर प्रत्यन्तर आहे. त्यांच्या त्या धडाडीच्या प्रामाणिक प्रयत्नांना यश लाभून त्यांच्याकडून साहित्यक्षेत्रांत युगान्तर घडो अशी पत्रिकेच्या वतीने मी शुभेच्छा प्रकट करतों.

परंतु प्रा. फडके यांच्या अध्यक्षीय भाषणांतील सर्वच विचारांशीं व अुपायांशीं मी पूर्ण-पणें सहमत होअूं शकत नाहीं. त्यांच्या विचारसरणींत बरेंच तथ्य असलें, तरी तींत विवाद्य व विचारार्ह असे मतभेदाचे मुद्देहि बरेच आहेत, असें मला वाटतें. या दृष्टीने या विषयाची तात्त्विक चर्चा होणें आवश्यक आहे; आणि शक्य तर ती साहित्यपत्रिकेंतूनच व्हावी, असें कांहींसें स्वार्थी दृष्टीने, मला वाटलें तर तें स्वाभाविकच असल्यामुळे, साहित्याचार्य श्री.तात्यासाहेब केळकर यांना त्यांच्या लेखासाठी मीं तोच विषय नम्रपणें सुचविला. श्री. तात्यासाहेब केळकर यांनी अुदार अंतःकरणाने वेळांत वेळ काढून त्या विषयावर जो लेख लिहून दिला, तो या अंकांत अग्रभागींच छापलेला आढळेल. श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या या लेखांत त्यांच्या अधिकार-वाणीने जे अुद्बोधक विचार प्रकट केले गेले आहेत, त्यांनी या विषयाच्या चर्चेला सुरवाती-लाच जोराची चालना मिळाल्यावांचून राहणार नाही, असा भरवसा वाटतो. याच विषयावर प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांनीहि लेख लिहिण्याचें कबूल केलें होतें. परंतु प्रकृतीचें अस्वास्थ्य आणि कार्यबाहुल्य या कारणांनी त्यांना लेख लिहिण्यास अवसर मिळूं शकला नाही; यामुळे वाचकांना त्यांच्या लेखासाठी पुढील अंकापर्यंत वाट पाहत ताटकळत राहणें भाग आहे.

रत्नागिरी येथे भरलेल्या साहित्य-संमेलनांत झालेलें कार्य व त्या संमेलनाचें अेकंदर स्वरूप याबद्दल प्रा. पोतदार यांनी संमेलनानंतर थोड्याच दिवसांत लोकशिक्षण मासिकांत विस्तृत व विचारार्ह असा अेक लेख अगोदरच लिहिला असल्यामुळे, त्याबाबत या ठिकाणीं फारसें लिहिण्याचें प्रयोजन नाही. परंतु रत्नागिरी येथील साहित्यसंमेलनासारखीं वार्षिक संमेलनें हीं औपचारिक व तांत्रिक रीत्या साहित्य-परिषदेच्या मार्फत भरणारीं असल्यामुळे, त्यांच्या-मधील अुण्याअधिकाची जबाबदारीहि प्रत्यक्षाप्रत्यक्ष रीतीने, ज्या ज्या ठिकाणीं तीं संमेलनें भरविण्यांत येतात त्या ठिकाणच्या स्थानिक कार्यकर्त्यांप्रमाणेच साहित्यपरिषदेच्या सभासदांवरहि येतेच येते. यामुळे रत्नागिरी येथील साहित्यसंमेलनप्रसंगीं कांही बाबतींत जी थोडीशी अनास्था व अव्यवस्था झाली तिची पुनरावृत्ति दुसरीकडे न होणें आवश्यक व अिष्ट आहे; व त्यासाठी संमेलनाच्या कार्यपद्धतीप्रमाणेच व्यवस्थापकीय बाजूलाहि कांहीतरी नियमित व शिस्तशीर स्वरूप देणें आवश्यक आहे; असें मला वाटतें. संमेलनाला येणारी थोर थोर मंडळी संमेलनाच्या अंत-रंगभूत कार्यांत व्यग्र असल्यामुळे व त्या कार्यपद्धतीचें स्वरूप बरेंचसें नियमित व सुसूत्र असल्या-मुळे, बाह्योपचारांत पडलेल्या अुणीवांची त्यांना तितकीशी क्षिति वाटत नाही, परंतु त्या ठिकाणीं अुपस्थित झालेल्या अितर सामान्य साहित्यप्रेमी माणसांना मात्र, संमेलन हें परिषदेचें अेक कार्य या दृष्टीने पाहतांना, त्यांतील व्यवस्थेच्या अंगांत व्यंग राहावें हें संमेलन व परिषद् या दोहोंच्याहि प्रतिष्ठेला हानिकारक वाटतें; व त्याबद्दल विषाद वाटल्यावांचून राहत नाही. याच दृष्टीने साहित्यसंमेलनासारख्या महत्त्वाच्या साहित्यसोहळ्याच्या प्रसंगीं पाहुण्यांच्या राहण्या-जेवण्याच्या व्यवस्थेबाबत व अितर अुपचारपालनाबाबत होणारी चालढकल व अव्यवस्था अुपे-क्षणीय नाही, असें मी म्हणतों.

असें विधान करतांना साहित्यसंमेलनाला अुत्साहाने आपल्या गांवीं आमंत्रण देणाऱ्या

स्थानिक साहित्यप्रेमी कार्यकर्त्यांच्या आतिथ्यशीलतेचा अधिक्षेप करण्याचा मात्र माझा मुळींच हेतु नाही; परंतु आमंत्रण देण्यापूर्वी त्यांनी आपल्या अुत्साही आदरशीलतेला आपल्या व्यवस्थापकीय शक्तीच्या व शक्यतेच्या पूर्वविचाराचीहि जोड दिलेली असावी, आपल्या गांवीं संमेलन करणें हें जसें मानाचें तसेंच जबाबदारीचेंहि आहे, याची त्यांनी जाणीव बाळगलेली असावी; अेवढेंच सूचित करण्याचा माझा अुद्देश आहे.

रत्नागिरी येथील साहित्यसंमेलनांत जे कांही कांहीसे अनुचित वाटण्यासारखे प्रकार झाले, त्यांमुळे जरी हे विचार आज येथे मांडण्याची जरूरी वाटली असली, तरी यापूर्वीच्या अितर कांही संमेलनांतूनहि असे कांहीच प्रकार झाले नाहीत असें नाही. हैदराबाद संमेलनापासूनच आक्षेपार्ह अशा कांही अुपचारभंगाच्या गोष्टी वर्तमानपत्रांतून टीकाविषय होत आलेल्या आहेत. तेव्हा रत्नागिरी संमेलन हें अपवादस्वरूप आहे, व तेथे ज्या कांही बऱ्यावाअीट गोष्टी झाल्या त्या फक्त तेथेच झाल्या, असें मात्र म्हणतां येणार नाही.

अुपचारविषयक गोष्टींमध्ये जिच्याकडे प्रामुख्याने लक्ष्य देणें आवश्यक आहे, अशी पहिली गोष्ट म्हणजे संमेलनाच्या प्रतिनिधि, प्रेक्षक वगैरे पाहुणे मंडळींची संमेलनाच्या मंडपांत यथानुक्रम व यथाधिकार बसविण्याची सोय व व्यवस्था करणें ही होय. पाहुणे व प्रतिनिधि यांची बसण्याची व्यवस्था अधिक पद्धतशीर रीतीने होणें दोन दृष्टींनी आवश्यक आहे. अेक तर संमेलनाच्या अधिवेशनाचें कामकाज सुसूत्र चालण्याच्या दृष्टीने आणि दुसरें म्हणजे पाहुण्यांचें योग्य रीतीने स्वागत होण्याच्या दृष्टीने. संमेलनांत अनेक वेळां मतभेदमूलक असे ठराव चर्चेसाठी पुढे येतात, आणि त्यांवर चर्चा झाल्यावर प्रत्यक्ष मतमोजणी करून बहुमताचें पाठबळ कोणत्या बाजूला आहे, याचा निर्णय अध्यक्षांना द्यावा लागतो. नगरयेथे प्रा. पोतदारांसारखा खंबीर अध्यक्ष नसता, तर ठरावांवरील मतमोजणीबाबत प्रतिनिधींच्या बसण्याच्या निश्चित व्यवस्थेच्या अभावीं केवढा गोंधळ माजला असता, हें त्या संमेलनाला हजर असलेल्यांना आठवत असेलच. साहित्यसंमेलनाला हजर राहणारे सर्वच पाहुणे जरी साहित्यसेवक व साहित्यभक्त असले, तरी ज्यांच्या त्यांच्या साहित्यसेवेच्या दर्जाच्या व प्रतिष्ठेच्या मानाने त्यांचें योग्य स्वागत होणें, त्यांची नीटपणें राहण्याची व्यवस्था होणें व त्यांची बरदास्त ठेवली जाणें, या गोष्टी व्यवस्थापकांच्या कार्यक्षमतेला भूषणभूत अशा समजल्या जाणें स्वाभाविक आहे. साहित्यिकांच्या निकट सहवासामुळे पुण्यामुंबअींत अशा रीतीची व्यवस्था ठेवणें अधिक सोपें आहे हें खरें; परंतु दूरच्या आडगांवींहि स्वागतमंडळाने आपल्यापैकीच अेखादा, साहित्यिक वातावरणाशीं परिचित असलेला अुत्साही सभासद "अुपचार-वाह" (Master of Ceremonies) म्हणून निवडला, तर हें कार्य बरेंचसें अधिक पद्धशीर रीतीने, जबाबदारीने पार पाडलें जाअील यांत शंका नाही.

या वर्षी रत्नागिरी येथील साहित्यसंमेलनावर वर्तमानपत्रांतून जी बरीचशी टीका झाली, तिचें कारण स्वागतविषयक योग्य अुपचारांकडे स्वागतसमितीचें बरेंचसें दुर्लक्ष झालें व त्यामुळे क्वचित् क्वचित् अनवस्थाप्रसंग निर्माण झाला हेंच होय. मंडपांतील व्यासपीठावर ठेवलेल्या खुर्च्या अनधिकारी व्यक्तींकडून अडविल्या गेल्यामुळे, पूर्वसाहित्यसंमेलनांचे अध्यक्ष, साहित्य-परिषदेचे कार्याध्यक्ष व अुपाध्यक्ष प्रा. वामनराव जोशी व दत्तोपंत पोतदार यांना अुपरण्याने जमीन झटकून जमिनीवरच आसनमांड्या ठोकून बसण्याची पाळी आली; आणि सरदार माधवराव व सौ. कमलाबाअीसाहेब किबे यांच्यासारख्या संमेलन व परिषद् यांच्या दीर्घकालीन आधारस्तंभांना मंडपांत बसावयालाहि जागा मिळवणें मुष्कील झालें. या गोष्टी निखालस चीड येण्यासारख्या होत्या. वृत्तपत्रप्रतिनिधींनी याबाबत आपल्या पत्रांकडे वार्ता पाठवितांना जरी कदा-

चित् थोडी अतिशयोक्ति आणि किंचित् अनृत प्रसार केला असला तरी तेथील स्वागतसमिती-कडून या बाबतींत दर्शविला गेलेला निष्काळजीपणा टीकास्पद व गर्हणीय होता यांत कांहीच संशय नाही.

या व्यवस्थापकीय निष्काळजीपणाच्या अनुषंगाने प्रस्तुत लेखकाच्या नावामेंहि अेक लहानसें पेल्यांतील वादळ वृत्तपत्रांतील कांही अितिवृत्तांवरून तेव्हा अुठलें होतें. साहित्य-पत्रिकेचा संपादक व कार्यकारी मंडळाचा अेक सभासद या नात्याची जबाबदारी रत्नागिरी-संमेलनांतील माझ्या हजेरीबाबत मजवर नसती, तर त्या वादळाचा व त्यांतील संबंधाचा अुल्लेख करून पत्रिकेची जागा अडविण्याचा धृष्टपणा मीं कधींच केला नसता. पण त्या नात्यांच्या जबाबदारीच्या जाणीवेने मला त्याचा अुल्लेख व निरास करणें आवश्यक वाटतें.

संमेलनाच्या अधिवेशनाच्या सुरवातीस व्यासपीठावर व मंडपांतील अग्रभागीं अधिकारी साहित्यश्रेष्ठींना बसविण्याबाबत जी अनास्था झालेली दिसून आली, तिच्याबद्दल अितर अनेक साहित्यप्रेमी सभासदांप्रमाणे मलाहि चीड येअून, मीं "हें साहित्यसंमेलन आहे का मीना-बाजार ?" असें आपल्या जागेवरून ओरडून विचारल्याचें किंवा कु. माअी वरेरकर यांना चिठी पाठवून हटकल्याचें वृत्त वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालें होतें. या गैरव्यवस्थेबाबत "मीनाबाजार" हे शब्द मीं वापरले ही गोष्ट खरी, पण ते मी सभेंतून ओरडलों, किंवा ते शब्द वापरून मीं कु. माअी वरेरकर यांना चिठी लिहिली, ही मात्र कपोलकल्पित दंतकथा होय. सभेचें मामुली काम चालू असतां व्यासपीठाच्यामागे आडोशाला ज्या शिळोप्याच्या गप्पासप्पा अशा संमे-लनांतून चालतात त्या चालू असतां अगदी सहजपणें, स्वागताध्यक्ष श्री. मामासाहेब वरेरकरांच्या कन्या कु. माअी वरेरकर यांच्याकडे, माझा त्यांच्याशीं तितका परिचय असल्यामुळे, मीं थट्टेने तशी पृच्छा केली होती; पण त्या अुद्गारांना प्रकट सार्वजनिक विधानाचें स्वरूप मात्र मुळींच नव्हतें; परंतु कदाचित् कुणातरी वार्ताहराच्या कानीं माझे ते शब्द प्रत्यक्ष वा कर्णोपकर्णी गेल्या-मुळे त्या अुद्गारांना विनाकारण अनिष्ट व अनपेक्षित प्रसिद्धि मिळण्याचा योग आला असावा. सुप्रसिद्ध अभिनेत्री कु. शांता आपटे याहि, संमेलनाच्या सुरवातीला नसल्या तरी नंतर कांही वेळाने, व्यासपीठावर आरूढ झालेल्या दिसल्यामुळे, माझ्या अुद्गारांचा त्यांच्या व्यासपीठावर बसण्याशीं संबंध जोडून कांही वृत्तपत्रांनी सहजासहजीं थोडीफार सवंग खळबळ माजविण्याची साजुक संधीहि साधून घेतली, असें दिसतें. वास्तविक पाहतां कु. शांता आपटे आपल्या परि-वारासह ज्या आल्या त्या व्यासपीठाच्या अुजव्या बाजूला खालीं जमिनीवर खुर्च्या टाकून बसल्या होत्या, व केवळ व्यवस्थापकांच्या आग्रहामुळेच त्या व्यासपीठावर आरूढ झाल्या, हें मला पूर्ण-पणें माहित होतें. कु. माअी वरेरकर यांना मीं जो गमतीने प्रश्न केला, त्याच्याशीं कु. शांता-बाअी आपटे यांच्या व्यासपीठावर येण्याशीं कांहीच संबंध नव्हता. अेखाद्या साहित्येतर कलेंत किंवा शास्त्रांत विशेष सन्माननीय अशा दर्जा पावलेल्या व्यक्तीला तिच्या त्या गुणांचा व योग्य-तेचा गौरव करण्यासाठी साहित्यसंमेलनांत व्यासपीठावर मानाचें स्थान देणें, यांत मला आक्षेपार्ह असें कांहीच वाटत नाही; किंबहुना तें अभिनंदनीय व योग्यच आहे. शिल्पकार करमरकरांचीहि स्वागतव्यवस्थापकांनी अशीच दखलगिरी घ्यावयाला पाहिजे होती, व त्यांनाहि तसेंच सन्मान-पूर्वक व्यासपीठावर बसवून घेणें आवश्यक होतें, असेंच मी म्हणेन. पण तसें केलें गेलें नाही म्हणून ज्यांच्याबाबत तें केले गेलें, त्यांना दोष देण्याचें मला कांहीच कारण नाही. आक्षेप होता तो योग्य व्यक्तींना आदराचें स्थान मिळाल्याबद्दल त्यांच्यावर नव्हे, तर कांही जागा वशिल्याने अडवल्या गेल्यामुळे, खऱ्या अधिकारी व थोर साहित्यिकांची अुपेक्षा व अुपमर्द

होण्याची जी वेळ आली, तिच्या जबाबदारीसाठी व्यवस्थापकांच्या बेजबाबदार हलगर्जीपणाबद्दल त्यांच्यावर! माझे अुद्गार स्वागतमंडळाच्या गैर व्यवस्थेला अुद्देशून होते; व्यासपीठावरील कोणाहि व्यक्तीला अुद्देशून नव्हेत; मग त्यांचा संदर्भ कोणी कसाहि जोडो व त्यांतून काय वाटेल तो अर्थ काढो.

पण अेक गोष्ट मात्र निश्चित की अशी अव्यवस्था ही कोणत्याहि संमेलनाच्या चालकांना निखालस भूषणीय नाही, आणि याचसाठी संमेलनासाठी 'अुपचार-वाह' नेमण्याची सूचना मीं वर केली आहे. अुपचार ही बाह्य अुपाधी असल्यामुळे ती क्षुल्लक आणि अुपेक्षणीय आहे, अशा भ्रामक आविर्भावाचा आभास करून आपण त्याची चर्चा करीत नाही, पण त्यामुळे आपल्या सार्वजनिक जीवनावर गैरशिस्तपणा व बेजबाबदारी यांची मोकाट वाढ होण्याच्या रूपाने अनिष्ट परिणाम होत आहे, हें कोणत्याहि सार्वजनिक सभांना हजर राहणाऱ्यांच्या सहज लक्षांत येअील. ही प्रवृत्ति समाजमनस्कतेच्या विकासाला घातुक असल्यामुळे तिला वेळींच वळण लागणें आवश्यक आहे व त्याचा अुपक्रम साहित्यसंमेलनांतूनच, त्याच्या प्रातिनिधिक व साहित्यिक महत्त्वामुळे, प्रत्यक्ष व्हावयाला पाहिजे. असो.

पत्रिकेचा मागील अंक निघाल्यानंतर पत्रिकेच्या दोन हितचिंतकांकडून पत्रिकेच्या धोरणाबद्दल व अंतरंगाबद्दल दोन पत्रें आलीं आहेत. या दोनहि पत्रलेखकांची अिच्छा तीं जशींच्या तशीं पत्रिकेंत छापलीं जावींत अशी आहे. परंतु स्थलाभावीं तसें करणें अशक्य असल्यामुळे त्यांतील मामुली औपचारिक भाग वगळून महत्त्वाचा व मुद्देसूद तेवढाच भाग अुद्धृत करून त्याला अुत्तर देणें प्राप्त आहे. यांपैकी पहिल्या पत्राचे लेखक रा. श्री. द. लिमये. यांची तक्रार पत्रिकेच्या क्रमांक ५३ च्या अंकांतील श्री. ना. गो. चापेकर यांनी लिहिलेल्या डॉ० माधवराव पटवर्धनांवरील लेखांतील, "सावरकरांपेक्षाहि ह्या कामीं (भाषाशुद्धीच्या) माधवरावांना अधिक यश आलें याचें कारण स्वभाषेचा अभिमान हें होय, परकी भाषेचा द्वेष हें नव्हे." या विधानाबद्दल आहे. श्री. लिमये म्हणतात, "हें वाक्य शल्याप्रमाणे वाटून विरस झाला... हें शल्य निघाल्यास पाहावें म्हणून श्री. चापेकरांनाच पत्रद्वारें मीं समक्ष विनंती केली. त्यांचेकडून ५४ व्या अंकांत यासंबंधी कांही स्पष्टीकरण येतें कीं काय यासाठी थांबलों होतों. परंतु त्यांस तसें करण्याची आवश्यकता वाटल्याचें दिसत नाही." यानंतर, "श्री. चापेकर कै. डॉ० माधवराव पटवर्धन नि श्री. सावरकर या सर्वांचे महनीय कार्याविषयी नि व्यक्तिमत्त्वाविषयी आदरभाव व्यक्तवून" श्री. लिमये यांनी श्री. चापेकर, कै. डॉ० पटवर्धन व श्री. सावरकर हे तिघेहि साहित्यसंमेलनाचे भूतपूर्व अध्यक्ष तेव्हा त्यांपैकीच (१) "अेका ज्येष्ठ अध्यक्षांनी आपल्या अेका सहकाऱ्याचे मृत्युलेखांत असे निर्मूल नि अनुदारपणांचे अुद्गार काढावे हें खेदजनक आहे." (२) "प्रामाणिक मतभेद अवश्य व्यक्त व्हावयास हवा पण तो अशा रीतीने नव्हे." (३) "औचित्याच्या दृष्टीने तर अुल्लेखित वाक्य सर्वस्वीं असमर्थनीय आहे." (४) "मृत चरित्रनायकाला स्वर्गप्राप्ति योग्य ठरविण्यासाठी त्याच्या अिहलोकींचे– अेका अर्थाने गुरुस्थानीं असलेल्या– सहकाऱ्यास पाताळांत लोटण्याची आवश्यकता नाही– अितकेंच नव्हे तर तसें करण्यास हातभार लावणें हें सुद्धा अक्षम्य आहे." (५) "अेक वेळ चरित्रनायकाची अवास्तव स्तुति करून त्याचें चित्रण भडक रीतीने केलेलें खपेल, पण त्यास परनिंदेची पार्श्वभूमि कशाला!" (६) "आणि कै० पटवर्धनांनी भाषाशुद्धीचा पुरस्कार केला तो केवळ स्वभाषेच्या अभिमानाने प्रेरित होअून नि सावरकरांनी मात्र परकी भाषेच्या द्वेषाने असें म्हणणें हा काय न्याय झाला!" असे सहा मुद्दे अुपस्थित केले आहेत; व अखेरीस कै० पटवर्धनांचे शब्दांत "शेवटीं विनंति हीच की हवी तितकी

कडक टीका करा परंतु विपर्यास करूं नका'' असा त्यांचा समारोप केला आहे.

या पत्रांतील आक्षेप व विधानें अशा स्वरूपाचीं आहेत की, त्यांबाबत पत्रलेखकांनी श्री. चापेकर यांच्या अुत्तर देण्याबाबतच्या मौनावरून, त्यांस तसें स्पष्टीकरण करण्याची आवश्यकता वाटली नाही, असा जो निष्कर्ष काढला आहे, तो जर खरा असेल तर, श्री. चापेकरांच्या त्या धोरणाशीं मी सहमत आहें. अेखाद्या विनोदी वाक्याने आपल्या आराध्यदैवताचें पावित्र्य-विडंबन झालें, असें वाटणाऱ्या अेखाद्या हळव्या मनाच्या सनातन्याच्या सात्त्विक संतापाने श्री. चापेकर यांच्या विधानाबाबत जे भावनाभरतीचे आक्षेप श्री. लिमये यांनी घेतले आहेत, त्यांअैवजी त्यांनी तीं विधानें आपल्याला वाटतात तशीं कशीं निर्मूल आणि अनुदार ठरतात, हें सप्रमाण दाखवून, तीं खोडून काढण्याचा प्रयत्न केला असता तर श्री. चापेकर यांनी त्यांच्या त्या प्रयत्नांचा जरूर परामर्श घेतला असता. परंतु त्यांनी तसें कांहीच न करतां केवळ आपल्या सावरकरविषयक भक्तिभावनेचा अुद्रेक मोठया जिव्हाळ्याने आणि जोरदार भाषेंत त्यांत केला असल्यामुळे, फार तर आपलें पत्र पावलें मजकूर समजला, यापेक्षा श्री. चापेकर त्यांना अधिक काय लिहूं शकले असते, याचाच मला अुलगडा होत नाही. परंतु श्री. लिमये यांचें हें पत्र दुसऱ्या अेका दृष्टीने मात्र अेक मोठी धोक्याची सूचना देणारें आहे, असें मला वाटतें. ''......... मूळ ग्रंथ अभ्यासिणाऱ्या विद्वत्तेचा महाराष्ट्रांत संकोच झाला. वर्तमानपत्री ज्ञानावर वाटेल तें टारगे पोरगे कोणत्याहि मुद्यावर मत देण्याअितके धीट झालें; याच प्रवृत्तीचा आजच्या महाराष्ट्रांत कहर झालेला दिसून येत आहे. प्लेटोने आपल्या लिखाणांत म्हटलें आहे त्याप्रमाणे असे हे धाडसी लोक लोकांचे मोठाले जमाव जमले असतांना बहुजनसमाजाचींच मतें शिकवीत असतात व त्यांनाच ज्ञान म्हणून गौरवाने संबोधीत असतात,'' असें श्री. शेजवलकर यांनी याच अंकांत जे अुद्गार अन्यत्र काढले आहेत, त्यांची 'वानगी' म्हणून हें पत्र दाखवितां येण्यासारखें आहे. भावनाप्रधान तरुणांच्या मनोभूमिकेंत अुद्भवूं लागलेली ही अनिष्ट व अशास्त्रीय प्रवृत्ति गर्ह्य असून, शास्त्रीय पुरोगामी विचाराच्या विकासांत ती फारच मोठा अडथळा आणणारी असल्यामुळे, आता यापुढे तिची केवळ अुपेक्षा न करतां तिचें वेळींच निर्मूलन करण्याची जागरूकता बाळगणें अत्यंत आवश्यक आहे, असें म्हटल्यावांचून राहवत नाही.

दुसरें पत्र रा. चिं. पां. बर्वे, ठाणें, यांचें 'पत्रिके'च्या धोरणाबद्दल आहे. ते लिहितात— ''...ते (पत्रिकेचे संपादक) म्हणतात, साहित्यप्रेमी माणसाला ज्यांत आपुलकीची ओळख पटेल असें ललितलेखनहि पत्रिकेंत यावें. कुटुंबांतील प्रत्येक माणसाला त्यांत कांहीना कांही तरी वाचण्यासारखें अवश्य सापडावें अशी पत्रिकेच्या यापुढील अंकाची स्थिति करण्याचा त्यांनी (संपादकांनी) निश्चय केला आहे. तरी हें त्यांचें (संपादकांचें) मत व अेतद्विषयक त्यांचें धोरण पुष्कळ सभासदांस पसंत नसावें अशी माझी समजूत आहे. अशा धोरणाने चालणारीं जीं कांही 'मनोरंजन'छापाचीं मासिकें पूर्वी होअून गेलीं व आजहि कांही चालू असतील त्याच श्रेष्ठ पदाकडे खेचण्यासाठी व सारखें हें त्रैमासिक आहे काय ! आपल्या धोरणाच्या समर्थनार्थ रा. काळे म्हणतात की परिचयात्मक, वर्णनात्मक वगैरे प्रकारच्या परीक्षणांना भरपूर अवसर देणारीं पुरेशीं दैनिकें, साप्ताहिकें, मासिकें महाराष्ट्रांत पुष्कळ असल्यामुळे अशांची जरुर पत्रिकेंत नसावी हें तत्त्वज्ञान कितपत खरें आहे याचा वाचकांनीच विचार करावा. यातील 'भरपूर' 'पुरेशीं' 'पुष्कळ' हीं विशेषणें विचारांत घ्यावयास पाहिजेत. कांही थोडीं वर्तमानपत्रें जीं अगदीच थोडया पुस्तकांवर तुटपुंजीं परीक्षणें देतात, तीं गेल्या कित्येक वर्षांतील पत्रिकेच्या अंकांतील परीक्षणाशीं तुल्यबल आहेत काय, याचाहि वाचकांनी विचार करावा. याच्याबरोबर अुलट

खास असेंहि म्हणतां येईल की ज्या जातीचें ललितलेखन ते संपादक पत्रिकेंत उतरूं पाहतात तें तर आज बऱ्याच साप्ताहिकांत व मासिकांत नित्यनियमाने व वाढत्या जोमाने अवतीर्ण होतच आहे. संपादकांनी वानगीदाखल दाखविलेल्या कविता– नव्हे काव्यें– नभोवाणी व चित्रपट यांबद्दलचे लेख या पंक्तींचें लिखाण काय हल्लीच्या पुष्कळ खप असलेल्या वर्तमानपत्रांत, साप्ताहिकांत व मासिकांत थोडें आहे तर पत्रिकेनेहि त्याच खाईंत उडी घ्यावी ! तरी परिषदेच्या सभासदांनी व वर्गणीदारांनी वेळींच जागें होऊन पुढे येऊन आपलीं मतें जरूर प्रसिद्ध करावीं. आपणांस मान्य नसलेली गोष्ट घडत असतां घरांत नुसतें चरफडत बसणारे लोकच फार असतात. तरी असे आपण या बाबतींत न होतां याचा विचार होईल अशी आशा आहे."

श्री. बर्वे यांच्या या पत्रांतील शेवटच्या भागाला मी स्वतःच्या वतीने साथ देऊन पत्रिकेच्या सर्व वर्गणीदारांना व परिषदेच्या सर्व सभासदांना अशी आग्रहाची विनंती करतों की त्यांनी श्री. बर्वे यांच्याप्रमाणे आपल्या पत्रिकेबद्दल अपेक्षा परिषदेच्या कार्यकारी मंडळाला अवश्य कळवाव्या. कारण रत्नागिरी येथील साहित्यसंमेलनांत पसार झालेल्या पत्रिकेबद्दलच्या ठरावाच्या अंमलबजावणीच्या शक्याशक्यतेचा विचार करण्यासाठी परिषदेच्या कार्यकारी मंडळाने सध्या एक उपसमिति नेमली असल्यामुळे तिला त्या मतप्रदर्शनाचा फारच मोठा उपयोग झाल्यावांचून राहणार नाही.

श्री. बर्वे यांनी आपल्या पत्रांत अधीरी मनोवृत्ति स्वीकारून जें मतप्रदर्शन केलें आहे तें मात्र मला मान्य नाही. पत्रिकेचा पहिला अंक हातीं पडतांच त्यांतील संपादकीय वाचून त्यांनी घाईघाईने संपादकीय धोरणाबाबत जें हें तारांगण केलें आहे, तें पत्रिकेचे त्यापुढील दोन अंक पाहूनहि जर त्यांना योग्यच वाटत असेल, तर त्यांनी पत्रिकेच्या गेल्या कित्येक वर्षांतल्या कित्येक अंकांपैकी कोणत्याहि अंकापेक्षा हे तीन अंक, त्यांतील लेखांच्या व परीक्षणांच्या दर्जाच्या बाबतींत अमुक एका रीतीने कमी प्रतीचे आहेत, हें जरूर सप्रमाण सिद्ध करून द्यावें. पत्रिकेंतून एका विशिष्ट प्रकारच्या परीक्षणांना अर्धचंद्र देण्याचें धोरण मीं अवश्य निश्चित केलें आहे. परंतु खऱ्याखुऱ्या महत्त्वाच्या ग्रंथांवर विस्तृत आणि अभ्यासपूर्वक परीक्षणें देण्यांत येणार नाहीत, असें मीं कधीच म्हटलें नाही. ज्या प्रकारच्या परीक्षणांबाबत श्री. बर्वे हे पत्रिकेच्या पूर्वीच्या वर्षांतील अंकांचा निर्वाळा देतात त्या प्रकारचीं परीक्षणें याहि वर्षांतील या व मागच्या अंकांत आलेलीं आढळतील. नभोवाणी, चित्रपट यांसारख्या विषयांवरील पत्रिकेच्या या तीन अंकांत आलेले लेख आजच्या 'मनोरंजन'छापाच्या मासिकांतून किंवा पुष्कळ खप असलेल्या साप्ताहिकांतून येऊं शकतील, असें त्यांना वाटत असल्यास त्यांनी जरूर त्या छापाच्या मासिकांच्या व त्या खपाच्या साप्ताहिकांच्या संपादकांची गांठ घेऊन त्यांचें त्याबद्दल मत विचारून पहावें. या तीन अंकांत आलेल्या इतर लेखांनी तर आतापर्यंतचा पत्रिकेचा दर्जा कमी न होतां उलट वाढला आहे, हें कबूल न करण्याइतकी श्री. बर्वे यांची वृत्ति जर पोकळडौली व भूतशोची असेल तर मात्र त्यांचें समाधान करण्याचें सामर्थ्य माझ्यांत नाही.

यानंतर चालू अंकाच्या अंतरंगाकडे वळावयाचें. परंतु हें संपादकीय आधीच बरेंच लांबलें असल्यामुळे या अंकांतील लेख व लेखकांचे विशेष न सांगतां, त्या सर्व लेखकांचे त्यांनी केलेल्या लेखनसाहाय्याबद्दल कृतज्ञतापूर्वक आभार मानून हें संपादकीय पुरें करतों.

के. नारायण काळे

आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चाफेकर यांनीं छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता वामन मल्हार जोशी यांनी प्रसिद्ध केलें.